कॉंटिनेंटल प्रकाशन ५१

# भूक

: लेखक :

र मा कां त

कॉन्टिनेन्टल प्रकाशन

किंमत चार रुपये

## पुढील प्रकाशनें

१ कुरळ

सानें गुरुजी

२ कल्पनेच्या तीरावर

कुसुमाग्रज

# माणिकमोती नि अश्रू : : १

‘ भूक ! ’

‘ काय ? ’

‘ शेट ! मला भूक लागली ! ’

वरील शब्द मुखातून बाहेर पडले असतील नसतील तोच ‘ काडकन् ’ आवाज आला व पांचसहा वर्षांचा मुलगा ‘ आई ! आईऽग ’ अशी काकुळतीची किंकाळी फोडीत एका श्रीमंताच्या बंगल्यामधून जीव मुठींत धरून बाहेर पळत आला. भीतीनें मागे वळून पहाणार तोच पुन्हां ‘ काडकन् ’ आवाज आला. यावेळी श्रीमंताचा हंटर तेथील पहारेकऱ्याच्या पाठीवर तळपला.

‘ भिकाऱ्यांची पोर इथं आणून त्यांना आमच्या मुलीशी खेळूं देतोस ? शरम नाही वाटत ?—’

‘ हुजूर ! छोट्या बाईसाहेबानी बोलावल त्याला–’ पहारेकरी पाठ चोळीत, डोळे पुशीत व मधून मधून हात जोडीत श्रीमंतांना काकुळतीला येऊन सांगत होता.

तूं बोलावलंस त्या भिकाऱ्याच्या पोराला ? ’ श्रीमंताची करडी नजर आपल्या मुलीवर फिरली.

‘ पपा ! त्याला किनई, भूक लागली होती, तो भूक म्हणाला,

म्हणून बोलावलं. फिरून पपा, त्याच्या एका हाताला सहा बोटं होती, ती कशी दिसतात हे मला बघायचं होतं!–'

'हे पहा! गरीब मुलाबरोबर आपण खेळूं नये कधी.'

'कां पपा?'

'खेळूं नये सांगतोय ना!' श्रीमंतांच्या लाल डोळ्यांच्या कटाक्षानें मुलांची चिमणी मनं म्लान झाली. वडिलांच्या दटावणीमुळे त्या सर्वांनी तेथून तडक धूम ठोकली. त्यावेळी त्याच्या कानांत कुंडलं व गळ्यांत माणिक–मोत्यांच्या माळा झळकत होत्या; तर बाहेर, भिकाऱ्याच्या गालांवरून घळघळ अश्रू गळत होते.

*　　　*　　　*

बरोबर वीस वर्षांपूर्वीचं हे दृश्य अशोकच्या नेत्रासमोर ताज्या स्मृतीनं तरंगू लागलं. वीस वर्षांपूर्वी त्याच्या बालहृदयास झालेली जखम वरवर भरून आली होती, पण आज गतस्मृतीच्या विव्हल उर्मीमुळे ती पुन्हा झिरपू लागली. डोळे ओथंबून आले. आपल्या सभोवतीं शेकडो प्रतिष्ठित, विद्वान्, श्रीमंत, पांढरपेशी लोक आपल्या गौरवासाठीं प्रफुल्ल मनानें बसले आहेत, याचं त्याला मुळींच भान नव्हतं. नेत्रसंतोषी, झकपक पोषाख केलेल्या स्त्री--पुरुषांनी विस्तीर्ण मंडप नुसता फुलला होता. पांढऱ्या शुभ्र गांधी टोप्यांकडे नजर टाकली म्हणजे चांदण्यांत कपाशीचं बहरलेलं शेत तर डुलत नाहीं ना असा भास होई.

मंडपांत व्यासपीठावर अनेक देशी वस्तूंचं प्रदर्शन मांडलं होतं. सर्वांची नजर या प्रदर्शनांतील एका विवक्षित भागावर खिळली होती.

तांबडा, पिवळा, निळा, हिरवा- सप्तरंगी कापसाचे पुंजकेच्या पुंजके मोठ्या आकर्षकपणे तेथे पाहण्यासाठीं ठेवले होते. ही अजब नी मोहक कलाकृती अशोकची होती. अनेक वर्षे अनेकविध प्रयोग करून अशोकनं निसर्गावर मात केली होती, एका कलारहस्याला सर्वस्वी जिंकलं होतं. शेतावर अहोरात्र खपून, कालच्या कपाशीला आजचे हे मोहक नी निसर्गसुंदर रंगविलासी रूप दिले होते. जगांत हा शोध अपूर्व होता. या शोधानं शेतात नी गिरण्यांत मोठी क्रांति घडून येणार होती.

आजवर अशोकनं वनस्पतिशास्त्रांत असे कांही नाहीं तरी शेसव्वाशे, छोटे मोठे शोध लावले. पण निसर्गरंगी कापसाचा शोध सर्वांत महत्त्वाचा होता. यासाठी अखिल भारतीय शेतकी नी ग्रामोद्योग प्रदर्शनांत अशोकचा आज जाहीर सन्मान सुरू होता.

पण अशोकच्या भांबावलेल्या मनास याप्रसंगी कांहींच सुचेना! वस्तुतः अशोकच्या जीवनांतील हा उत्कट आनदाचा क्षण! या क्षणी परमोच्च सुखाच्या शीगेवर त्याचा जीव झुलावयाचा! पण कधी कधी सुखहि सल् लागतं. कदाचित् अशोकचं हृदय यामुळेच तळमळत असावं!

* * *

देशी उद्योगधंदे, देशी वस्तु यासंबधी राष्ट्रपति ओजस्वी भाषण करीत असतां प्रेक्षक मधून मधून टाळया वाजवीत. अन् त्यामुळं अशोक अधिक गंभीर होई. प्रत्येक टाळयाचा ध्वनी त्याला हंटरच्या आवाजाची आठवण करून देई. कारण प्रदर्शनामधील शेकडा नव्याणव प्रेक्षक श्रीमंत होते. गिरणीमालक, जमीनदार, जहागिरदार, सरदार नी दरकदार, इथून तिथून सारा 'श्रीमंतांचा बाजार' बहरला होता. या 'भरजरी बाजारांत' आपण कोठून येऊन पडलो असे अशोकला झाले. प्रदर्शन कोणासाठीं होते? शेतकरी, किसान, कामगार नी मजूर यांच्यासाठी होते की, श्रीमंतासाठीं होते? 'शेतकऱ्यांनो! शेती सोडूं नका' 'शेती हेच सुखाचं साधन आहे.' वगैरे अनेक बोधपत्रिका ठिकाठिकाणी फडकत होत्या. पण ज्यांच्यासाठी हे प्रदर्शन नी या बोधपत्रिका होत्या, ते शेतकरी, किसान, कामगार कोणीसुद्धां प्रदर्शनांत नव्हते. त्यांना कोण येऊं देणार? ते सर्वस्वी गरीब होते.

'श्रीमंतांनी माझा गौरव केला, यशाची पताका नभोमंडळांत फडकावली, तरी मला काय त्याचं? उलट माझ्याबरोबर चिखलराईत राबणारे माझे सहकारी 'भाई' म्हणतील की, नाण्यांच्या झंकारानं अशोक हुरळला; गरिबांना विसरला. त्यापेक्षां नको, मला हा सन्मानच नको' असं अशोकला पळापळाला वाटूं लागलं.

मोठमोठीं प्रदर्शने ह्याच थाटमाटांत भरतात. प्रदर्शन ज्यांच्यासाठीं

भरते त्यांना महत्त्वाच्या प्रसगी नेहमीच मज्जाव केला जातो. अशा प्रसंगी सर्व आसने श्रीमंतांच्या बावळट बाहुल्यांनी अलंकृत केलेली असतात. मग ही प्रदर्शने सरकारी तोऱ्याची असोत किंवा कॉंग्रेसच्या मोहऱ्यांची असोत. आघाडीवर बडे बडे भांडवलवाले असतील तर पिछाडीवर, मंडपाबाहेर निष्कांचन लोक पहावयास मिळतील.

उभा जन्म दारिद्र्यांत गेल्यानं व श्रीमंतांच्या कृपाकटाक्षांत जीव भरडल्यानं-श्रीमतांचे वेष नी देश डोळ्यापुढं येतांच अशोकच्या तळव्याची आग मस्तकाला जाई ! व अशा प्रसगी बाळपणी ' भूक ! भूक ! ' म्हणत असतां श्रीमंताचे विनाकारण मिळालेले चाबकाचे तडाखे अंगावर वळवळूं लागत. बालमनावर झालेले आघात नी अपघात सहसा बुजत नसतात.

अशोकचा जीव विचारतद्रीच्या लहरीवर अशा रितीनं खालवर हेलावत होता. राष्ट्रपतीची रसवंती देशी वस्तूंच्या कलाकृतींचं वर्णन करू लागली. इतक्यांत त्यांनी अशोकच्या शोधाकडे अंगुलिनिर्देश केला. ते म्हणाले,

" अशोकसारखे बुद्धिवंत तरुण जितके जास्त निर्माण होतील तितका आपल्या देशाचा स्वातंत्र्यक्षण जवळ येईल. आमच्या देशांत ' रमण ' आहेत, वनस्पतींचे वाचस्पती जगदीशचंद्र आहेत, निसर्गाशी एकरूपतेने गाणारे रवींद्र आहेत, पण या महात्म्यांच्या महतीचा फायदा मजूरांना प्रत्यक्ष असा काय झाला ? या सुपुत्रांनी आमच्या देशाच्या संस्कृतीला उजाळा दिला, सप्त खंडाला हिंदी बुद्धीची तेजस्विता दाखवली, पण या आंतरराष्ट्रीय पुरुषाना ' भुके 'चा क्षण शमविणारा एकहि मार्ग सांपडला नाही. गरीबाच्या झोपड्यातून उठणाऱ्या किंकाळ्या याना थांबवतां येत नाहीत. गरीबांच्या पोटांतील ' भडकती अंगार ' ही ' भूक ' अशोकसारख्यांच्या अर्थोत्पादक शोधांनीच शमणार आहे. याच्या शोधांत मूर्तिमत काव्यहि आहे. उद्यांच्या आशादायक शेतांत अशोकच्या निसर्गरंगी कपाशीनं नंदनवनाचं सौंदर्य फोल वाटूं लागेल. सारे जग या सौंदर्याचा हेवा करील. ' शेती करा ' म्हणून गर्जून सांगण्याचा अधिकार एकट्या अशोकचा आहे. राष्ट्राने या शोधाचं चीज केलं पाहिजे. वनस्पतींच्या या विश्वामित्राला

श्रीमंत, गरीब सर्वांनी मदत केली पाहिजे. नाही तर परदेशी भांडवलवाले आपल्या व्यापारी परंपरेप्रमाणे हे सर्व शोध हिरावून घेतील. अशोकचा गौरव त्यांच्या कार्याचा विस्तार वाढविण्यांत आहे."

अध्यक्षांनीं आपले भाषण संपवून अशोकला हार घालण्यास हात पुढे केले. भावना नी उद्वेग दाबून अशोकने हाराचा स्वीकार केला. त्यावेळीं त्याच्या नेत्रांमधून दोन अश्रू पडले हे अश्रू आनदाचे होते की दुःखाचे? सर्वांना नमस्कार करून तो म्हणाला, " भाई! हा गौरव माझा नसून माझ्या मातृभूमीचा, माझ्या आईचा, हो, आ–ई–चा आहे." 'आई' शब्द उच्चारतांना अशोकला किती प्रयास पडले! मन पुनश्च सावरून तो म्हणाला 'शोधाचं यश माझं असलं तरी यशाच फळ माझ्या असंख्य शेतकऱ्यांना मिळाल पाहिजे. हिंदुस्थानांत यांत्रिक सुधारणा व शेती यांचा तीव्रतर झगडा चालू आहे. त्यांतून मार्ग काढण्याची काही आशा या शोधांनी मिळाली तर माझ्या शोधाचे चीज झाले असं मी समजेन.........' अशोकने आपल्या अनेकविध शोधांची माहिती सर्वांना सांगितली व खाली बसला. तत्क्षणीच त्याच्या डोळ्यापुढे त्याच्या आईची व एका अज्ञात व्यक्तीची कल्पनामय मूर्ति दिसूं लागली. ही अज्ञात व्यक्ती कोण होती हे त्याचे त्यालाहि माहित नव्हतं. पण तो त्या मूर्तीवर मनापासून प्रेम करीत होता. किंबहुना आजच्या कांही शोधांचे श्रेय या प्रेममूर्तीच्या प्रोत्साहनासच आहे हे तो जाणून होता. अन् म्हणूनच अशा सुखप्रद प्रसंगी 'ती कोण?' हे न समजल्याने त्याला हुरहूर लागे.

* * *

अशोकचं अभिनंदन करण्यास अनेकजण व्यासपीठावर आले. त्यांत मिस निली कुबेर या पहिल्या होत्या. लगबगीने त्या व्यासपीठावर आल्या— 'अशोक! सर्वांच्या अगोदर मी आपलं अभिनदन करते–' असं म्हणून तिनं आपला हात हस्तांदोलनासाठी पुढे केला. तिच्या श्रीमंती मानभावीपणाला पहातांच अशोकचं पित्त पुन्हा खवळलं! तो कांहिच बोलला नाही.

'अशोक'–निलीनं पुन्हां नामोच्चार करतांच अशोक थोडासा भानावर आला व उसने हास्य केलं. 'क्षमा करा अं–' असे अडखळत म्हणून

अशोकने निलीचा सुकुमार हात हाती घेतला; व हस्तांदोलनचा अहेतुक फार्स पुरा केला.

‘ आपण अभिनंदन कां करतां माझं ? ’

‘ कां अभिनंदन करतां ? ’ असा उद्गारपूर्ण प्रश्न निलीने मंदस्मित करीत विचारला. ‘ अभिनंदन हे अभिमानाच प्रतिक असतं ! ’

‘ कसचा अभिमान ? ’ अशोकने विचारले.

‘ तुमचा ! तुमच्या शोधांचा अभिमान ! अशोक, आपण आमचा नवलाखी बाग ’ चिरंजीव केलात–’

‘ कुणाचा बाग ? ’

‘ आमचा ! ’

‘ तुमचा ? ’ अशोक विस्मय, तिरस्कार, व नको असलेल्या आपुलकीच्या भावांनी उद्गारला.

‘ म्हणजे ? तुम्ही मिस निली कुबेर का ? ’ ही अक्षरे उच्चारतांना अशोकच्या कपाळावर इतक्या आठ्या पडल्या की त्यांत पसापसा राग सहज मावला असता.

‘ या ! असे इकडे या की ! मी आमच्या सर्व मंडळीशी आपली ओळख करून देते.’ नीली सभाधीट होती. भरसभेत तिचा उपहास करण्याचं धाडस अशोकला होईना ! तो तिच्या मागोमाग गेला.

–‘ पपा –’ नीलीचे वाक्य पुरे होण्यापूर्वीच नीलीचे वडील, बाळासाहेब कुबेर स्वागतार्थ उठून पुढे आले. व त्यांनी अशोकच्या पाठीवरून शाबाससकीचा हात फिरवला. ‘ अशोक ! तुम्ही कीर्तिवंत झालांत, पण आम्हाला, मात्र मान खालीं घालण्याचा प्रसंग आणालत—’

‘ कुणी मी ? ’ अशोक आश्चर्याने उद्गारला.

‘ छे ! छे ! तसं मुळीच नाही. पण ज्या बागेत जगाला थक्क करणारे प्रयोग आज चार पांच वर्षे चालले आहेत ती बाग आमची आहे. अन् येवढं असून तिथ आम्ही एकदांही ढुंकून पाहिले नाही, कीं, तुम्ही कोण, कुठले, काय करतां म्हणून पुसतपास केली नाहीं. लोकांना कळलं तर ते काय म्हणतील ? ’

‘ कांहीं म्हणणार नाहीत ! अहो, श्रीमंतांचे सारे व्यवहार असेच असतात, त्यांत काय ? ’ या बेपर्वाई उत्तरामुळे नीली गोंधळली. आपल्या वडिलांच्या मुखावर कांही भावनाछटांचा बदल होतो की काय म्हणून पाहूं लागली. पण आश्चर्याची गोष्ट, झटपट रागावणारे बाळासाहेब या उत्तरानं उलट हंसत होते. त्या हास्याच्या छटेत कसलेल्या नटाचा अभिनय भरला होता. त्या अभिनयाच्या अभिनिवेशांत ते म्हणाले, ‘ अशोक ! तुम्ही म्हणता ते खरं आहे. तुमच्यासारखे स्पष्टवक्ते लोक आमच्या पदरी असते तर...’

‘ श्रीमंतांनीं त्यांना केव्हांच धुळीला मिळवलं असतं ’ !

‘ श्रीमंताविषयी आपल्या भलत्याच कल्पना झालेल्या दिसतात. नीलीने मनीबॅग आपल्या उन्नत हृदयाशी धरीत म्हटले.

‘ हे असं चालायचंच ! पण, अशोक तुम्ही आमच्या शेतांत पांच वर्षें प्रयोग करतां नी एकदां देखील आमच्याकडं आला नाहीं ! ’ बाळासाहेबांनी पृच्छा केली.

‘ मी प्रकाशाच्या शेतांत काम करतो, आपल्या शेतांत करीत नाही—’

‘ हो ! तेहि खरंच आहे ! ’

‘ तुम्ही येत नसाल तर आम्ही येतो तुमच्या शेतावर ! मग तर झालं ! पापा ! उद्यां येतां कां बागेत ? ’ नीलीनें आतुरतेनं वडिलांना विचारलं.

‘ मीहि त्यांना तेच विचारणार होतो. काय, अशोक ! आम्ही येऊं का ?

‘ येऊं का म्हणजे काय ? ते कांही नाहीं. पपा, उद्यां आपण सारी जणं तिथं ‘ पिकनिकला ’च जाऊं या !

‘ हे पहा ! मालक आपण आहांत, चालक प्रकाश आहे. उगीच दिखाऊ शिष्टाईनं आपण हे प्रश्न मला कां विचारतां ? ’ सर्व मंडळी चपापली. इतक्यांत ‘ मा ’साहेब पुढं आल्या. त्यांनी अशोकच्या पाठीवरून हात फिरवला. त्या हातांत आईचं वात्सल्य समावलं होतं ! ‘ माझी आई

असती तर–' या विचारानं अशोकचे डोळे पुन्हां भरून आले. झटकन् मान फिरवून रुमालानं ते अश्रू टिपून काढले. नीलीच्या नजरेस ही गोष्ट आली. तिला वाईट वाटले. थोडा वेळ सर्वजण स्तब्ध राहिले.

* * *

आपली कुणीच ओळख करून देत नाही म्हणून श्रीमती सुधा कुबेर नी सौ० रजनीदेवी लखपती चटकन् पुढे आल्या. त्यांच्याकडे पाहून नीली उमगली. नाइलाजानें तिनं अशोकशी त्यांची ओळख करून दिली.

' या माझ्या वहिनी बरं का? यांचं नांव सुधा आहे. व या माझ्या आत्याबाई-सौ. रजनी लखपती! आपण ब-याच ठिकाणी यांची नांवे ऐकलीं असतील!"

' हं' असं म्हणत अशोकने एक सुस्कारा सोडला.

' अशोक मोठे स्वाभिमानी दिसतात बरं का!' त्या दोघीहि एकदम एका सुरांत म्हणाल्या.

मान वळवून अशोकने त्यांच्यावर नुसता दृष्टिक्षेप केला. क्षणभर दोघींच्या सौंदर्याची शिसारीच आली त्याला! अन् त्यांच सौंदर्य तसंच होतं! उग्र वासाचे ब्रिलीयन्टाईन केसांना लावून त्याचे जपानी पद्धतीप्रमाणे चित्रविचित्र फुगे त्यानी काढले होते. या फुग्यांतून एकाद दुसरी बट कपाळावर उडत होती, तर एकादी रत्नजडित कुड्यांच्या प्रभेवर झडप घालीत होती. सर्व मुखावर इरास्मिक पावडरन सफेती दिली होती. झिरझिरीत, विरविरीत, रेशमी, बीन बाह्यांचा ब्लाऊज परिधान केला होता. ब्लाऊजचा 'पारिस कट' अशा झोकनोकांत मोठ्या खुमारीने उघडा टाकला होता, की, पातळाच्या पदराआड अर्धवट लपलेल त्यांचं 'स्त्रधिन' त्या तरुण आहेत याची साक्ष देत. ओठावर गुलाबी रगाची उसनी खुलावट करून गालाओठावरील सारे खड्डे त्यांनी भरून काढले होते. त्यांच्या पोषाकावरून त्यांची सौंदर्याची कल्पना, 'सौंदर्याची भूक', काय होती हे आपोआप कळे!

—पण अशा मुखावर निष्कारण शाब्दिक तोंडसुख तरी कां घ्या

असा अशोकनं विचार केला. कांही बोलून त्यांचा उत्साहभंग करण्यापेक्षां कांही तरी बोलणं त्याला रास्त वाटल, व तो बोललाहि !

—' मी आगाऊ स्वाभिमानी आहे ही गोष्ट शब्दशः खरी आहे. पण तुम्हांला किंवा यांना, कोणालाहि काय करायच आहे त्यासाठी ? अच्छा, मी आपली सर्वांची रजा घेतो—' असं म्हणून अशोक पुनश्च व्यासपीठावर आला. त्यावेळी अनेकानी त्यास पुष्पहार घातले. पुष्कळ वेळां फुलांचहि ओझ सहन होत नाही. अशोकला तसेच झाले. पटापट गळ्यांतील हार तो काढूं लागला. मनोहारी फुलत्या शृंगाराकडे पाहून नीलीचे नेत्र आशातुर आनदाच्या तृप्तीनं उन्मत्त होत होते. अशोकाची ती पांढरीशुभ्र गांधी टोपी, तो खादीचा आजानुपंखी नेहरूशर्ट, बंगाली फॅशनच पायघोळ धोतर, गळ्यापासून खालपर्यंत रुळणारे पुष्पहार,— ' किती सुंदर दृश्य ! ' येवढेच शब्द नीली आपल्या मनाशी पुटपुटली.

—सभा सपली. अशोक बाहेर जाऊ लागला. नीली पुढे येऊन म्हणाली, ' मोटार देऊं कां—'

—' नको ! Thanks—अ ' येवढे बोलून अशोक बाहेर पडला. तेथे त्याचे अनेक शेतकरी, सहकारी भाई उत्कठतेन त्याची मार्ग-प्रतीक्षा करीत होते. त्यांना पाहून अशोकला सन्मानगौरवाच्या दसपट आनद झाला. त्यानं पटापट सर्वांना हार वाटून दिले.

—' प्रकाश ! प्रकाश ! अरे, प्रकाश कुठ आहे ? ' त्याने एक दोघांना प्रश्न विचारला व लगेच धांवत पुढे आला. मोठा गेददार फुलाचा हार त्याने प्रकाशला घातला; व धाकट्या भावाप्रमाणं त्याला कडकडून भेटला. प्रकाश आनदाने हंसला व मूकभावाने अशोकला त्याने आशीर्वाद दिला.

—दूरवर नीली मोटारचं व्हील हाती धरून हा देखावा पाहात होती. वाऱ्यावर तिच्या गळ्यांतील माणिकमोत्यांची माळ हालत होती व अशोकच्या नेत्रांत आनदाश्रू डोलत होते.

## नाण्यांच्या झंकारांतील मुग्धता : : २

स्त्रीस्वभाव कितीही चचल असला तरी कधीं कधी त्याबद्दल निश्चितपणे आडाखे बांधतां येतात. पण श्रीमताच्या लहरींची गोष्ट तशी नाही. श्रीमंताची लहर म्हणजे जगाला न उकलणारे एक कोडे आहे. तेव्हां नवलाखी बाग पाहण्यासाठी उत्सुक झालेले बाळासाहेब कुबेर दुसऱ्या दिवशीं आले नाहींत याबद्दल अशोकला बिलकुल आश्चर्य वाटले नाहीं. उलट नेहमींप्रमाणं तो आपल्या प्रयोगशाळेत, व शेतांत काम करीत होता.

* * *

संध्याकाळचे पांचसहा वाजण्याचा सुमार असावा. अशोक बागेत फिरत होता. त्याच्या हातांत झाडाची पालवी कापण्याची कात्री होती. सूर्य मावळण्याच्या पंथाला लागला होता. त्यामुळे त्याची तिरपी, सोनेरी किरणे विशाल बागेत चौफेर उधळली होती. नुकतेच आकंठ जलपान करावयास मिळाल्यामुळे फुलझाडे, नी फळझाडे उन्मत्त विलासाने डुलूं लागलीं. फुलांच्या सुरंगी ताटव्यांतून वाऱ्याची एकादी झुळूक क्वचित् उठे व त्यामुळे सर्व पुष्पश्री, वनश्री व सौंदर्यश्री कंपायमान होई. जणुं मातेच्या वत्सलतेच्या करस्पर्शामुळे हंसणाऱ्या बालकांच्या भावना थरारत होत्या, दलाफुलांतून बहरत होत्या. अशोक स्तिमित नेत्रांनी या अनंत सौंदर्याकडे पाहूं लागला. इतर कामकरी बागेत निरनिराळी कामे करीत होते. कोणी मोटांचे पाणी

सोड, कोणी हिरवळीमधून पानपाचोळा वेचून काढ, कोणी पिकली फळे सकाळच्या बाजारासाठी खुडावीत तर शेतकऱ्यांच्या स्त्रिया डोईवर कुदळ-कोयत्यांची पाटी घेऊन वावराच्या कडाकडानं आपली ग्रामगाणीं गात घराकडे जात होत्या. फुलमाळी खुलत्या वेलीवरील अर्धोन्मीलित कळ्या खुडीत होता. या सर्व देखाव्याकडे पहातांना अशोकला किती धन्यता वाटे ! सृष्टिसौंदर्याचा हा उपासक चौफेर होणाऱ्या आनंदाच्या खैरातीमध्ये तन्मय झाला. इतक्यांत कुठ तरी मोटारीचा भोंगा वाजला. त्याने मागें वळून पाहिले.

अशोकभाई ! तुमच्याकडं त्या आल्या आहेत—"

" कोण ? "

" आपल्या मालकीण आल्या आहेत—"

" बरं मग ? तुला नि मला काय करायच ? "

"—पण त्या तुम्हांला शोधीत आहे. अशोकला घेऊन ये म्हणून त्यांनीं मला सांगितले—"

काम आटोपल्याशिवाय येता येत नाही म्हणून सांग. " गडी निघून गेला. अशोकचा चेहरा क्विनाइनप्रमाणे कडू झाला. श्रीमंताच्या मानभावी शिष्टाचारांत आपला वेळ खर्च करण्याची इच्छा त्याला बिलकूल नव्हती.

अशोकचा निरोप घेऊन गडी पर्णकुटीजवळ येतांच नीलीने विचारलं, " कायरे, आले का अशोक ? ,'

" नाही--"

" नाही ? "

" ते—कामांत आहेत. "

" कामांत आहेत म्हणजे ? माझा निरोप सांगितलास त्यांना ? 'मी' आले आहे म्हणून सांगितलस का ? "

" हो "

" मग, इतकं सांगून ते आले नाहीत ? "

" होय, अन् काम संपल्याशिवाय ते येणारहि नाहीत—"

" याचा अर्थ काय ? " मोठ्या तोऱ्यानं हे शब्द उच्चारून श्रीमंतीच्या सर्व चढेल भावना, तिनं प्रकट केल्या. मनातल्या मनांत ती खूप चडफडली. उभ्या आयुष्यात अशी चढेल उत्तरं ऐकायला न मिळाल्यामुळे तिचा पारा परमावधीला जाणं अगदीं सहाजिक होतं. मोटारींतून ती ताडताड खालीं उतरली व मनीबॅग घेऊन चालू लागली. इतक्यांत तिला काय वाटलं कोणास ठाऊक ! चार पावले पुढं जाऊन परत ती मोटारजवळ आली. हातात कागदाचं घडी केलेल पुडकं घेतले नी शेजारच्या गड्यास दरडावून म्हणाली,

" चलो—अशोक कुठं आहेत ? मला रस्ता दाखीव त्यांचा ! " नीली श्रीमताच्या दिमाखगिरीनं पदक्षेपण करू लागली. तिच्या एकंदर पोषाकावरून ती कसल्या तरी आशातुर भावांनी येथ आली होती. तिचा वेष, वेषभूषा, नी केशभूषा अत्यंत नाजुक रितीनं खुलली होती. त्यावरून तिची अभिलाषा तरुण असावी व या तरुण अभिलाषेचा संबंध तिच्या जीवन तारुण्याशी असावा असे सहज वाटे. शृंगार ही सौंदर्याकांक्षी स्त्रीस्वभावाची उपजत कला असते. या कलेचा खरा विलास शरीराच्या प्रत्येक अवयवामधून व अंगावरच्या प्रत्येक वस्त्रालंकारामधून प्रतीत होतो. तिची जरीकिनारी चंद्रकळा तिच्या गौरवर्णी कायेची प्रभा मोहकपणे खुलवी ! हातामधील रत्नजडीत बिदुले, व पदक्षेपणामुळं या बिंदुल्यामधून हाताच्या हालचालीसरसा उठणारा झणत्कार कोणाहि पुरुषावर मोहिनी घालूं शकला असता. कलमदेठाप्रमाणे शोभणाऱ्या गुलाबी व तुकतुकीत अशा पांचहि बोटांवर हिऱ्याच्या आंगठ्या चमचम करीत होत्या. उसन्या सौंदर्याने स्त्रियांच्या ठिकाणीं मादकता निर्माण होते. तीच मादकता नीलीच्या डोळ्यांत कोनकडावरून ओसरूं लागली. झपझप पावले टाकीत ती बागेच्या बांधावर आली. क्षणभर थांबली. मनीबॅग उघडून तिनं आपल्या इवल्याशा आरशांत मुखशृंगाराचे अवलोकन केले. लहानशा पफने तोंड साफ केले. विस्कळलेले केस चपखल बसवून ती म्हणाली,

" कुठं आहेत रे ? "

" इथंच होते ते आत्तां— "

" याचा अर्थ काय ? जा, त्यांना पाहून आण ! येत नसतील तर सांग, की, तुम्हाला नीलीसाहेबा बोलावित नसून या शेताची मालकीण बोलवित आहे...... " वाक्य पुरे झाले असेल नसेल तोच झाडाआडून अशोक पुढं आला.

' कोण मालकीण— ? '

' मी— ' नीलीने मान हलवून मंदस्मित केले.

' छे '

' छे, म्हणजे ? '

' शेताचे मालक बाळासाहेब आहेत, नी चालक प्रकाश आहे हे मी मागेच आपणाला सांगितलय्. खरं पाहू गेलं तर आपल्या वडिलांचादेखील या शेतावर हक्क नाही. दीर्घ काळाच्या खडानं प्रकाशन ही जमीन घेतली असतांना हिचे खरे मालक, पालक, चालक, प्रकाश व त्याचे सहकारी भाई आहेत. आपण वडिलांच्या एकुलत्या एक, व लाडक्या कन्या असाल—पण बापाचा वारसाहक्क मुलीकडं येत नाही.'

नीलीला या भाषणान क्षणाक्षणाला राग येत होता. अशोककडे रागानं पहाण्यासाठी तिच्या वटारलेल्या पापण्या मोठ्या अवसानाने वर होत; परंतु नेत्रस्थ बाहुल्यांनी मोठ्या सावधगिरीनं त्यांना सावरून धरावे. स्त्रियांच्या डोळ्यांतील बाहुल्या सर्वज्ञ असतात. पुरुषांवर आपली छाप कशी पाडावी, त्यांना कसं वश करावे हे यांना चांगले माहित असते. अल्लड कुमारिकांना भ्रूलीलांचा पहिला धडा याच देतात. यासाठीं स्त्रियांच्या हृदयमंदिरांत कुणाहि पुरुषाला प्रवेश करावयाचा झाल्यास त्यास या बाहुल्यामार्फत आपले संकेत, संदेश, नी संवेदना आंत पोहचवावे लागतात. या संदेशसंवेदनांची आंत वर्दी दिल्याशिवाय मनोगताच्या वक्तव्यासाठीं ओठ ' दुभाषी 'पणा करीत नसतात. नीलीच्या चढत्या रागाचा रागरंग बाहुल्याच्या लक्षांत येतांच त्यांनी पापणीचे पडदे पटापट खाली केले व त्यावर भ्रुकुटीची मोहक आवरणे घातली. यामुळे नीलीच्या गालाओठावर फणफणणारा राग झरकन् ओसरला. रागाच्या

ओहोटीनं तिच्या गालावर नाजुकशा खळया उमटल्या ! स्त्रियांचा राग ी अनुराग फार विचित्र असतो. रागाने गाल फुगतात तर अनुरागाने यांची चटकन् कळी उमलते ! रागाने डोळयांच्या पापण्या ताठरून अस्मानाला भिडूं पहातात तर अनुरागानं त्यांची उघडझांपही नीट होत ाहीं ! नीली राग नी अनुराग यांच्या संमिश्र भावनांच्या दोल्यावर बसून ोके घेत होती !

'आपणास माझा खरंच राग आला ?—' नीलीने किंचित् काकुळतीचा कटाक्ष फेकित विचारलं.

'राग येण्याचा मान आमचा नसतो–श्रीमंताचा असतो."

'क्षणभरं तुम्ही असंच समजाना मी गरीब आहे म्हणून—"

'कल्पनेनं श्रीमंत गरीब होते तर आज झाडून सारे गरीब कल्पनेनं श्रीमंत झाले असते ! हे पहा ! गरीबीश्रीमंतीचं पुराण जगाच्या आरंभाासून जगाच्या अंतापर्यंत असंच चालू रहाणार. जगाच्या अंताबरोबर तरी याचा अंत होईल कीं नाही याचीहि शंकाच ! तुम्ही इथं यावेळी व तेहि ाझ्याकडे कां आलात ? आपलं कांही काम आहे का ?'

'होय !'

'काय काम आहे ?'

'फार महत्त्वाचं काम आहे.'

'ठीक आहे. आपण फार वेळ घेणार नाहीं ना ?' अशी औपचारिक पृच्छा करीत अशोकनं वाहत्या पाटाच्या पाण्यांत आपले ात धुतले.

'हं चला आमच्या प्रयोगशाळेत !' असे म्हणत अशोक पुढे नी ीली त्याच्या मागे चालूं लागली. अंधाराची छाया पडूं लागल्यामुळे ेताच्या ढेकळांतून चालतांना नीलीची खूप तारांबळ उडे. श्रीमंताच्या ा तकलुपी जीवनाकडे पाहून अशोक मनांतल्या मनांत हंसूं लागला.

* * *

अशोकची प्रयोगशाळा म्हणजे साधी पत्रेवजा पर्णकुटी होती. दार उघडून अशोकनं दिवा लावला. खोली अगदी आटोपशीर होती. जमिनी-

वर एक स्वच्छ सतरंजी, त्यावर साधा तक्क्या, मध्यवर्ती बैठी लिखाण चौपाई असून कोपऱ्यांत साधे फळीवजा मेज होते. मेजावर शेतकी कामास लागणारे रासायनिक माहितीचे बडे बडे ग्रंथ होते. अशोकनं या मेजावर दिवा ठेवला. आपल्या पर्णकुटीत एक स्त्री आली, केवळ या भावनेने त्याने आपले स्त्रीदाक्षिण्य प्रकट केले, व गोड शब्दांत नीलीचे स्वागत केले. अशोकचा मधुर आवाज ऐकून नीलीच्या धडपडत्या जीवाला जरासं बरे वाटले दाराबाहेर तिनं आपला उंच टाचेचा बूट काढून ठेवला. व आशातुर परतु हळव्या वृत्तीच्या हळूवार आविर्भावानं ती सतरंजीवर बसू लागली.

'अहं! आपण अशा खुर्चीवर बसा–'

'कां?'

'मी म्हणतो म्हणून!' अशोकच्या या विनंतीवजा हुकुमानं नीलीच्या मनाला किती गुदगुल्या झाल्या! ती मुकाट्यानं खुर्चीवर बसली. दुसरी खुर्ची नाहीं असे पहातांच ती म्हणाली, 'अन्, आपण कुठं बसणार?'

'हा इथं'–असे म्हणत अशोकनं जवळचे पांगारी खोकं मेजाजवळ ओढलं व त्यावर तो बसला. नीली त्याच्याकडे पाहून हंसू लागली.

'माझ्या पोषाकामुळं आपणास हसू येतं?'

'हो!'

'कां?'

'कारण पोषाखच मुळीं तसा आहे आपला!'

अशोकचा पोषाक शहरवासियांच्या अपरिचयाचा होता! अशोकसारख्या सुशिक्षित माणसानं कोपरीवजा कुडतं घालावं, साधा पंचा नेसावा, हे पाहून कोणासहि आश्चर्य वाटणे साहजिक आहे. नाही म्हणावयास त्याच्या या विचित्र पोषाखास हातामधलि सुवर्णमुद्रिका थोडीशी शोभा देत होती.

'हा आमचा खेड्यांतला पोषाक आहे. पण आपला—'

'हा आमचा शहरांतला पोषाक आहे' नीली चटकन म्हणाली. अशोकच्या पोषाकाकडे नीलीची नजर बराच वेळ खिळली. अखेर तिनं

काखेमधील वर्तमानपत्राचा अंक काढला. वर्तमानपत्राच्या अगदीं पहिल्या पानावर गौरवप्रसंगी घेण्यांत आलेले अशोकचं छायाचित्र तिनं दाखवले.

'अशोक! हे चित्र पहा नी हे चित्र पहा!' असं म्हणत नीली हंसली. 'तुमच्या या पोषाकाकडे पाहून कोण म्हणेल की, हेच ते महान् शोधक अशोक म्हणून—' अशोकनं न बोलतां अंक हाती घेतला. व चाळण्यास सुरवात केली. पान उलटून पाहतांच त्यास पुन्हां आपले पुष्पभाराने सजलेले छायाचित्र दिसले. ह्या छायाचित्रांत प्रदर्शनाच्या वेळी नीली अशोकच्या अभिनंदनार्थ हस्तांदोलन करीत होती. अंक नीलीपुढं टाकून अशोक किंचित् उपहासानं म्हणाला,

'आपलं हेच काम आहे वाटत? एवढ्यासाठी आपण इथं आलांत?'

नीलीचे डोळे प्रेमभरान भरून आले. अतिस्नेह पापशंकी असतो. तसेच स्नेहाचा पहिला अपरिचित प्रहरहि अतिसाशंकी असतो. 'अशोकला हे छायाचित्र आवडलं नाही का?' या विचारानं ती गोंधळली.

'एवढ्यासाठी नाही आले मी—' नीलीला पुढं बोलवेना. ओठावर हृदयाचा प्रेमपाठ आतुरतेने डोकावत होता. पण त्याला वाचा फुटत नव्हती. नेत्रांतून भाव प्रकट करावेत तर त्या ठिकाणी अधत्व आले होते. हृदयाची बोली बोलायची तर-तिच हृदय तिजजवळ नव्हते. गालावरील स्मित छटांनी भावना प्रकट कराव्यात तर-स्त्रियांचे गाल नुसते दर्शनीय असतात. त्या मुक्या गुलाबांना वाचाळ करण्याची कला फक्त पुरुषांनाच अवगत असते. नीलीचा नाइलाज झाला ती नुसती टकमका पहात राहिली. मेजावर कोपरे उभे करून नीली बोलणार तरी काय याची अशोक मार्गप्रतीक्षा करूं लागला. दोघांमध्ये दिवा झळकत होता. वाऱ्यानं ज्योत हालली की, नीलीच्या चेहऱ्यावरील धांदरत्या भावना दृग्गोचर होत. त्या लपविण्याकरितां मधून मधून आपल्या चिमटीवजा रुमालाने ती तोंडओठ पुसू लागे. तिचे ओठ परिस्थितीनं प्रारंभी कोरडे पडले, पण दीपप्रकाशांत अशोकच्या नेत्रांची प्रभा जसजशी प्रकट होऊ लागली तसतसे तिचे अधरद्वय थरथरत व त्यावर प्रेमाची ओलसर झांक चमकूं लागे. पांच मिनिटे झाली, कोणीच कांहीं

बोलेना! त्या मुग्धतेमधून अशोकच्या बोटामधील सुवर्णमुद्रिकेचा आवाज उमटला. त्या निमित्तानं नीलीनं आपली दृष्टि अधोगामी केली. अशोकच्या ध्यानांत आले. त्यान हात हळूं हळूं मागे घेण्यास प्रारंभ केला. 'तुमचं काय काम आहे? अस बसायला मला मुळीच वेळ नाही—' अशोकच्या बोलण्याकडे अणुमात्र लक्ष न देतां नीली त्या अगठीकडे पहात म्हणाली.

"अशोक, ही अंगठी कुणाची? आपलं लग्न झालंय वाटतं—"

'हातांत अंगठी असली म्हणजे ती लग्नाची असते असा कांही अनादिसिद्ध सिद्धांत आहे का?'

'तस नाहीं! पण अलिकडे प्रेमचिन्ह म्हणून अशा अंगठ्या वापरण्याचा प्रघात आहे—'

"अस्स! त्यादृष्टीनं बोलावयाचं झाल्यास आपल्या हातांत पांच अंगठ्या आहेत! याचा अर्थ आपण पांच जणांची प्रेमचिन्हं बाळगतां कां?"

'पांचजणांचे नाहीं तरी पांच प्राणांचे हे प्रेमचिन्ह आहे.'

नीलीनं मंदमधुर स्मित केलं. भलताच विषय निघाला म्हणून अशोक चुळबूळ करूं लागला.

'सांगा ना, ही अंगठी आपण कां घातली!'

'आपण हा प्रश्न फार अगाऊपणे विचारतां असं नाहीं वाटत?'

'मुळीच नाही. उलट अगाऊपणापेक्षां अगत्यपणाच आहे यांत.'

'कांही कां असेना! आपण या विषयावर चर्चा करूं नये असं मला वाटतं.'

'पण मला तसं वाटत नाहीं.'

'वाटत नाहीं असं म्हणणं शोभत नाहीं आपणाला!'

'मला बोलणं शोभत नसलं तरी अंगठी किती शोभून दिसते तुम्हाला! शोभा देणारी अंगठी–हं. अशोक! हात असा लपवूं नका!'

धीरोदत्त वृत्तीचा अशोक! पण या मर्मभेदक प्रसंगानं तो गोंधळून गेला. अंगठी पहाण्यासाठीं नीलीने हात पुढे करतांच अशोक उठून उभा राहिला. 'आपलं हेंच काम आहे का?'

‘ होय ! ’

‘ म्हणजे ? ’

नीलीहि उठून त्याच्यासमोर उभी राहिली. दोघेहि परस्परांच्या हृदयांतील गूढें नेत्रांच्या हालचालीमध्ये हुडकण्याचा प्रयत्न करूं लागली. नीलीने मनीबॅग उघडून हळूंच एक अंगठी अशोकपुढे केली.

‘ ही पहा ! अगदी तुमच्यासारखीच आहे ना माझी ही आंगठी ? ’ अशोक स्तंभित झाला व आंगठी घेण्यासाठी त्याने हात पुढे केला. तिची नी आपल्या हातामधील अगठी पडताळून पहातांना अशोकच्या डोळयापुढं ब्रह्मांडच्या ब्रह्मांड उभे राहिले.

* * *

पांच वर्षांपूर्वी शेतकी कॉलेजमधील ती गोष्ट ! अमेरिकेंत वनस्पतीचे शोध लावण्यासाठी परदेशगमन करण्याची अशोकची फार मोठी महत्त्वाकांक्षा ! पण जन्मदरिद्र्याचे मनोरे बांधतां बांधतांच मुरड पडून महिरून जातात. अशोकच्या कुशाग्र बुद्धीमुळं शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपॉल रानडे यांची अशोकवर फार बहाल मर्जी ! अशोकला परदेशांत पाठविण्याची त्यांची स्वतःची फार इच्छा ! अनेक प्रयत्न करून पाहिलं तथापि त्यांना फारसे यश आले नाहीं. पण—

एक दिवस, बाळासाहेब कुबेर मुंबईहून सहज पुण्याला सुट्टींत रहावयास आले असतां ते आपल्या सर्व परिवारासह शेतकी कॉलेज पहावयास आले. अर्थात् त्यांच्याबरोबर नीलीही होती.

कॉलेजचे प्रायोगिक उद्यान पाहून त्यांना फार आनंद झाला. उद्यानांत जिकडे नजर टाकावी तिकडे मयसभेप्रमाणे अनेक चमत्कार त्यांना दिसले. सामान्य द्राक्षांच्या वेलीला फार फार तर शेपन्नास घोस येतात. पण याठिकाणीं एकेका वेलीवर पांचपांचशे घोस लोंबले होते. अगदीं उत्तम कपाशीच्या रोपास ७५-८० कापसाचीं बोंडे येतात. पण या उद्यानांत एकेका रोपास ७०० पर्यंत बोंडे आलीं होतीं. हीं बोंडें लांब धाग्याची असून व्हेरम, तांबडी पत्तीसारख्या कोणत्याहि अव्वल दर्जाच्या जातीला मागें टाकित होतीं. ही चमत्कृति नवीन खतांची,

कमल पद्धतीची असून तिचा सर्वस्वी जनक अशोक होता. प्रिन्सिपॉल रानडे अभिमानानं आपल्या विद्यार्थ्याची ओळख बाळासाहेब कुबेरांना करून देत होते. पण बाळासाहेबांना त्यांत कांहीं विशेष वाटले नाहीं. 'ठीक, छान, असेच झालें पाहिजे' वगैरे अमृतबोलीचे गोड आशीर्वाद देऊन ते पुढे चालूं लागले. प्रथम भेटीत अशोकनं सन्मानानें बाळासाहेबांना नमस्कार केला; त्यावेळी नीली त्याच्याकडे कुतुहलान पाहूं लागली. तिला अशोकच्या उजव्या हाताचे सहाव, बारीक बोट दिसले; व तिला लहानपणी 'भूक, भूक' करणाऱ्या पोराची मूर्ती दिसूं लागली. ती मूर्ती नी अशोकची मूर्ती अखेर अखेर एकरूप झाली. तिला नवी दृष्टी, नवी सृष्टी दिसूं लागली.

* * *

हाच तो अशोक कां? असा विचार तिच्या मनांत सारखा घोळूं लागला.

एक दिवस सहज ती वर्तमानपत्र वाचित असतां तिला प्रिन्सिपॉल रानडे यांच्या सहीचं एक विनंति पत्रक दिसलं. अशोकला संशोधनकार्यासाठीं अमेरिकेला पाठविण्यास धनिकांनीं सढळ मदत करावी असा या पत्रकाचा आशय होता. हें पत्रक वाचून तिला काय वाटले कोणास ठाऊक! ती तडक प्रिन्सिपॉल रानडे त्यांच्या बंगल्यावर गेली.

नीलीनं प्रथम अशोकची सर्व उपलब्ध माहिती प्रिन्सिपॉल रानडे यांच्याकडून गोळा केली व अशोकला परदेशगमनासाठी बरीच मोठी रक्कम देण्याचे कबूल केले. पण त्यापूर्वी तिनं प्रिन्सिपॉलला एक अट घातली. 'अशोकला आज मी वडिलांच्या इच्छेविरुद्ध, खाजगी पैशांतून मदत करीत आहे. तेव्हां ही गोष्ट प्रिन्सिपॉलनी कोणालादेखील सांगूं नये. फार काय, याचा मागमूस खुद्द अशोकलाहि लागतां कामा नये. शिष्याच्या उत्कर्षासाठीं प्रि. रानडे यांना ही अट कबूल करणे जड गेलें नाहीं. या अज्ञांत दानशूर व्यक्तीचं नांव त्यांनी अशोकला अखेरपर्यंत कळूं दिलं नाही. अशोक त्या पैशावर अमेरिकेला जावयास निघाला.

अशा प्रकारें गुप्त दान करण्यांत नीलीचा अंतस्थ हेतू फार निराळा होता. एक तर तिच्या वडिलांनीं अशोकला मदत करण्याची नाखुषी व्यक्त

केली होती. दुसरे, बाळाहेबांना गरीब लोकांबद्दल किती कळकळ होती हें तिला माहीत होतं. म्हणून तिनं ही मुग्धता स्वीकारली.

अशोक बोटीवर चढला असतां त्यास कुणीतरी एक पाकीट दिलें. तो मागे वळून पाहणार तोंच ती व्यक्ती निघून गेल्याचें त्याच्या ध्यानांत आलें. तथापि ती स्त्री होती याची त्याला जाणीव होऊन त्या क्षणापासून त्याच्या जिवाला चांगलांच चटका बसला! त्या पत्रांत फारच थोडा मजकूर होता:–'

'प्रिय अशोक---

'मी कोण हे हुडकण्याचा प्रयत्न करूं नका! परदेशगमन करून आपण खूप कीर्ति मिळवावी या एका उदात्त हेतूनंच आपणास येवढी मोठी रक्कम दिली आहे. त्याबद्दल तुम्ही कसलेही उपकार मानूं नका! परदेशांत त्रिभुवनकीर्ति मिळवून आपण परत स्वदेशी याल त्यावेळी बोटीवर आपल्या स्वागतार्थ अनेकजण येतील-मीहि येईन. अन्--मग मी कोण आहे, आपणास कां मदत केली याचा उलगडा करीन. पण-आपली ओळख कशी पटणार? सोबत मी एक सुवर्णमुद्रिका पाठवित आहे. ती जपून ठेवा. तिची दुसरी प्रतिमा मजजवळ आहे. बोटीवर आपल्या भेटींत आपल्या या समसाची, समाकारी मुद्रिका आपल्या हृदयाचे संदेश न सांगतांच कथन करतील. ईश्वर आपणास यश व कीर्ति देवो. चिअरो. वुश यु बेस्ट लक.''

आपली

(नांवाची कोरी जागा भेटीनंतरच भरून काढीन)

* * *

गेल्या पांच सहा वर्षांत अशोकने हे पत्र हजार वेळां तरी वाचले असेल. प्रिन्सिपॉल रानडे यांना प्रत्येक पत्रांमधून या अज्ञात व्यक्तीचा उल्लेख करून विचारणा करी. पण प्रिन्सिपॉलसाहेब त्याला कसचे दाद देणार? प्रिन्सिपॉलच्या या गोड वर्तनामुळे ही अज्ञात व्यक्ती खुद्द

प्रिन्सिपॉल रानडे यांचीच कोणी तरी संबंधित असावी असा अशोकचा समज झाला. या सर्व प्रकरणांत नीली आहे हे त्याला कळते तर कदाचित् त्याने ही मदत घेतलीही नसती. किंवा या अज्ञात व्यक्तीसाठी तो मनातल्या मनांत झुरलाहि नसता. कारण श्रीमंतांच्या दीर्घ द्वेषानं त्याचं मन अगदी पछाडलं होतं.

एक वर्षभर अशोकची प्रि. रानडे यांना नियमित पत्रं येत. त्यांत या अज्ञात व्यक्तीला शतशः प्रणाम असत. ही पत्रे नीलीने आपणाजवळ ठेवून घ्यावी व त्यांची फावल्या वेळी पारायणे करावीत. मधून मधून बिनसहीची अशोकलाहि गमतीदार पत्रे पाठवावीत असा नीलीचा उपक्रम असे. पण वर्षानंतर ही पत्रे येईनात. अशोकची वार्ता कळेना. दुर्दैवाने प्रि. रानडे हृद्रोगाने या काळांत वारले. अशोकची सर्व स्वप्ने हवेतच विरून गेली व त्यास अमेरिकेहून सक्तीनं परत यावं लागले.

दिवसामागे दिवस गेले. आपल्या काव्यमय सृष्टीचा असा अनपेक्षित शेवट झाला म्हणून नीलीला जगांत, जीवनांत बिलकुल सार वाटेना; पण परवां प्रदर्शनांत अशोकची अशी अचानक भेट झाली, तिला अभिमानानं आकाश ठेंगणं झालं. तिच्या मृताशांना नवनि अंकुर फुटले, वठलेल्या भाववृक्षास नवीन पालवी आली व त्या क्षणापासून तिच्या मनाला पुनश्च गोड हुरहुर लागून राहिली. अशोक आपल्या निकट सान्निध्यांत, अगदी आपल्याजवळ, आपल्या शेतांत असून आपणास कळू नये याबद्दल तर तिला फार आश्चर्य नी वाईट वाटले. ज्या क्षणाची आपण उत्कठेने वाट पहात होतो तो सुवर्णक्षण आज, आत्ता आला हे पाहून ती अशोकला डोळे भरून पहात होती. अशोकला हीं असंख्य घडामोडीची दृश्ये पहातांना काय वाटले? तो विस्मयचकित भावनेने नीलीकडे पहात राहिला.

* * *

बऱ्याच वेळानंतर नीली म्हणाली, 'अशोक! माझी ओळख पटली कां?'

'होय!—पण मला आपण क्षमा करा! मी आपला महान् अपराधी आहे. आपली मी विलक्षण वंचना केली. आपल्या पैशाचा

उपयोग मला नीट करतां आला नाहीं. आपल्या मोठमोठ्या आशा मी मातीमोल केल्या. माझं जीवनचरित्र धूमकेतूसारखं आहे. जीवनांत प्रकाश आहे, पण परिवर्तन नाही. चैतन्य आहे पण गति नाहीं. मति आहे पण माणुसकी नाही. मला अफाट कार्यक्षेत्र आहे, पण अचाट कार्यशक्ति नाही. बुद्धि आहे पण जीवनाची शुद्धि नाहीं. जगाबद्दल समता आहे पण स्वतःच्या जिवाबद्दल ममता नाहीं. अमेरिकेत मी गेलो नी परत आलो. आपले पैसे नी माझ्या गोड आशा समुद्राच्या अथांग पाण्यांत बुडाल्या...'

'अन् माझ्या आशा—?'

'अहोरात्र आपल्या अज्ञातपणाचा मी विचार केला, हा माझ्या आयुष्यांतील अत्यंत मोठा अविचार झाला.'

'पण, अहोरात्र मी अत्यंत विचारानं आपला विचार केला, आपलं चिंतन केल, अन् आज—'

'आपण माझ्याबद्दल ही कळकळ कां बाळगलीत?'

'केवळ जीवितांत काव्य निर्माण करण्यासाठी! जीविताला रिझवण्यासाठी!'

'म्हणजे?'

'अशोक! मी पांच वर्षं किती दुःखांत काढली याची आपण थोडी तरी कल्पना करा—'

'दुःख! श्रीमंतांना दुःख असतं? गरिबांप्रमाणं श्रीमंतांना खरोखरीच दु ख असतं?'

'होय! गरीबापेक्षांहि श्रीमंतांना जास्त दुःख असत! सुख ही संसाराची छाया आहे. आणि दुःखही ससाराची माया आहे. सुखाप्रमाणं दुःख लहान थोर, गरीब श्रीमंत असा कधीच पक्षपात करीत नाही. दु.ख आहे म्हणूनच जीवनससार चालला आहे...'

नीलीने दीर्घ निःश्वास सोडला. डोळे अर्धवट मिटले. निमिषमात्र ती निःशब्द झाली. विश्रब्ध जीवाला निःशब्दताच विराम नी आराम देते. थोड्या वेळाने तिच्या थरथरत्या ओठांमधून अस्पष्ट शब्द बाहेर पडले,

' अशोक ! तुम्ही फुलांची हृदये जाणतां, फुलाप्रमाणं आपल्या मनोवृत्ती हलुवार नी कोमल आहेत, फुलांच्या अंतरंगाचा ठाव घेणारे आपण— अन्—'

' अन् काय ? '

' माझं हृदय जाणत नाही आपण ? '

' नाही ! आज मी ज्ञेयांतून अज्ञेयांत, प्रकाशांतून अंधारांत, माणुसकींतून मृत जगांत-उलट्या चालीनं प्रातिगामी जविन जगत आहे. कारण मी अगतिक आहे. मला गति नाही–'

' गति नसल्यास मी देते. '

' कां ? ही तसदी कां घेतां ? '

' आपण असं एकेरी जीवन कंठू नये म्हणून ! एकेरी जीवनांत कधींच सुख नसतं. होय माझा स्वतःचा हा अनुभव आहे–'

' सुख नी दुःख सर्व कांहीं भावनेचे खेळ आहेत ! परिचयानं, एकेरी जीवनांतहि सुदर सूर ऐकूं येईल. एकतारीमधून सुंदर सूर निघत नसतात कां ? '

' एकतारी छेडणारा सुंदर जीव जवळ असतो म्हणून तिच्यांतून सुंदरता निर्माण होते. एकेरी जीवन सुदर होण्यासाठी प्रत्येकास सुंदर जीवाचा आधार लागतो.'

' ही गोष्ट खरी आहे. पण मजकडून आपण तशी अपेक्षां करूं नका. '

' पण माझी उपेक्षां तरी आपण कां करावी !

' भीन्न जीवन, भिन्न ध्येय, भिन्न परिस्थिति ! आपल्या बाबतींत सर्वच कांहीं भिन्न आहे. समतेचा लवलेश नाही. मनुष्यप्राणी म्हणून आपले अन्न नी हवापाणीहि समयोगी नाहीं. भिन्नता समता निर्माण करूं शकत नाही. उलट त्यांचा संगम सर्वस्वाच्या नाशाला कारणीभूत होतो.—मला वाटते, आपण येथेच थांबूं या ! मोह मादक असतो, मोह मारक असतो.—'

आपल्या मोहांतच्च माझा मोक्ष आहे. अशोक ! आपण माझा अनादर करूं नका !'

'आपण लक्षाधीश आहांत, मी भिक्षाधीश आहे. ही दोन परस्परविरोधी टोकें एकत्र आलीं तर, तर मी माझ्या समाजांत जिवंत असून मेल्यासारखा होईन !'

'मघांच सांगितलं ना आपणांस की मी तुमच्यासारखी गरीब आहे म्हणून समजा–' असे म्हणून नीलीने मेजावर पसरलेल्या अशोकच्या हाताची नखाग्रे आपल्या बोटांनी हळूंच हातांत धरली. ह्या गोड स्पर्शाने अशोक गोंधळला. आपण हे स्वप्न तर पहात नाहीं ना असा त्याला भास झाला. डोळे घट्ट झांकून ते उघडले. पण नीलीची मूर्ती त्याच्या डोळयापुढून हलेना. तो हतबुद्ध झाला. समाजसेवा, ध्येयवाद श्रीमंतांच्या विरुद्ध मोहीम, अन् नीली यांचे हे तुंबल युद्ध होते.

'माझे ध्येय—'

'तुमच्या ध्येयसगीताची मी साजिंदी होईन, आजच्या रुक्ष संसाराची मी कालिंदी होईन. अशोक ! मी तुमची पडछाया होईन. प्रकृती पुरुषाची पडछायाच असते ना ?'

'मजबद्दल तुम्हांला येवढं प्रेम कां वाटाव ?'

'मी अपराधी आहे म्हणून प्रेम वाटतं !'

'अपराध ? तुम्ही माझा अपराध केलात-?'

'होय ! तुम्हाला मी बोलावलं ! 'भूक, ! भूक !' करीत तुम्ही माझ्याकडे आलांत, नी-पपांनी–,' नीली हुंदके देऊन रडूं लागली-'पपांनीं-तुम्हांला मारलं, माझ्याकरतां तुम्ही चाबकाचे फटके खाल्ले ! मी आपली फार महान् अपराधी आहे......'

अशोकच्या मनावर पुनश्च आघात झाला ! जीवन कादंबरीमय तर नाही असं त्याला वाटूं लागलं ! वीस वर्षांपूर्वीचे दृश्य तो निश्चल नेत्रांनी पहात होता, तर नीली निश्चल नेत्रांतून टप्टप् अश्रू ढाळित होती.

'अशोक!' असे म्हणून तिनं त्याचा हात घट्ट धरला. अशोकनं बिलकूल हालचाल केली नाही. इतक्यांत—

* * *

'अशोक--' अंधारांतून आवाज आला,

'कोण प्रकाश?' अशोक खडबडून जागा झाला.

* * *

'नीली--'

'कोण पपा?' नीलीनं अशोकचा हात सोडून ती दूरवर उभी राहिली. या दोघांच्या दूरपणांत त्या दोघांना सहानुभूतीची संलग्नता भासली. सर्वजण परस्परांकडे पहात राहिले. कधी कधी नाण्यांच्या झंकारांतहि अशी विचारी पण विचित्र मुग्धता निर्माण होते.

## तळमळ नी भूक : : ३

त्या रात्री सर्वांचीं हृदये सारखी तळमळत होती. अशोकच्या प्रयोग शालेमधून नीली आपल्या वडिलासह बागेतील बंगल्यांत परत आली. सुधावहिनींनी तिला पाहतांच तोंडसुख घेण्यास प्रारंभ केला.

'हीच का व्यवस्था केलीत वन्सं ? बंगल्याचं कुलूपदेखील उघडलं नाही अगोदर इथं येऊन ! पिकनिकचा प्रारंभ तर छान झाला.' नीली नुसती गप्प बसली.

रात्रभर पपा काय म्हणतील याचा विचार ती करीत होती. वस्तुतः ती बाळासाहेबांची फार लाडकी ! पण तिला पपाबद्दल भीति वाटूं लागली. घरी दारी ऐश्वर्याचे ऐरावत झुलत असतां लग्नासारख्या जीवनरम्य प्रश्नानें तिला अशी व्याकुलता कां यावी ? त्याला तशीच कारणपरंपरा होती. बाळासाहेबांचा स्वभाव अत्यंत चमत्कारीक होता. त्यांना अमुक गोष्ट पसंत आहे नी अमुक नापसंत आहे हे त्यांच्या चिरसहवासांत राहिलेल्या मंडळी-नाही नीट कळत नसे. चिरपरिचित मंडळी अनेकवेळां गमतीनं म्हणत, 'बाळासाहेब, एकवेळ राजकारण कळेल, पण तुमच्या स्वभावाचं गूढ कांही कोणाला कळणार नाही.'

बाळासाहेबांचं वय चाळीस पंचेचाळीसच्या सुमारास होतं. गर्भश्रीमंतीची तेजस्वी छटा त्यांच्या विशाल नेत्रांत नी भालप्रदेशावर सहज दृग्गोचर

होई. तथापि चेहऱ्यावर एक प्रकारची गंभीर छटा नेहमींच असे. त्याच-बरोबर या तत्त्वज्ञानी चेहेऱ्यास त्यांचा पोषक विरोधी विकाराची तीट लावी दर तीन तासांनी ते आपला पोषाक बदलत असल्याने तत्त्वज्ञा-नाची गंभीरता व छानछोकीची विलासप्रियता एकत्र संलग्न कशी झाली हे सर्वांना गूढ होते. डोळयांत नेहमी कुऱ्हेबाजपणा दिसे. कित्येक वेळा हा अहंकारी भाव नीलीलाहि भेदरून सोडी. या अहंकारभावांत श्रीमंतीचा दिमाख जसा समावलेला होता तद्वतच त्यांच्या जीविताची अनेक गुपितें दडून बसली होती.

बाळासाहेब मूलतः सहासात गांवचे जहागिरदार! शेतीवर त्यांनीं अलोट पैसा मिळवला! याच पैशावर त्यानी मुंबईत सुताच्या तीन टोलेजंग गिरण्या काढल्या. दहा पांच चाळी नी राजविलासी बंगलेहि बांधले! या-मुळे खुळे जग त्यांची गणना ‘ अतुल धाडसी पुरुषांत ’ करी.

पण सारे श्रीमंत धाडसानेच श्रीमंत होतात का? व्यापारी धाडस म्हणजे सभ्य, शिष्टसंमत अनीति आहे. हजारो गरीबांना गिळून श्रीमंत गबर होतात. त्यांच्यांत प्रत्यक्ष कर्तृत्वशक्ती फार थोडी असते. एकाद्या गरीबाने गरजेसाठी एकादी वस्तु लांबवली तर ती बेकायदेशीर चोरी ठरते, तो दरोडा होतो. पण सर्वांच्या डोळयात धूळ फेकून, समाजाला बोटावर नाचवून, दुसऱ्याच्या संपत्तीचा अपहार केला, लुटालूट केली, प्रत्यक्ष दरोडे घातले तरी श्रीमंताच्या बाबतीत ते व्यापारी कसब, व्यापारी धाडस ठरते. या धाडसाचा पुरस्कर्ता महान् पुरुष मानला जातो. पैसा नीतीनं कधीच मिळत नाही. सर्व पैसेवाले संभावित दरोडेखोर आहेत! पण उघडपणे असे म्हण-ण्याची जगाची ताकद नाही.

बाळासाहेबांचं हृदय त्यांना आंतल्या आंत नेहमी हेंच सांगे. इतकें असून आपण लक्षाधिशाचे कोट्याधीश केव्हां होऊं अशी त्यांना नेहमीं हुरहुर लागे. पैसा कमवतांना पापपुण्य, नीतीअनीति यापैकी कशाचीच कदर त्यांना वाटत नसे. पोटच्या पोरांच सुख पैशाआड येत असेल तर श्रीमंत पोरांनादेखील ओळखित नाहीत.

नीलीच्या वडील भावाची कहाणी हेच सांगत होती. तिच्या भावाने

एका गरीब मुलीशी लग्न करण्याचे ठरविले होते; पण ही गोष्ट बाळासाहेबांना पसंत पडेना. त्यांनी एका प्रसिद्ध संस्थानिकाच्या कन्येशी सक्तीनं त्याचा विवाह केला. त्यांत त्यांचा नेहमीचा पैशाचा लोभ होता. संस्थानिकास वारसदार असे मुलीखेरीज कोणी नव्हतं. योगायोग आला तर आपल्या मुलाला गादी मिळेल या आशेने त्यांनी मुलाच्या जीवाचे मातेरे केले लग्नाच्या बरोबर बाराव्या दिवशीं मुलाने आत्महत्या करून जीव दिला बाळासाहेबांना त्याबद्दल कांही सुद्धां वाटले नाही. पांच लाख रुपये हुंडा मिळाला, विम्याचे दोन लाख रुपये मिळाले! बाळासाहेबांचा हा पराक्रम नीलीच्या डोळ्यापुढें उभा होता. आणि म्हणून ती भीत होती. अशोक गरीब-श्रीमंतांचा द्वेष्टा आहे-पपा आपणास विवाह लावूं देतील का? (अन् याहिपेक्षां अशोक विवाहास तयार होईल का?) या विचाराने रात्रभर ती सारखी तळमळत होती.

* * *

अशोक आपल्या बिछान्यावर असाच तळमळत पडला. 'मी कुठं जात आहे? ध्येयाकडे कीं धनाकडे? स्वार्थाकडे की समाजाकडे?' असे त्याच्या मनांत अनेक प्रश्न येत! आपल्या तीव्र बुद्धीनं तो या प्रश्नाची समर्पक उत्तरे देण्याचा प्रयत्न करी. नीली श्रीमंत आहे-पण प्रेम आणि श्रीमंतीचा काय संबंध? मी तिच्या श्रीमंतीवर स्वप्नांतहि प्रेम केले नाही! तेव्हां तिच्याशी लग्न केल्यानं माझ्या ध्येयांत फारकत कां व्हावी? फिरून श्रीमंत वाईट असले म्हणजे सारेच श्रीमंत वाईट असतात काय? नीली त्याला अपवाद कशावरून नसेल? ही विचारमाला सुरू झाली म्हणजे त्याला शाळेतील एका गोष्टीची आठवण होई. शिक्षकांचा एकादा विद्यार्थी फार लाडका असतो. या विद्यार्थ्याचे दुर्लक्ष्य झाल्यामुळें त्याने 'कोळसा पांढरा' असतो असे मूर्खासारखे उत्तर वर्गात एकादे वेळी दिले तर शिक्षक त्याची बाजू घेऊन या मूर्ख उत्तराचे समर्थन करूं लागतात. 'पांढरा म्हणजे-करडा-हो, तुला असच म्हणावयाचं होतं ना? 'करडा म्हणजे-धुरकट अर्थात्' 'काळा'! छान......"

'मुलांनो! कोळसा काळा असतो' असें शिक्षक अखेर उद्गारतात.

हीच अवस्था अशोकच्या मनाची झाली. श्रीमंत चटोर,–नीली श्रीमंत– पण आतां तिच्याखेरीज त्याला सारे श्रीमंत चटोर दिसूं लागले. अशोकचं हे परिवर्तन फार झपाट्यानं होत होते. या परिवर्तनांतील प्रत्येक क्षण दारुण तळमळीचा होता.

* * *

प्रकाशची तळमळ त्याहून भिन्न होती. 'एका विशिष्ट ध्येया-साठीं अशोकला लहानाचा मोठा केला, मोठा करून मोठेपणा मिळवून दिला, पण आज तो आपणाला विसरून श्रीमंतीला भाळला; गरिबीला कंटाळला, समाजसेवेला आंचवला, ध्येयापासून घसरला, अन् मलाहि विसरला! अरेरे! अशोक चालला तरी कुठे? अशा विचारांत त्याची सबंध रात्र जावी. झोप मुळींच येऊ नये. कर्तृत्ववान् पुरुष पैसा नी स्त्री याच्या मोहांत पडला म्हणजे त्याची कर्तृत्वशक्ति नष्ट होते, आणि म्हणूनच उभ्या रात्रींत तळमळत नी तळतळत तो भवितव्याकडे डोळे फाडून पहात होता.

* * *

बाळासाहेबांची तीच अवस्था झाली. पण त्यांची तळमळ फार निराळ्या स्वरूपाची होती. व्हराड्यांत विचार करतां करतां मध्यरात्र उल टली नी तेवढ्या अवकाशांत नेव्ही कटचा डबा पाईपमधून त्यांनी खलास केला. अखेर चुटकी वाजवून ते आपणाशी म्हणाले, 'ठीक आहे. यांत कांहींच वावगे नाही–' त्यांनीं कांही तरी ठाम विचार केला. व ते निजावयास जाऊं लागले. इतक्यांत जिन्यांत पावले वाजली. हसण्या खिदळण्याचा सूर आला म्हणून त्यांनीं मागें पाहिले. तो सुधा, रजनी, डॉ. बिलोरे व बजाबा ही मंडळी बागेतील चांदण्यांत फिरून परत येत असतांना दिसली. बाळासाहेबांना सूनबाई सुधादेवी म्हणाल्या, 'पपा! अजून तुम्ही जागेच?'

'होय शू!'

श्रीमंताचा सर्व संसार विचित्र असतो. बऱ्याच श्रीमंताच्या घरीं अलिकडे सुना सासऱ्यांना 'मामंजी' न म्हणतां 'पपा' या नांवाने

हाका मारूं लागल्या आहेत. श्रीमंताच्या घरी नांवाचा नेहमीच दुष्काळ असतो. पैशाच्या उधळपट्टीची काटकसर ते आपल्या नांवांतील अक्षरे कुरतडण्यांत करतात कीं काय कोण जाणे? या कंजुष वृत्तीमुळे बाळासाहेब सुनेला 'सुधा' न म्हणतां, 'सु-शू' म्हणत. 'रजनी' न म्हणतां 'रु' म्हणत, 'नीली' ऐवजीं ते नुसते 'नी' म्हणत!

श्रीमंतांना 'साहेब, हुजूर, सरकार, मालक' अशीं भपकेबाज भूषणे जगाच्या आरंभापासून बहाल करण्यांत आली आहेत. अनादिकालची ही भांडवलशाहीचीं वतनदारी श्रीमंतांना इतकी आवडते की, पिढ्यान् पिढ्या ठराविक नांवापलिकडे त्यांच्या कुटुंबांत अवांतर नांवेच नसतात. पुरुषांच्या नांवापुढे 'साहेब' व स्त्रियांच्या नांवापुढे 'साहेबा' लावण्यांत येतें. नांवाचा तुटवडा पडू नये म्हणून हिंदु धर्माने हजार नांवाची 'विष्णु-नामावली' तयार करून लोकांच्या जिव्हाग्री नाचावयास लावली. इतकी नांवें उपलब्ध असतांना नामाभिधान करतांना श्रीमंत दिवाळखोर कां ठरतात हे कळत नाही. 'भाऊसाहेब, रावसाहेब, आक्कासाहेबा, माईसाहेबा नी ताईसाहेबा' या ठळक नांवापलिकडे श्रीमंताच्या घरात अन्य नावेंच सांपडत नाहीत. सामान्य माणसांनी या नांवाचा उपयोग केला तर ते श्रीमंतांना पटत नाहीं. सामान्य माणसांचीं नांवे 'अरे, जारे, कारे' अशा एकेरी सुराची असतात, श्रीमंताची ही एक लहर आहे.

* * *

दुसऱ्या दिवशीं सर्वजण चहासाठी जमले. बाळासाहेब मध्यवर्ती बसले होते. त्यांच्या शेजारीं त्यांच्या लाडक्या सूनबाई होत्या व त्यांच्या पलीकडे रजनी होती. रजनीशेजारी त्यांचे कौटुंबिक डॉक्टर बिलोरे होते. बजाबांना बसावयास जागाच मिळेना! म्हणून सुधा म्हणाली, "बजा! नीलीजवळ खुर्ची आहे रिकामी, बैस कीं तिथं!" बजाबाने नीलीशेजारीं आसन ठोकतांच नीली खुर्ची घेऊन लांब सरकली.

'कां! नीलूवन्सं! इतक्या लाजलां तुम्ही! समजा उद्यां आम्ही तुझं बजाशींच लग्न ठरवलं तर-"

'वहिनी! माझं लग्न ठरविण्याचा तुम्हांला काय अधिकार? नीली

अर्ध्या रागाने अर्ध्या खवचटपणाने म्हणाली. रजनीशी किंवा सुधाशीं बोलतांना तिची नेहमीं हीच तऱ्हा असे.

दोघीबद्दल नीलीला बिलकूल प्रेम नव्हते. दोघीहि तिच्याच वयाच्या होत्या. पण प्रत्येकीचा स्वभाव अगदी परस्परांच्या विरुद्ध होता.

* * *

आपण संस्थानिकांची मुलगी म्हणून सुधाला अत्यंत चढेलपणा वाटे. आपण आकाशांतून पडलो आहोत ही सर्वच संस्थानिकांची भावना असते; सुधाचीहि होती.

रजनीचा स्वभाव त्याहून भिन्न! आपण संस्थानिकाची पत्नी आहोत याचाच तिला अभिमान! दोघींचेहि अभिमान छिनाल मनोवृत्तीचे होते.

रजनीचे लग्न होऊन ती चारसहा महिने नवऱ्याच्या घरी नांदली असेल नसेल तोच पतिव्रतेने खूप कमाई करून ठेवली. कांहीं श्रीमंताचे उपजत गुण तिनं इतक्या झटपट पाजळले की, अखेर नवऱ्यानं तिला माहेरी परत पाठवून दिली. संस्थानामधून तिला मासिक वेतन मिळत असे. रजनी सौभाग्यसंपन्न विधवा होती, असे म्हटल्यास वावगें होणार नाहीं. विरक्तीच्या नी परमार्थाच्या नांवाखालीं तुळशीच्या माळा घालून चिपळ्यांच्या तालसुरांत ती दिवसभर देवभजन करी. भगवीं वस्त्रे नेसावीत, एखाद्या बुवाची दिंडी निघाली कीं तिच्यापुढें बेशाक टाळ कुटित नाचत फिरावे. घोड्यांच्या रेसचा सीझन आला, म्हणजे हा वैराग्याचा सर्व नूर पालटून ती विलासप्रिय होई.

* * *

सुधावहिनींचं तर कांहींच विचारूं नका! व्याख्याने द्यावींत, मोठमोठ्या मासिकांतून लेख लिहावेत, पांडित्य सांगावे हाच त्यांचा कार्यक्रम! या कार्यक्रमामुळे त्यांचा सर्वत्र उदोउदो होई. एका दृष्टीने त्या नवमतवादी होत्या. त्यांतच त्यांच्या आचारविचारांच्या कल्पना संपूर्णपणे प्रतीत होऊं शकतात. गाजावाजा करून प्रसिद्धी मिळविण्याची कला त्यांना चांगलीच अवगत होती. मध्यंतर त्यानी रजनीदेवी व आपले

एक दूरचे भाचे मिळून एक काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. या संग्रहांत इथून-तिथून साऱ्या कविता चोरून आणल्या होत्या; पण महाराष्ट्र तसा रसिक आहे. ह्या उमऱ्या शिदोरीवरहि साऱ्या महाराष्ट्राने स्तुतीचा नुसता वर्षाव केला. श्रीमंताची चोरी पैशाच्या प्रभावांत पचते. गरिबांची चोरी पैशांच्या अभावांत फुटते. ज्याना ज्यांना चोऱ्या करावयाच्या असतील त्यांनी प्रथम श्रीमंत व्हावे नी मग बेशक चोऱ्या कराव्या. होय, हा माझा प्रामाणिक सल्ला आहे. बाळासाहेबांना हे सारे माहीत होते. पण त्यांच्या त्या 'लाडक्या' सूनबाई होत्या. नीलीला सर्व कांही समजे, पण त्याची दखलगिरीच ती करीत नव्हती.

खुद्द नीलीचा स्वभाव अत्यत निराळा होता. आधुनिक उच्च शिक्षणाने ती सुसस्कृत झाली होती. पण शिक्षणासह विलासी वृत्ती तिच्या ठिकाणीं परमावधीला गेल्या होत्या. कादबऱ्या वाचाव्यात, नाटक सिनेमा पहावे. नटनटींचे वैचित्र्यपूर्ण पोषाक पाहून त्यांची नक्कल करावी, यांतच तिला मौज वाटे. शाळा कॉलेजांत असतांना ती गंधर्वाच्या नाटकास हमखास ठेवलेली! गंधर्वाने प्रवेशाला पातळ बदललें की हिनेही दुसऱ्या चष्म्यांत जाऊन तसेच पातळ नेसून यावे. असा फाजील नटवेपणाचा शोक तिला होता. मनाचा हूडपणा नी तारुण्याचा ताठरपणा अलिकडे मात्र नरम पडत चालला. पण जगांत कीर्ति मिळवण्याचं तिच वेड मात्र अद्यापि गेले नव्हते. तिचा हाच 'वुईक पॉईंट' होता. अशोकसारख्या कफल्लक कीर्तिवन्तावर यासाठीच ती प्रेम करूं लागली. अशोक महान् शोधक होणार, जगांतील अनेक वर्तमानपत्रांत त्याची छायाचित्रे येणार, दशदिशा त्याचा गौरव होणार! अशा महान् शोधकाची आपण अर्धांगी झालो तर आपलाहि आपोआप गौरव होईल या भावनेमुळे तिला अशोक म्हणजे परमात्मा वाटे.

* * *

आतां, चहापानाचे वेळींची खडाजंगी मामुली होती. 'वहिनी! माझं लग्न लावण्याचा तुम्हाला काय अधिकार आहे?' असे नीली म्हणतांच सुधादेवीने, 'मग हा अधिकार कोणाचा?' असा नेत्रपल्लवी

प्रश्न भ्रूकुटी उडवीत बाळासाहेबांना विचारला. बाळासाहेब बिस्किटाचा तुकडा मोडित म्हणाले, ‘ज्याचे ते मुखत्यार आहेत! तरुण-तरुणींच्या लग्नाच्या भानगडींत आईबापांनी लक्ष घालण्याचे दिवस आतां उरले नाहीत! नीलीनं उद्यां स्वयंवर केले तरी माझी त्याला हरकत नाही!’

‘पण पपा! स्वयंवरात हुडा आडवा आला तर—’ ओठावर उमटलेल्या अर्ध्या हास्यात नी डोळयावर खेळणाऱ्या अर्ध्या भीतीच्या स्वरात नीली म्हणाली.

‘किती वेडी आहेस ‘नी’! ‘हुंड्यासाठी कां मी तुझा प्रेमभंग करीन? हा सारा व्यापविस्तार आता तुझा नी त्याचाच आहे—’ नीली धावत पपा-जवळ आली व लाडिकपणाने म्हणाली, ‘त्याचा म्हणजे कुणाचा पपा?–’

‘तूं सांगशील त्याचा–! तुझं एकदां लग्न झालं म्हणजे मी सुखाने विश्रांति घेईन–’

‘खरंच, पपा हे अगदी खरं कां?’

‘वन्सं! अगोदर नवरा शोधा नी मग स्वयंवर मांडा!’

सुधा कुत्सितपणाने म्हणाली.

* * *

या वेळी नीलीची खिडकीबाहेर नजर गेली. अशोक फळांची डाली घेऊन येताना तिला दिसला. चटकन् तिने ‘बॉय—सखावत–’ म्हणून हाक मारली.

‘आधीं खुर्ची आण पाहू तिकडून! अन् हे पहा–ताजा चहा, बिस्किटें घेऊन ये! जलदी लाव.’ हा सरंजाम कुणासाठी आहे हे न कळ-ल्यामुळे सर्वजण परस्परांकडे पाहूं लागली.

‘नीली! कुणाला हवा चहा?’

‘पपा, अशोक आलेत!’ उत्कट उत्साहाने नी उत्कंठेने नीली म्हणाली.

‘असं–’ धूम्रपानाचं निमित्त करून बाळासाहेब हळूंच बाहेर निघून गेले.

' वन्सं ! अशोकला इथं का चहा देणार ? '

' मग कुठं द्यायचा ? '

' अग, कांही झालं तरी तो आपला नोकर आहे ! नोकरांना मांडीशीं घेऊन बसल म्हणजे उद्यां लोक काय म्हणतील ? ते कांहीं नाही ! त्याला पलिकडे खुर्ची मांड ! '

' वहिनी ! नोकर झाले म्हणून ते माणूस नाहीत का ? '

' मग घे डोक्यावर नी नाच ' रजनी म्हणाली.

' आत्याबाई, तुम्हालाहि वाचा फुटली ! माझं काहीच कसं तुम्हाला पसंत पडत नाही ? मी अशोकना इथ या मेजावर, अगदी माझ्या शेजारी बसवून चहा देणार आहे. बोला तुमचं काय म्हणणं आहे ? '

* * *

' अशोकने जिन्यामधून हा सर्व संवाद ऐकला. आल्या पावलीं तो तसाच मागे जाऊं लागला. आपण आलो तरी कां हेहि त्याला कळेना ! गरीबी--श्रीमंतीचा हा दुजाभाव, हा पंक्तिप्रपंच, हा अपमानास्पद आघात अशोकच्या जिव्हारी बसला. गरीब झाला म्हणजे तो माणूस नसतो काय ? माणूसकीचे सर्व हक्क एकट्या श्रीमंतांनाच आहेत काय ? अशा विचाराने तो एक पायरी खालीं उतरला.

अशोक अद्याप कसा आला नाहीं म्हणून पहाण्याकरितां नीली बाहेर व्हरांड्यांत आली. तोंच तिला अशोक परत जातांना दिसला. तिने कावऱ्या मुद्रेने ' पपा–' येवढाच शब्द उच्चारला. अशोकने मागे वळून पाहिले. बाळासाहेबांनी जिन्यावर नजर टाकली. नीलीचा भावार्थ त्यांच्या लक्षांत आला.

' कोण अशोक ! या की वर ! आम्ही तुमचीच वाट पहात आहोत.—' अशोकला नाइलाजाने वर यावे लागले. किंबहुना नीलीचे डोळे त्याला आपोआप वर खेचून आणित होते.

नीली चहा ओतूं लागली. बाळासाहेबांनी अशोकला आंत आणले, व खुर्चीवर बसण्याची विनंती केली.

'ही खुर्ची श्रीमंतांची! श्रीमंतांनींच तिच्यावर बसावं! मी गरीब आहे—' सुधा व रजनीदेवी यांना अनुलक्षून अशोक म्हणाला. या-वेळीं नीलीच्या चेहेऱ्यावर विजयाचे अपूर्व हास्य चमकत होते.

"ही खुर्ची श्रीमंताची नाही नी गरीबाचीहि नाही. मी ही खुर्ची आमच्या जांवईबुवासाठीं खास राखून ठेवली आहे-" बाळासाहेबांनी उच्चारलेले सूचक नी विनोदी वाक्य ऐकून अशोक गोंधळला. नीली आनंदित झाली. सुधा नी रजनीदेवी यांना या जाहीरनाम्याचा अर्थच कळेना! आश्चर्याच्या टकमक नजरेनं ती आं वासून बघत होती.

* * *

चहा--फराळाचा हा कार्यक्रम सारखा पंधरा दिवस चालला. दोन दिवस पिकनिकला आलेली श्रीमंत फौज तब्बल पंधरा दिवस तळ देऊन पडली.

आपला आनंद अगदी जिव्हाळयाच्या माणसाजवळ व्यक्त केल्या-खेरीज त्याला लज्जत नसते. नीलीला तसेच झाले. आजवर कुणासहि निवेदन न केलेला आपला रोमान्स, आपली प्रेमकहाणी तिनं प्रथम आपल्या आईला पत्रानं कळवली. मुलींना खऱ्या विसाव्याचं स्थान मातेच्या ममतेखेरीज कोठे मिळणार! 'मा' नी देखील पत्राने आपल्या मुलीला शुभाशिर्वाद दिला.

आज सकाळी कोठे फिरावयास न जातां नीली 'मा' ला पत्र लिहूं लागली.

'प्रिय मा–

खूप लिहावस वाटतं, पण मनाची एकाग्रता होत नाही. मा– असं कां होतं म्हणून विचारलं तर तूं अ–शो–क' अशी तीनच अक्षरे लिहून माझी चेष्टा करशील! मा! गेले पंधरा दिवस मनाला नुसती हुरहुर लागली आहे. कधी वाटतं की सर्व कांही आपल्या मनासारखं होईल! कधीं वाटतं भाऊसाहेबांसारखं कांहीं वेडंवाकडं झालं तर-!

बाकी पपांना अशोक तसे फार आवडतात. आज पंधरा दिवस ते त्यांच्याशीं प्रहरन् प्रहर गप्पा मारतात. शेती, कामगार, गिरण्या–

एक ना दोन अनेक विषयांवर ते चर्चा करतात. त्यांची अलौकिक बुद्धिमत्ता पाहून पपा मला गमतीन म्हणतात की, 'नीलीला नवरा हुशार मिळेल पण अशोकला बायको मात्र मूर्ख मिळणार!'

—पण मा! 'ते' आपला विचार अजून सांगतच नाहींत. त्यामुळ जीव अधीर झाला आहे. आज संध्याकाळी ते 'हो किंवा नाही' म्हणून पपांना सांगणार आहेत.

—मा! त्यांच मनोगत, त्यांचं माझ्यावरील प्रेम मी केव्हांच ओळखलं! तुला एक गमत सागू का? काल मी त्यांच्या प्रयोगशाळेत गेले होते. ते नव्हते. मी सहज बसले. त्यांच्या साऱ्या पुस्तकांवर, कागदांवर त्यांनी 'नीली' 'नीली' अशी शाईने अक्षरं लिहिली होती. मीहि गमतीन या अक्षरामागे 'सौ.' लिहित होते. इतक्यांत ते आले. मला पहातांच चपापले. चटकन् कागद घेऊन फाडूं लागले. कागद घेण्यासाठीं हात पुढं करतांच मा! मला काय दिसलं? त्यांच्या तळहातावर नी नखावर तशीच 'नीली, नीली' अक्षरं होती. मला किती किती मौज वाटली म्हणून सांगू! त्यांना बरीक लाजल्यासारख झालं! चटकन् साबूने ते हात धुऊं लागले. हात धुतां धुतां म्हणाले, 'लोकांची कागदपत्र वाचूं नयेत--' 'लोकांच्या नांवाचा असा मीनाबाजारहि करू नये!' मीहि टोल्याला टोला दिला; त्यांना शरमल्यासारखे झाले. मा! जीवनांत काव्य नाहीं अस कोण म्हणेल?

त्यांना वाटतं, आपण श्रीमंताशी सबंध जोडले कीं, आपलें शोध जनसेवा, कीर्ति सर्व कांही नष्ट होईल. किती चुकीची कल्पना आहे त्यांची?

मा! परवां त्यांच्या कापसाच्या नवीन शोधावर अमेरिकेच्या मोठ मोठ्या मासिकांतून लेख आलेत! त्या लोकांनीं यांचा केवढा गौरव केला! खरंच, त्यांच्या कीर्तिचंद्राची लहानशी कला होण्याचा मान मला मिळेल का?

अशोकना मीं तुझी सारीं पत्रे दाखवलीं. तीं वाचून ते हंसले.

'मला जिकण्याचे तुझे मार्ग खुटले म्हणून 'मा' ला मध्यस्थ करतेस वाटतं ? असं ते म्हणाले.

त्यांच्या नवीन रंगीत कापसाचे प्रयोग पपा आपल्या गिरणीत करणार आहेत. खरंच, आपण सारी जणं भाग्यशाली नाही का ?

मा ! ते तसे मनमिळाऊ आहेत, मनकवडे आहेत. पण हा मनकवडे-पणा माझ्या ठिकाणी नाही. आज सध्याकाळी ते काय सागणार ?

मा ! लवकरच सायकाळ होईल. आकाशात अनंत दिवे लागतील. चद्रराज मोठ्या डौलानं तारांगणी येतील.

हो–तेहि आपल्या प्रांगणी येतील. मा ! पत्र वाचता वाचतां तूं डोळे झांकून यावेळी आशीर्वाद दे. तुझ्या मंगल आशीर्वादानं मला काय मिळणार नाही ?

आजची तुझी लाडकी,
उद्याची.........
नीली."

## भूकेचा पहिला बळी : : ४

इंदूर भागांत एक प्रसिद्ध सरदार होता.

त्याच्या पदरी शंकर नांवाचा हुजऱ्या होता.

हुजऱ्यानें सत्तर वर्षं एकनिष्ठपणें नोकरी केली.

मालक खूष झाले. शंकरला दोन रुपये 'पेन्सल' मिळाली.

तरीहि हुजऱ्या सरदारांच्या लहान मुलीस सांभाळीत होता.

* * *

सरदारांची मुलगी बागेत खेळत होती.

एक दिवस तिच्या हातामधील सोन्याच्या बांगड्या नाहींशा झाल्या.

पुष्कळ तपास केला, बांगड्या सांपडल्या नाहीत.

शंकराशिवाय बांगड्या गेल्या नाहींत–मालकिणीचा हा वहीम !

* * *

दिवाणजीनीं शंकरला मरेमरेपर्यंत मारलें.

'मी बांगड्या घेतल्या नाहीत. म्हातारपणीं माझ्या पांढऱ्या केसांना काळिमा आणू नका–' शंकर परोपरीनें सांगत होता. त्याचें कोण ऐकणार ?

* * *

तो हुजऱ्या होता.

पोलीसांनी शंकरला पकडले.

दोन दिवसांनी चोरीच्या आरोपावरून शंकरला शिक्षा झाली.

शंकरला सत्तर वर्षांच्या सेवेचं फळ मिळाले. गरीबाची तपस्या पूर्ण झाली !

* * *

चारसहा दिवसांनी दिवाळी आली

लक्ष्मीपूजनाचा दिवस !

श्रीमंतांनी तिजोरी उघडली !

रत्नहार तारांगणाप्रमाणे लखलखत होते.

सुवर्णहार सूर्यकिरणाप्रमाणे झगझगत होते.

चांदीचे अलंकार चांदण्याप्रमाणे चमचम करीत होते.

मालकिणीनं हिऱ्यामोत्यांच्या अलंकारांचा ढीग केला.

मोहरांचा छुमछुमाट सुरू झाला.

वाजंत्री मंगल सूर काढू लागले

हजारो दिवे लखलखले.

तिजोरीच्या कोपऱ्यांत काय चमकते म्हणून मालकिणीनं पाहिले. तो त्या सोन्याच्या बांगड्या !

* * *

सनई चौघडे अधिक जोरांत वाजू लागले.

‘ सोन्याच्या बांगड्या सांपडल्या. ’

‘ कुठ ? ’

‘ तिजोरीत ! ’

‘ शंकराला उगीच शिक्षा झाली. ’

‘ अं ! हे चालायचंच ! ’

* * *

लक्ष्मीपूजन संपल. रात्रौ श्रीमंतांनी पुनश्च बासुंदीपुरीवर ताव मारला. शंकरची आठवण त्यांना झाली नाही. शंकर आपल्या सत्तर वर्षांच्या सेवेचं फळ तुरुगांत भोगीत होता—

पण श्रीमंतांना काय त्याचं ?

*  *  *

चार अक्षरे लिहिण्याचा सदाकदा कंटाळा करणाऱ्या प्रकाशने प्रारभीची शेकरची ही गोष्ट लिहून माझ्या टेबलावर कां ठेवावी ? याचा अशोक विचार करीत होता. गोष्ट वाचून अशोकनं दीर्घ निःश्वास सोडला. इतक्यांत दार उघडून प्रकाश आंत आला. त्याच्या नजरेला नजर भिडवण्याचं धैर्य अशोकला होईना. अधोदृष्टीनं अशोक तसाच बसून राहिला.

‘ अशोक ! झाली तुझी तयारी ? ’

‘ होय ! ’

‘ तूं नक्की जाणार तर– ! ’ अशोक कांही बोलला नाही. प्रकाशने एक दीर्घ निःश्वास सोडला. त्यांत विलक्षण निराशा होती.

‘ अशोक ! तुझ्यासाठी मी एक गोष्ट लिहिली – ’

‘ हो, मी ती वाचली. पण–प्रकाश, मी नको जाऊं का ?

‘ असं मी तुला कसं सांगूं ? ’

‘ मग तुला वाईट कां वाटतं ? ’

‘ कुठ वाईट वाटत ? ’ असे म्हणत प्रकाशने डोळे पुसले.

‘ प्रकाश ! तू खोटं बोलतोस ! सांग, तुझी काय इच्छा आहे ? ’

‘ तूं जगांत मोठा व्हावास, लाखो गरीबाचा पुढारी व्हावास, येवढीच माझी इच्छा आहे— ’

‘ मी तुझी इच्छा पूर्ण करीन– ’

‘ शक्य नाही– ’

‘ अशी शंका कां आली ? ’

प्रकाशचा कंठ दाटून आला.

‘ अशोक ! पैसा फार वाईट आहे. नाण्यांच्या समोर बुद्धि नाचूं लागली म्हणजे विवेक गुलाम होतो. आज तूं बुद्धिवान् आहेस, तरुण आहेस, ताज्या रक्ताचा आहेस-मनांत आणशील तर नवी सृष्टि निर्माण करशील. पण– ’

‘ प्रकाश– ’ मजबद्दल तुझ्या मनांत असा विकल्प कां येतो ? ’

'आजचा अशोक 'उद्यां' मला पहावयास मिळणार नाही म्हणून-'

'मी तुला स्वप्नांत तरी विसरेन ?'

'मला विसरलास तरी चालेल! पण—'

'पण-! मग मी कोणाला विसरेन असं तुला वाटतं?'

'गरीबाना! गरीबांच्या अनंत दुःखांना! गरीबांच्या भूकेला तूं विसरशील—!

'कारण?'

'पैसा!'

'प्रकाश! मी पैशाचा लोभी नाही. पैशासाठीं मी जात नाही.'

'प्रेमासाठी?'

'नुसत्या प्रेमासाठीहि नाही! उपकाराच्या फेडीसाठी मी जात आहे.' अशोक प्रकाशजवळ आला. त्याने नीलीचा सर्व वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून प्रकाशने एक सुस्कारा सोडला व म्हणाला,

'अशोक! तूं सुभाषबाबूंच उदाहरण डोळयापुढं ठेवाव अशी माझी फार इच्छा होती. आय. सी. एस्. सारख्या नोकरीवर त्यांनी लाथ मारली. त्यांतच त्यानी हिंदी तरुणांना दिव्य संदेश दिला आहे. बुद्धिवान् तरुण जोपर्यंत सरकारच्या, भांडवलवाल्याच्या, श्रीमंताच्या आहारी जातात, त्यांचे बंदेगुलाम होतात, तोपर्यंत—'

'तोपर्यंत काय? प्रकाश स्पष्ट बोल—'

'तोपर्यंत गरीबांना खरा वाली मिळणार नाही. गरीबांच्या भूकेची आग शमणार नाही.'

अशोक निरुत्तर झाला आपण जाऊं नये असे त्यास वाटूं लागले. पण इतक्यांत दाराशी मोटार आली.

'चालो, चालो, गोकुल रे' हे गोड पद गुणगुणत नीली दाराजवळ आली. 'अशोक, अशोक!' अशी अल्लड हांक तिनं मारली व आंत प्रकाशला पाहून ती ओशाळली. क्षणभर ती गप्प बसली. या क्षणी नीलीची मोहकता कांही और होती. लहान मुलाप्रमाणे तिने तोंडांत चॉकलेट धरले होते. त्यामुळे मुखांतील लाल ओठांच्या कडावरून रुळे व ओठांचा

लुसलुसीतपणा नी चकचकीत शोभा संवर्धित करी. या गोड ओठांमधून उमटलेली ‘ अशोक ’ ही अक्षरं अशोकला अमृतासारखीं गोड वाटली. नीलीच्या मुखांतील चॉकलेटांप्रमाणे अशोकचा निर्धारही विरघळूं लागला.

‘ झाली तयारी ? ’

‘ हो—’

‘ मग चला की--’ अशोकने न कळत ट्रंक हाती घेतली.

‘ अऽऽहं ’ असे लाडिकपणे वेल्हाळित नीलीने ट्रंक खालीं ठेवली

‘ म्हणजे ? मला ही बरोबर घ्यावयाची ! ’

‘ हो, पण ती तुम्ही नाही घ्यावयाची आता–’ अशोक पुन्हा ट्रंक घेऊ लागला. नीलीने अशोकचा हात धरून ठेवला व मोटार ड्रायव्हरला हाक मारली. चटकन् सामान मोटारीत गेले. त्याच क्षणी अशोक परावलंबी झाला असे प्रकाशला वाटले. आपले स्वातंत्र्य, आपला स्वावलंबीपणा नीलीने हिरावून घेतला अशी अशोकला शंका आली.

अशोक दाराजवळ गेला. पुन्हा मागे आला. हळूच वांकून त्याने प्रकाशच्या पायावर मस्तक ठेवले. प्रकाशने आशीर्वादासाठी आपले हात फक्त पुढे केले.

* * *

नीलीने अशोकच्या खांद्यावर हात ठेवून विचारले, ‘ हे कोण ? ’

‘ प्रकाश ! ’

‘ तुमचे कोण ते ? ’

‘ जगाच्या दृष्टीनं कोणी नाही. मनाच्या दृष्टीनं तो माझा पिता, माता, गुरु, भाऊ. तो माझं सर्वस्व आहे—’

‘ अस्सं—’

‘ तुम्हाला मी नमस्कार करते अं ! ’ प्रकाशकडे वळत नीलीने नुसते हात जोडले. खाली वांकणं तिच्या श्रीमंती अभिमानाला लाजिरवाणे वाटले असावे. अशोकला हे आवडले नाही. पण अशोकचीं हीं हृद्गते नीलीला कोठून कळणार !

* * *

मोटार गेली. अशोक गेला.

मुख्य फाटकाजवळ सर्व मंडळी यांचीच वाट पहात होती. गांवांतील हजार-पांचशे लोक, शेतकरी, त्यांची मुले नी स्त्रिया आशातुर जंतूप्रमाणं या श्रीमंती वैभवाकडे पहात होतीं. त्यांच्या अंगावर लंगोट्यांखेरीज कांही-सुद्धां नव्हते; पण सर्वांनी श्रीमंतासाठीं कांही ना कांही नजराणा आणला. सुधादेवी व रजनीदेवी हे नजराणे कशा प्रकारचे असावेत याची आपापसांत चर्चा करीत होत्या.

सर्वांकडे पहाताच अशोकला गहिवर आला. ही रम्य हिरवींगार शेते, मोटांचे झुळझुळणारे पाणी, गाईंची गोजीरवाणी खिल्लारे, अनंत फुलांनीं नटलेली भूमि, अनंतकाल थुईथुई झरणारा हा अमृत झरा, त्रिखंड धुंडूनहि न मिळणारी या शेतकऱ्यांची मायाममता-अरेरे! मला ही कायमची पारखी होणार का? अशोकला कांही सुचेना, कांही रुचेना! अशोकचा कुत्रा त्याच्याजवळ येऊन पाय चाटूं लागला. शेतावरील लहान मुले 'अशोकभाई' आमी येऊं का?' म्हणून नाचत बागडत अशोकला विचारूं लागली. त्याचे आईबाप त्यांच्या बालवृत्तीला आळा घालण्यासाठी त्यांना मागे ओढू लागले. अशोकचे डोळे भरून आले.

* * *

नजराणे सुरूं झाले. अशोकला रहावेना. तो पुढे झाला व बाळा-साहेबांना म्हणाला, "मला एक गोष्ट सांगावयाची आहे आपणाला! आपण दहापांच वर्षांत एकदां इथं पायधूळ झाडणार! त्यावेळी पूर्वपरंपरेप्रमाण आपणाला मानाचा नजराणा नजर करण या पिढीजात गुलामांना भाग पडते. आपणाला कल्पना येणार नाही; घरेदारे गहाण टाकून, शेताची पिकें विकून यांनीं हे नजराणे आणले असतील. नजराणे सुंदर आहेत. पण त्यांत उपाशी पोटाच्या किंकाळया, त्यांच्या मुलाबाळांच्या भूकेचे तळतळाट आहेत. आपण हे नजराणे घेऊं नका—"

बाळासाहेब चपापले. मान हलवून त्यांनी नजराणे परत केले. सुधादेवी नी रजनी परपस्परांस डोळे मिचकावून 'काय वेडपट माणूस आहे!' म्हणून खुणावूं लागल्या. भराभर मोटारी निघून गेल्या. चिर-

सहवासाची गोड दृश्ये धुळीच्या आवरणांत नी अंधाराच्या पटलांत विलीन होऊं लागलीं.

मोटार वेगाने चालली, तरी अशोकच्या डोळयांपुढून ती शेते, त्यांतील शेतकरी बराच वेळ हालेनात. मोटारचा घरघर आवाज होत होता. अशोकला वाटले गाई हंबरून– ' अशोक भूक लागली ' असे म्हणत आहेत. शेतकरी जीव खरडून, ' भूक लागली ' म्हणून ओरडत आहेत. प्रकाश आ वासून ' भूक ! भूक ! ' अशा मुक्या किकाळया फोडीत आहे—अशोकने कानावर हात ठेवला. इतक्यांत नीलीनं आपला गोंडस हात अशोकच्या खांद्यावर हळूच ठेवला. अशोक दचकला. ' अं ! हा मोटारचा आवाज ! उगीचच्या उगीच मी भांबावलो, ' असे तो मनाशीं पुटपुटला. अगदी अंधारांतून, गर्द झाडींतून मोटार जात असतांना नीलीने आपला हात आणखी थोडा पुढे केला अशोकचे परिवर्तन सुरूं झाले. हळूं हळूं ती शेते गेलीं. प्रकाश गेला, नी त्या सर्वांच्या ठिकाणी त्याला ' नीली 'ची मूर्ती दिसूं लागली.

श्री नी धी यांचा हा संगम होता कीं सामना होता ? कोण कोणाला जिकतो याची ही अपूर्व चढाओढ होती. झाडींतून निघून मोटार वळणावर आली. नीलीने आपला हात या खांद्यावरून दुसऱ्या खांद्यापर्यंत नेला. ड्रायव्हरने किंचित् मान वळवली. अशोक ओशाळला. आपण हरलो असे त्यास वाटले. त्याने चटकन् नीलीचा हात खाली केला. ' आपण जिकलो ' या विजयी विचाराने नीली आनंदीत झाली.

गळयाशी हात ठेवून नीली आपली, आपल्या ध्येयाची गळचेपी करीत आहे असे अशोकला वाटले. पण पळापळाला त्याचे परिवर्तन होत होते.

मोटारची घरघर तशीच चालूं होती. त्यांत अशोकला आतां ' भूक ! भूक ' असा प्रतिध्वनि ऐकूं येत नव्हता.

* * *

खिशांत प्रकाशच्या गोष्टीचा कागद होता. ' शंकरला सत्तर वर्षांच्या

सेवेचे फळ मिळाले' हा संदेश खिशांतील कागद अशोकच्या हृदयास सांगत होता. अशोकने कागद मुद्दाम खिशांत दाबला, त्याचा चुरळा केला.

'खिशांत काय आहे?' नीलीन विचारले.

'कांहीं नाही—' अशोक पुटपुटला.

* * *

'काय झालं?'

'कांही नाही.'

'अस्सं! आम्ही शिकलेल्या पोरी सासरी जातांना कधीच रडत नसतो. पण शिकलेले तरुण सासरी जातांना रडतात हे मला आजच कळलं.' नीली मोठ्यानं हंसली. हास्याच्या आवेशात ती स्तब्ध बसलेल्या अशोकजवळ, अगदी जवळ, फारच जवळ आली.

सर्वांच्या अगोदर नीली मोटारमधून उतरली. अगदी लहान मुलांप्रमाणे धावत जाऊन तिन 'मा'च्या गळयाला मिठी मारली. आईच्या मंगलसूत्राशी खेळत खेळत ती म्हणाली, 'मा! अशोक आले—' पोरीच्या चिरंतन सुखाची काळजी वहाणाऱ्या 'मा' साहेबांना केवढा आनद झाला! त्या उठल्या नी अशोकला सामोऱ्या गेल्या.

ही आमची 'डी मा' बरं का!' अशोककडे पहात नीला म्हणाली.

'डी मा?—हा काय नवीनच शब्दप्रयोग आहे?'

''डी' या शब्दात 'मा-पपांचा' रोमान्स आहे. पुष्कळांना याचा अर्थ कळत नाही. 'मा'चं लग्न होतांच ती पपांना 'डीअर' म्हणत असे, नी पपा 'मा'ला 'डीअर' म्हणत. पुढे आमच्या देखत असं कसं म्हणाव म्हणून दोघांनी 'डिअर' शब्दास संक्षेपी स्वरूप देऊन ते परस्परांस नुसते 'डी' म्हणू लागले. गंमत आहे ना? हो, 'मा'नीच हे सर्व सांगितलं. पत्रांतदेखील ही दोघे 'तुझा डी' 'तुझी' डी' असं लिहितात.' आईबापांच्या तारुण्यांतील रोमान्स यांच्या तरुण मुलीने सांगितला. पण 'मा' साहेबांना राग न येतां उलट त्या हंसल्या. अनेक वर्षांत त्यांना संसारांतील असं सोज्ज्ल सुख लाभलं नव्हतं!

त्या विनोदाने म्हणाल्या,' नीली! पण हे कोण?'

‘ हे होय ? खरंच, तुमची कशी ओळख करून देऊं ? ’ नीलीने अशोकला विचारले.

‘ माझी ओखळ ? मीच करून द्यावयास हवी ! ’

‘ कां ? ’

‘ ओळख करून देण्याइतकी माझी तोंड ओळख तरी तुम्हाला आहे ?’

‘ हो, तर, तर— ’ नीलीनं एक नाजुकसा मुरका मारून ती चपले-प्रमाणे जिना चढून वर जाऊं लागली. अशोकने नम्रपणे ‘ मा ’ना नमस्कार केला. चार पायऱ्या चढून जातांच नीली मागे वळून म्हणाली,

‘ मा, आशीर्वाद दिलास वाटतं ? ’

‘ हो, पुत्रवान् व्हा म्हणून आशीर्वाद दिला- ’ मासाहेब मातेच्या वत्सलतेने हंसल्या.

मातेचा हा आशीर्वाद ऐकून नीलीनं नुसते ‘ इश्श ’ केले. स्त्रियांच्या ‘ इश् ’ शब्दांत केवढे ब्रह्मांड भरले आहे ! राग, अनुराग, पसंती, नापसंती, होकार, नकार, खुषी, नाखुषी,--इश् शब्दात काय नाही बरे ?

*　　　*　　　*

अखेर नीलीचा मंगल विवाहदिन आला !

श्रीमंतांचं लग्न म्हणजे छोटा दिल्लीदरबार असतो. या दरबारांत श्रीमंतीचे, श्रीमंत हृदयाचे खरेखुरे प्रदर्शन पहावयास मिळते. नाण्यांच्या झंकारानं विलासी भूतें कशी नाचतात हे नीटपणे पहावयास सांपडते. नीलीचा विवाह अशाच भरजरी थाटाचा होता. पाहुण्यारावळ्यांनी, संस्था-निकसरदारांनी, घर कसं गजबजून गेले. बंगल्याच्या भव्य मैदानांत पांचशे पाहुण्यांसाठी राहुट्या, शामियाने उभारले. तंबूंत चौफेर कलाबुती गालिचे, कोच, बिलोरी आरसे नी सर्व राजविलासी थाट करण्यांत आला. रात्री भव्य आवारांत दहापांच हजार विद्युत् दिवे लागले.

हे ‘ दिपवाळी--वैभव ’ पहाण्यासाठीं गोरगरीबांच्या झुंडीच्या झुंडी येत व म्हणत, ‘ याला म्हणावं वैभव ! नाही तर आहेतच आमच्या परळच्या चाळी ! ’ गरीबांचे हे खिन्न, विमनस्क हृदयाचे बोल ऐकून अशोकला भडभडून येई. आम्ही जेवतां जेवतां व नाचरंग करतां करता पेशवाई

बुडवली असे म्हणतात, ते आजच्या श्रीमंतांच्या लग्नपद्धतीवरून कित्येक वेळा खरे वाटू लागते.

बंगल्याच्या गच्चीवरून नीली नी अशोक हे परस्परविरोधी देखावे पाहूं लागली, म्हणजे दोघांच्या हृदयांत भिन्नभिन्न भावांच्या लाटा उसळत! आज आपण आपल्या आयुष्यांतील अमर सुखाचा क्षण उपभोगीत आहोत असं नीलीला वाटे, तर अशोकच हृदय, त्याच्या भावना, त्याच्या चित्तवृत्ती या विलक्षण नी झटपट जीवनक्रांतीमुळे बधिर झाल्या होत्या. मूकपणे तो नीलीच्या प्रेमळ आज्ञा पाळी व मधून मधून 'हे झाले तरी कसे ?' याचा विचार करी ! एका दृष्टीने त्याच्या ठिकाणी इतकी खिन्नता व व्याकुळता आली की, त्याने लग्नांत कुणालाहि निमत्रण केले नाही. पण नीली तशी हुशार होती. अशोक नको, नको, म्हणत असता तिनं प्रकाश, शेतावरील त्याचे सहकारी या सर्वांना अगत्याची निमंत्रणे पाठवली.-पण त्यांपैकी कोणीही आले नाही.

अशोकच्या उदास मुखाकडे पाहून नीली म्हणे, 'तुम्हाला होतंय् तरी काय ?' या प्रश्नाने अशोक उसने अवसान आणून हसे व नीलीच्या कळकळीला नी कळवळ्याला तात्पुरता विराम देई.

अंतरपाट धरला ! सावधानाची सरबत्ती सुरू झाली. अशोकची छाती धडधडूं लागली. त्याच्या डोळ्यापुढे प्रकाश, शेते, शेतकरी, पटापट दिसूं लागले. मंगलाष्टकाऐवजी, 'तुझ्यासारखे बुद्धिमान् तरुण श्रीमंतांच्या आहारी जोपर्यंत जातात तोपर्यंत गरीबांना खरा वाली मिळणार नाही.--' हे प्रकाशचे शब्द आपल्या कानांत घुमत आहेत असे अशोकला वाटले. रामदासाप्रमाणे आपण पळून जावं असं त्याला वाटूं लागले. पण हा विचार संपतो न संपतो तोच ताशे वाजंत्री कडकडले, नी नीलीची साताजन्माची बंधने त्याच्या गळ्यांत पडलीं.

* * *

श्रीमंतांचा जांवई म्हणजे स्थानबद्ध राजबंदी असतो. कुठं जावयाचं नाही, कुणाशी अघळपघळ गप्पा मारावयाच्या नाहींत, बहिर्विधीला जाऊं म्हटले तर तत्पूर्वी सतराशे संदेश नी आदेश चौफेर द्यावे लागतात.

इकडची वर्दी तिकडे, तिकडची वर्दी वरती, वरची वर्दी खालीं असा सम्राट्शाही कारभार करावा लागतो. उभ्या आवारांत जावईबुवांच्या बहिर्विधीची बातमी पसरली म्हणजे जावईबुवाना जागचे उठतां येत. अशोकला याचा कंटाळा आला. पण प्रत्येक श्रीमंत घरांतील हा हरघडीचा खेळ आहे हे त्याला काय माहित ?

लग्नाची व्यवस्था सूनबाईकडे नी रजनीकडे होती ! प्रारभी त्या लग्नाला हजर रहाणार नव्हत्या. त्यांच्या मनांत नीलीचं लग्न बजाबाशी कराव अस होतं. बजाबा सुधाचा अतिभाऊ होता. या विचारानंच सुधानी त्यास दोनतीन वर्षे मुद्दाम आपल्या जवळ ठेवून घेतले होते. नीलिचं लग्न अशोकशीं आपण कां करीत आहोत हे बाळासाहेबानी सूनबाईच्या कानांत सांगतांच त्यांनी अखेर लग्नाचा पुढाकार घेतला.

श्रीमंतांचं लग्न म्हणजे गरीबांची धांवपळ ! वस्तुत: लग्न मालकाचं पण श्रीमताच्या गुमास्ते, नमस्ते, रास्ते नी आस्ते–लोकांच्या जीवांची कुतरओढ ! ‘ हुजूर नी सरकार ’ शब्दांचा जप करीत श्रीमंतांच्या आश्रितांना अविश्रांत हलावे लागते, झुलावे लागते, व दर क्षणी नाक घासून नमावे लागते. मेणाची कळसूत्री निर्जीव बाहुली इतकीं झुलवली, नमवलीं तर तीही अखेर स्वाभिमानाने कळीचे सूत्र तोडून तटस्थ होतात. पण आम्ही माणसासारखी माणसं स्वाभिमान सोडून मरेपर्यंत श्रीमंतांपुढे कां झुलतो ? निर्जीव मेणाच्या बाहुलीइतकाही स्वाभिमान आमच्यांत नाही ? श्रीमंतांनी जगांतील सर्व माणुसकी अधाशी राक्षसाप्रमाणे गिळंकृत केली असं अशोकला वाटे.

* * *

लग्नाची व्यवस्था ठेवण्यासाठी अनेक मंडळे, अनेक ‘ पोट ’ कमेट्या निर्माण करण्यांत आल्या. पण या ‘ पोट ’ कमेट्या सर्वस्वी श्रीमंतांच्या ‘ पोटा ’साठीं होत्या. चहामंडळ, फराळमंडळ, भोजनमडळ, स्नानमंडळ, स्वागतमंडळ, ‘ बिछायतीमंडळ ’ फार काय बहिर्विधीमंडळहि नेमण्यात आले. श्रीमंताच्या विवाहांत महत्त्वाची मंडळे म्हणजे बिछायतीमडळ नी ‘ पेयपानमंडळ ’ हीं असतात. कारण श्रीमंतांचे सर्व रंगेल विलास या मंडळाशिवाय कधीच पार पडणे शक्य नसतें. इतकीं मंडळे नेमून अखेर

व्यवस्थेचा बट्याबोळ उडालाच ! त्यांत नमस्ते वा गुमास्ते यांचा कांहीं दोष नव्हता. कारण श्रीमनाची तैनात करणे म्हणजे मारक्या म्हशी-रेड्यांना न्हाऊं घालण्यासारखें दुर्घट काम असतें. एकेका मंडळांत फार फार तर दोन-चार लोक असावयाचे. अन् प्रत्येक श्रीमंतांना एकावेळी दहापांच माणसें झालरमोत्याच्या झुली चढवावयास लागायची. फिरून श्रीमत म्हणजे कांहीं सर नारायण मडलीक नसतात. इथून तिथून सारा लहरीचा कारखाना ! सगळे श्रीमंत बहिर्विधीला जावयाचे म्हणून तद्विषयक मंडळ तंबूशी उभे राही व त्यावेळी श्रीमंत चहापान करीत. चहाची वेळ होतांच चहा मंडळ आले की श्रीमंत म्हणे स्मश्रू करीत असल्याची वर्दी येई. थोडक्यांत मंडळाच्या योजना पांढऱ्या कागदावर काळ्या शाईच्या रोषनाईपलीकडे फारशा फलद्रूप झाल्या नाहीत.

* * *

हिंदु समाजांत धर्माच्या नांवाखाली हरिजनांना जितके वाईट रीतीने वागवतात त्याच्या शतपट निर्दयतेने श्रीमंतांच्या घरी गरिबांना वागविण्यांत येते. पोट जाळण्यासाठी हरिजनवस्तीत जाऊन नरक सावडावा पण श्रीमंताच्या मेल्या अन्नाची नोकरी करूं नये.

लग्नांत गरीबश्रीमंतीचा पक्षपात प्रत्येक पावलागणिक होई. हजार हजारांनी पानांच्या पंक्ति उठल्या, पण ' खाशा पंक्ती 'ची मिजास कांहीं न्यारी होती. चित्रविचित्र रांगोळ्यांमधून गुलालाची खैरात केली होती. चांदीच्या चौरंगावर तवतवीत, धारदार नी पल्लेदार केळीची पाने ठेवून त्यावर चांदीचे ताट मांडावे, पुढे मागे चांदीच्या चौफुल्यांचे शिसवी पाट मांडून ताटाभोवतीं दहादहा चांदीच्या वाट्या ठेवीत. शेजारीं प्रसिद्ध इतिहासपुरुष ' रामशास्त्री प्रभुणे ' खांद्यावर स्वच्छ रुमाल टाकून प्रत्येक पानामागे वाळयाचा विंझणवारा श्रीमंतांना घालीत. श्रीमंतांना जेवण्याचेहि श्रम सहन होत नाहींत ! जेवण संपतांच आंचवायला केशराचे सुगंधी पाणी घेऊन दुसरा शागीर्द शिस्तींत उभा असावयाचा !

पण त्याच मंडपांत, त्याच खाशा पंक्तीसमोर आश्रितांची पंगत किती करुणास्पद होई. या पंगतीला ' पत्रावळी पंगत ' किंवा ' खर्ची पंगत '

म्हणतात. श्रीमंताचे ताट एम्. एस्. एम्. रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाप्रमाणे भरगच्च भरलेले असावयाचे तर जर्णिशीर्ण पत्रावळीवर चटण्या कोशिंबिरीचे मामुली हात फिरत. इकडे पंचपक्वान्ने घवघवत आहेत तर तिकडे उष्टावळीची आरास थवथवत आहे. खाशा स्वारीच्या पानांवर पक्वानाचे पर्वत असतील तर पत्रावळीवर कण्याची वारुळं दिसतील. इकडे घृतकल्यामधुकल्या ओसंडत असतील तर तिकडे चमचाभर तुपाने पंक्तीचे पात्रप्रोक्षण होई.! श्रीमंतांचा हा मानपान गरीबांच्या उपहासासाठी असतो काय? अन् गरीब तरी इतके लाचार कां होतात?

श्रीमताचे जेवण म्हणजे रंगभूमीवरील फार्स असतो. सकाळपासून सर्व श्रीमंत गुरासारखे चरत असतात. आकंठ जेवल्यावर पानावर ही मंडळी नुसतां लहान पोरासारखा 'अवकड चावकड दामाडूचा' खेळ करूं लागली तर त्यांत काय नवल? आजकाल बहुतेक श्रीमंत अभक्ष्य-भक्षण पंथाचे असतात. तेव्हां दूधभात, मेडयाच्या भाजीचे जेवण कोठून पसंत पडणार? भर पंक्तींत मनसोक्त जेवणे श्रीमंत दरिद्रीपणाचे लक्षण समजतात. अन्न परब्रह्म आहे, परब्रह्माची ही विटंबना श्रीमंत थांबतील तर अनेक कुटुंबे त्याच अन्नांत सुखाने दिवस काढतील.

* * *

लग्न संपलें! आलेले पाहुणें गेले. त्यांचे तंबू झाडतांना पायली पायली सिगारेटची राख, व्हिस्की, ब्रॉडीच्या पांचपन्नास बाटल्या व दिवाणजीच्या हातांत ताजमहाल हॅाटेलचीं एकं दहंपासून सहस्रापर्यंत लंबी चवडीं बिले शिल्लक राहिलीं.

* * *

लग्नांत बरेच बडे सरदार आले होते. जातांना त्यांना मात्र चांगली चाट बसली. सुंदर चेहेऱ्याच्या मोलकरणी पासून तो खाशा स्वाऱ्यापर्यंत यांना लहान मोठीं बक्षीसे द्यावी लागलीं. हीं बक्षीसे कशासाठीं दिलीं, हे एक बक्षीस देणारास, घेणारास वा फारफार तर त्यांच्यावर नेहमीं माया करणाऱ्या अंधारास माहित. श्रीमंताच्या गाद्या-गिरद्यांना वाचा असती तर जगांत झाडून साऱ्या श्रीमंतांचीं रहस्ये

चव्हाटयावर बोलूं लागतीं. पण पैशाच्या झंकारांत गाद्यागिरद्यांचा कंठशोष कोणी तरी ऐकला असतां काय ?

*　　*　　*

श्रीमंताच्या लग्नांत कुणी तरी ' महाराज ' ' बुवा ' हे हटकून असतात. रजनीदेवींने महाराजांची गोतावळ, लागेल तर भुतावळा म्हणा, खूप गोळा केली होती. महाराष्ट्रांत आजचे बहुतेक संस्थानिक, सरदार कोणत्या ना कोणत्या महाराजांच्या चरणी लागलेले असतात. गरीबांना अधिक सवंगपणे कसे गिळतां येईल, यासाठी हे संस्थानिक--सरदार एखादी ' सिद्धी ' साधण्याची तर खटपट करीत नसतीलना ?

*　　*　　*

लग्नाचा अतरपट धरीत असतां रजनी महालक्ष्मीवर रेससाठीं गेल्याच. या दिवशी त्या खूप हरल्या. घरी येताच नीलींचा नवरा पाढऱ्या पायाचा आहे म्हणून त्यानी कुरकुर केली.

झालं ! सुनमुखीच्या मिरवणुकीत दारूची रोषणाई झाली. त्यांत सरदार ताबे याचा ' नानासाहेब ' व भगवतराव कारकुनाचा ' नानू ' ही दोन लहान मुले भाजली. ' नानू ' अधिक भाजला. नी नानासाहेबांस थोडीशी कुठ जखम झाली. पण दुनिया गरीबांसाठी नसते. नानूला दवाखान्यांत पाठवला व नानासाहेबांसाठी तीन डॉक्टर नी दोन परिचारिका सेवासुश्रुषेसाठीं आणल्या होत्या. गरीबाना ' आत्मा नसतो का ?'

ऐन मिरवणुकीत अशोकचा इमानी कुत्रा कोठून आला कोणास ठाऊक. श्रीमतांनी तो मोटारीजवळ येतांच त्यास बडवले. पण सुधा नी रजनीदेवीच्या मोटारीत त्यांचे ' लॅप डॉग ' मात्र रेशमी झुलीन बाहेर तोड काढून बसले होते.

लग्न संपले ! बक्षिसासाठीं सर्व सेवक आशाळभूतपणे पाहूं लागले. श्रीमताचे फर्मान निघाले, " लग्नांत ४० कपबशा, ५० चमचे, दहापांच फुलपात्रे हरवली. त्यांची किंमत सर्व नोकरांच्या पगारांतून कापून घ्या ! " श्रीमंताची काटेकोर व्यवहारदक्षता ही अशी असते. जाईल तेथे हत्ती नाहीं तर मुंगीला देखील वाव मिळावयाचा नाहीं.

लग्न म्हणजे जीवनक्रांति असते ! या क्रांतीमधील खरे शस्त्र नी अस्त्र स्त्री असते. स्त्रियांच्या मोहिनीइतके प्रभावी अस्त्र त्रिभुवनांत नाही. पण या प्रभावी मोहिनीअस्त्रांत संजीवनाचा असा सद्‌गुण आहे तसेच विषारी वैगुण्यहि आहे. या मोहिनी अस्त्राच्या लाभाबरोबर पुरुष स्मृतिहिन होतो. आपली माणसेहि त्यास नीटपणे ओळखतां येत नाहीत. डोळ्यांना अंधत्व, मनाला वंध्यत्व व देहाला पंगुत्व येते. म्हणून हरएक प्रसंगी कसला तरी आधार घेऊन चालण्याचा तो प्रयत्न करतो. या प्रयत्नांनाच जग ‘ जीवनकलह, संसार ’ अशी संज्ञा देते.

अशोक ह्याच संसारांत अडकून पडला ! स्त्रीलाभ ही जगावर सुखप्रद आपत्ती आहे की दुःखप्रद विपत्ती आहे याचा जगाला अद्यापि उलगडा झाला नाही अन् कधी काळी होईल असेहि वाटत नाही. मनाच्या कुंजांत स्त्रीने प्रवेश केला म्हणजे ती आपल्या ध्येयलता नी आकांक्षाची पाने आपल्या नाजुक हाताने खुडून टाकते. या नाजुक खुडाईलाच पुरुष ‘ प्रीतीचा बहर ’ मानतात. पुरुषाच्या मनावर स्त्रियांची छाप एकदां बसली म्हणजे ती जन्मजन्मांतरी उठत नाही. यासाठी तर महान् पुढारी अखंड ब्रह्मचारी रहात नसतील ना ?

* * *

‘ मी लग्न केले नसते तर–’ अशोक नुसते पुटपुटला.

‘ तर तुम्ही वेडे झाला असतां -’ अशोक चमकला. मान वर करून पहातो तो नीली उभी.

‘ मी वेडा झालो असतो नी तुम्ही ? ’ अशोकने विचारले.

‘ काय ! ‘ तुम्ही ’ ? ’ असे म्हणत नीलीने हातामधील पुस्तक चटकन् खालीं टाकले. तारुण्याच्या अल्लड व उतावळी गतीने ती अशोकजवळ आली. कोचावर पायाचा पंजा उभा केला, नी गुढगा अशोकच्या पर्यंकावर ठेवला. उजव्या हाताची तर्जनी अशोकच्या ओठावर ठेवली. मानेचा तिरपा कोन करून तिन अशोकच्या डोळयाला डोळा भिडवला. अन् विशेष आश्चर्याची गोष्ट तिनं ही सर्व मोहक ‘ पोझ ’ डोळयाचे पाते लवते न लवते तोंच घेतली व म्हणाली,

' मला अजूनहि हांक मारतांना ' तुम्ही ' कां म्हणतां ? संकोच संपला नाहीं का ? मला वाटतं हळूं हळूं माझे गाल चेपून जातील. पण तुमची भीड कांहीं लवकर चेपणार नाही. हं-मला काय म्हणणार ? '

' तुम्ही—' अशोकच्या मुखांतून पुन्हा ' तुम्ही ' शब्द बाहेर पडतांच नीलीनं आपल्या बोटांनीं त्याचे अधर घट्ट दाबून धरले.

' मला, तू—तूं—नाही तर ' नीली ' म्हटलं पाहिजे. ' असे म्हणून ती हंसूं लागली. तिच्या कुंदकळयाप्रमाणे दिसणाऱ्या दंतपंक्तीमधून व गुलाबी कपोलावरून उसळणाऱ्या हास्यप्रभेत अशोक क्षणभर तन्मय झाला.

* * *

या तन्मयतेत किती काळ गेला हे कुणास कळले नाही. दारावरची ' रींग ' वाजली.

' नीली '!

' कोण पपा ? ' वडील कशासाठी आले हे आपला पदर सावरीत नीली पाहूं लागली. बाळासाहेब सरळ आंत आले व अशोककडे पहात म्हणाले–' मग तुम्ही आज रात्रीच्या गाडीनं जातां ना ? '

' कुठ ' म्हणून अशोक पृच्छा करणार तोच नीली पुढे येऊन एकदम म्हणाली, ' हो, नक्की जाणार ! '

' ठीक आहे. चार दिवस मौजेत गेले म्हणजे पुढे अशोकना कामाला अधिक उत्साह येईल. मी डबा रिझर्व्ह करायला सांगतो तर मग-' असं म्हणत बाळासाहेब खाली गेले. दारापर्यंत नीली त्यांना पोहचवावयास गेली. परत येतांना टाळी वाजवून ती म्हणाली, ' गंमत झाली नाही ! '

' कसली ? '

' आपल्या ट्रीपची '

' कोणती ट्रीप ? '

' हनीमून ट्रीप–' असे म्हणून नीली निःशंक मनानें हसली.

* * *

रात्रीच्या गाडीने अशोक व नीली मौंट अबूला जावयास निघाली. गाडी स्टेशनच्या बाहेर जाईपर्यंत नीली खिडकीबाहेर रुमाल काढून ‘ बाय बाय ’ म्हणत निरोप देत होती. स्टेशनची हद्द संपली. नीलीनं खिडकी लावली व ती अशोकजवळ येऊन बसली. या क्षणी अशोकचे खरेखुरें परिवर्तन होऊन त्याने ‘ नीली ’ अशा एकेरी गोड शब्दाने तिला अगदी प्रथम हाक मारली. नीलीला प्रथमच अशोकच्या शब्दांत जिव्हाळा भासला दोघेहि परस्परांकडे मंत्रमुग्ध होऊन पहात होती—

‘ नीली ’–

‘ अशोक–’

दोनच शब्द बाहेर पडले. इतर शब्दांना ओठावर अवकाश कोठून मिळणार ?

# मधुचंद्राची मादकता : : ६

अबूचा पहाड म्हणजे सृष्टिदेवीचं विलासमंदीर आहे. केव्हांहि पहा, या ठिकाणी सृष्टिदेवता निसर्गाशी तन्मयतेने प्रणयाचा रंग उधळतांना दिसते. जणू सृष्टिदेवता या पहाडावर जागत्या जगाला सोडून, शांतपणे आपल्या प्रीतीचा 'मधुचंद्र' तर साजरा करित नाही ना असे सामान्य प्रेक्षकाला वाटेत! अशोक नी नीली बोलूनचालून आपल्या 'मधुचंद्रा-' साठी येथ आली, तेव्हां त्यांना या नयनरम्य दृश्यांत प्रणयाची विलासिता दिसल्यास नवल ते काय?

पहांटेची वेळ! राजपुताना हॉटेलांत अशोक बिछान्यावर पडून खिडकीवाटे ही अधुक शोभा पहात होता. बाहेर दाट धुके पडले होते. त्यांत गुलाबी थंडीच्या नवथर लहरी उसळत होत्या. धुक्याचे झिरझिरीत पटल मधून मधून पर्वतराजीमुळं तुटक होई. अशोकला वाटे, दऱ्यांमधील सुप्त वनश्रीच्या वक्ष:स्थलावरील हे विरल वस्त्र दूर करून निसर्ग तिच्या-कडे अभिलाषी इच्छेन तर बघत नाही ना? हा रोमांचकारी विकार मनांत येताच तो उठून बसला. नीलीला काय वाटले कोणास ठाऊक! तिनं खांद्यांवर हात टाकून अशोकला न उठण्याची मोहिनी घातली. अशोकनं मागे वळून नुसता दृष्टिक्षेप केला. तिचे अर्धोन्मीलित नेत्र, त्या नेत्रांत तरळणारी धुंद निद्रा, जागरणाने मुखावर आलेला मलूलपणा,

स्वतःच्या स्पंदनाने कुस्करलेल्या कुंतलभारामधून उडणारे केसाचे तुरळक गोफ पाहून अशोकच्या मुखावर किंचित् हास्य उमटले. खांद्यावरील तिचा करभार दूर करित तो उठूं लागताच, लाडिकपणाच्या कुरबुऱ्या सुरांत नीली म्हणाली,

'इतक्या लवकर उठून काय करणार?'

'झोपून तरी काय करावयाचं?'

'अजून बरीच थंडी आहे बाहेर! स्वस्थ पडून रहाना थोडा वेळ?' अशोक ऐकत नाही असे पाहून नीली अर्धवट उठली. अट्टाहासानें तिनं अशोकला दुलईत दडवले.

'मला पाळण्यांतील पोर का समजतेस तूं?' अशोकचं हे बोलणं ऐकले न ऐकलेसे करून नीलीनें आपला डावा हात उशीवर अशा खुमारीने ठेवला की, अशोकला त्यावर आपले मस्तक अलगद ठेवण्यावांचून गत्यतरच उरले नाही.

लग्नानंतरचा पहिला प्रहर अत्यत विचित्र असतो. या काळांत क्षणाचाहि विरह कोणासहि सहन होत नाही. अशोकने आपले मुख पलिकडे फिरवले! तेहि नीलीला खपले नाही. ती पुनश्च उठली. अशोकचं तोंड फिरवून घेणार तोंच दारावर पोष्टमनने थाप मारली. ती ऐकून कांहीशा त्रासिक, कांहीशा चडफडत्या सुरात म्हणाली, "दररोजच्या दररोज हा काय मेला त्रास! या पोष्टमनला दुसरा धंदाच नाहीं काय?"

"पत्र वाटता वाटतां तुझ्यासारख्यांना उपाधी देण्याचा जोडधंदा आहेच की त्यांना!" असे म्हणत अशोक तडक उठला. दारावर दुसरी थाप बसतांच 'यस' म्हणत त्याने दार उघडले. पत्रे घेऊन अशोक आराम खुर्चीवर पडला. नीली हताश झाली. आपल्या गुलाबी साखर झोपेचा असा विरस झालेला पाहून तिने 'ऊं! ऊं!' करित दोन्ही हातांत परांची मखमली उशी घेतली व डोळे झांकून निश्चेष्ट पडली. अशोक आंतील खोलीत गेला व टपाल वाचूं लागला. पत्र वाचतां वाचतां त्याचा चेहरा गंभीर झाला. त्याने एक दीर्घ निःश्वास सोडला. प्रणयसमाप्तीनतरची ही जागृति होती. मनुष्य आनंदांत, सुखांत व प्रेमांत

तल्लीन असला म्हणजे त्याला जगाचा, जीवाचा व जबाबदारीचा सर्वस्वी विसर पडतो. पण आनंदाची लाट ओसरली, सुखाची सांवली पुढे सरकली नी प्रेमाचा पहिला प्रहर उलटला म्हणजे प्रत्येकाच्या मनावर गांभीर्याची जड झांपड येते. निदान प्रकाशच्या पत्रानं अशोकचा विलासी कैफ ओसरला. डोळ्यांत झणझणीत अजन पडून तो आपल्या आत्मवंची अत-करणाचे निरीक्षण करू लागला. प्रकाशच पत्र पुन्हा पुन्हा वाचूं लागला, ........" पक्षाला पख फुटल्यावर त्यास घरट्याची जरूरी नसते. तेव्हां तूं इथून गेल्यावर परत शेतावर आला नाहीस याबद्दल मला कांहिंच आश्चर्य वाटले नाही. पण माया फार वेडी असते. श्रीमंताच्या राजविलासांत तूं आम्हाला विसरलास—पण आम्ही तुला विसरू शकत नाही. कुणीसं मला सांगितलं की, तूं फार आजारी आहेस. ऐकल्यापासून जीव धडधडूं लागला. तुला केव्हां पाहीन अस झालं नी म्हणून मी नाइलाजाने तुझ्या नव्या घरीं आलो पण तिथ तूं अबूच्या पहाडावर गेल्याचं कळलं! प्रकृती-साठीं पहाडी हवा खाण्यास गेला असशील तर माझं कांहीच म्हणणं नाही. बरोबरीच्या माणसाला शहाण्यानं उपदेश करू नये म्हणतात. पण अशोक! जीवन चैनीसाठी नाही येवढंच मी तळतळून सांगतो. कांहीं कां असेना—तुझ्या खुशालीचं पत्र त्वरित पाठीव.—प्रकाश."

प्रकाशने हे पत्र किती कठोर हृदय करून लिहिलं असेल याची अशोकला जाणीव झाली. एका महिन्याच्या अवधीत आपण एकदांहि प्रकाशला न भेटण्याचा मूर्खपणा कसा केला याचे त्याला राहून राहून वाईट वाटे! गेल्या महिन्यांतील सर्व स्थित्यंतरे त्याला स्पष्टपणे दिसूं लागलीं. नीलीची हुरहुरती भेट, नीलीची प्रेमयाचना, नीलीने पाडलेला मोह, नीलीने मिळविलेला नाजुक विजय, अन् आजहि नीलीने आपणा-भोवती गुंफलेलीं रेशमी गांठीचीं नाजुक बंधने याची त्याला प्रखर जाणीव झाली. प्रेम, प्रतारणा नी परिवर्तन, हीं तीन स्थित्यंतरे होत असतांना आपल्या भावनांनी थोडेहि प्रतिकारी बंड कां केले नाहीं या कमकुवत-पणाबद्दल हळहळ नी खेद त्याचा त्यालाच वाटूं लागला. या खेदमय

जागृतींत त्याच्या जन्मसिद्ध, तेजस्वी भावनांनी उचल खाऊन नवीन चैतन्य निर्माण केले.

आपले ध्येय, आपले जीवन, कल्पकता, कर्तृत्व याचा तो सूक्ष्मपणे विचार करूं लागला. पण त्याच्या विचाराची गति पूर्वीसारखी स्वयंसिद्ध, स्वतंत्र, एकेरी तडफेची नव्हती. नीलाला दूर करून तो विचारच करूं शकत नव्हता. किंबहुना तिला सहभागी करून आपला ध्येयमार्ग कसा चोखाळतां येईल याचा तो शोध करित होता. अशोकसारखा क्रियावंत असा क्रियाशून्य कां व्हावा ?

स्त्री, तारुण्य नी प्रेम कोणाहि पुरुषाचे व्यक्तिमत्व कमी करतात. स्त्री 'अर्धांगी' म्हणून अर्ध्या महत्त्वाकांक्षा आपल्या सोईसाठी खुडून टाकते. तारुण्य क्षणिक म्हणून आपल्या विलासात अडथळा निर्माण करणाऱ्या बऱ्याचशा आशा-आकांक्षा बाजूस सारते. प्रेम मागून मिळत नाहीं व मिळाल्यावर ते चिरकाल टिकेलच असे नाही. त्यामुळे प्रेमीजीव उरल्यासुरल्या महत्त्वाकांक्षा प्रेमाखातर मृदुलपणे मढिरून टाकतात. अशारीतीने लग्न झाल्यावर पुरुष ध्येयशून्य होऊन त्याच्या महत्त्वाकांक्षेची गोळाबेरीज शून्य होते. ज्यांना मोठमोठे पराक्रम करावयाचे असतात ते या त्रयीपासून या तापत्रयीपासून आपले जीवन संपूर्णपणे अलिप्त ठेवतात. अन् तसा अलिप्तपणा आपणास कां ठेवतां आला नाहीं ही बोचवणूक अशोकच्या हृदयांत सारखी होत होती.

विचाराने डोके धुद झाले कीं तो केशभूषेच्या मेजावरील आरशांत आपले प्रतिबिंब पाही. अन् तसे करूं लागला म्हणजे आरशाच्या खालील कोपऱ्यांत चांदीच्या छोट्याशा फ्रेममध्ये मढवलेल्या नीलीच्या फोटोवर त्याची नजर जाई. हा फोटो पाहून त्याची खिन्नता अधिक वाढे.

इतक्यांत अंगांत पोलके घालित नीली इकडे येत होती. तिची मोहक छाया त्याला आरशांत दिसली. अशोक आपल्या फोटोकडे पहात आहे असे बघून ती म्हणाली, "कां? आतां कां-माझा फोटो पहातां? मघाशी माझं तोंड पहायचं नाहीं म्हणून तोंड फिरवून निजला नाहीं!" तिची ही प्रणयाची गंमत होती. अशोकच्या हृदयांत चालणारी

खळबळ तिला समजली नाहीं. अशोकने ' हं ' असा खेदपूर्ण उछ्वास सोडला.

' नीली ! खाली बैस पाहूं—'

' कां ? एकाएकी प्रौढत्व आल वाटतं ? '

' होय ! प्रेमाच्या पाळण्यांत पोरासारखं कुठवर खेळत बसायचं ? '

' पोर होईतो–' अत्यंत नि शकपणे ती म्हणाली हंसली खूप मोठ्यान हंसली. या हंसण्यानं अशोकला मौज वाटली; पण त्यामुळे त्याचा गंभीरपणा अधिकच वाढला. नीलीचा हात धरून तिला विचारले, ' चेष्टा–विनोद अवांतर वेळी करूं ! मी तुला गंभीरपणे विचारतो की, तूं लग्न कां केलेस ? '

' तुम्ही कां केल ? '

' मी ? होय ! मलाहि तोच प्रश्न आहे. मी लग्न केलं तुझ्यासाठी, प्रेमासाठी ! पण - '

' पण काय ? मी, माझ प्रेम नी माझं सर्वस्व मिळूनहि तुम्हाला लग्न झाल्यासारख वाटत नाही अजून ?...' नीलीने हंसत विचारले.

' होय ! कारण लग्नाची माझी कल्पना फार भिन्न आहे. नीली, लग्न हे एक प्रमेय आहे, नफातोट्याचं एक गूढ गणित आहे. हे प्रमेय जगांतील सारे तरुणतरुणी गालाओठावर सोडवूं पहातात व अखेर त्यांना या गणिताची उत्तरे निरुत्तरदायी मिळतात. तशांत या गणितांत पोराबाळांचे आंकडे वाढू लागले म्हणजे त्याची एकच तारांबळ उडते. जगाच्या या सामान्य चाकोरीतून जाण्याची माझी इच्छा नाही. तूंहि जाऊं नये असं मला वाटतं. लग्नाच्या गणिताच अचुक उत्तर ' गालांत ' नसून ' त्यागांत ' आहे. ज्यांना हे कळतं, त्यांनाच सुखाचं लग्न नी लग्नाचं सुख लाभतं ! लग्नाची माझी ही प्रांजल कल्पना आहे. तुला काय वाटतं ? ' अशोक उत्सुकतेने तिच्या उत्तराची अपेक्षा करूं लागला.

' माझी कल्पना ! तुम्हाला खरंच सांगूं--लग्न म्हणजे जीवाचे अलोट रजन आहे, अलोट चगळ आहे, अखंडपणाची रंगत आहे. हे

रंजन चिरंतन टिकविण्यासाठीं करावा लागणारा खटाटोप म्हणजेच ‘ संसार ’—’

‘ नीली, तूं अगदी मनापासून बोलतेस ? ’

‘ इश्श ! तुम्हीच म्हणाला ना विनोदचेष्टा अवांतर वेळी करूं म्हणून ? मी तुमच्याइतकीच गंभीर आहे यावेळी ! ’

‘ मग सांग, तूं कसल्या खटाटोपाला, कसल्या त्यागाला राजी आहेस ? ’

‘ ज्या त्यागांत तुम्ही अतरणार नाही तो कसलाहि त्याग मी करीन.’

‘ खरे ना हे ? मग माझी इच्छा, आपण कुठल्या तरी शेतावर जाऊन निष्कंटकपणे जीवन कंठावे ! ’

‘ निष्कंटक जीवन ! म्हणजे ? घर कांटेरी बाग आहे असं का वाटतं तुम्हाला ? ’

‘ हो, जवळ जवळ असंच वाटतं ! तुझ्या वडिलांच्या श्रीमंतीनं नटायचं, त्यांच्या वैभवाच्या मोठेपणानं मिरवावयाच, प्रसंगी त्याच्या इच्छा लहरीनं जीवन कंठावयाचं मला पसंत नाही.’

‘ कां ? ’

‘ हा माझा जन्मजात स्वभाव आहे. जगांत कर्तृत्वावरच मनुष्याला जगण्याचा अधिकार आहे. कर्तृत्वहीन लोकांनी जगून जगाला निष्कारण भार करूं नये. दया, सहानुभूती, यांच्या जोरावर जगण्याची प्रवृत्ति गुलामगिरीची आहे. यासाठीच आयत्या पिठावर रेघा ओढून श्रीमंतीचा दिमाख दाखविणाऱ्या लोकांचा मला अत्यंत तिटकारा आहे.’

पुरुषार्थाला शोभणारे हे अशोकचे शब्द ऐकून नीलीच्या अंगावर आनंदानं रोमांच उभे राहिले. असा बाणेदार पति आपणास लाभल्याबद्दल तिला धन्यता वाटली; पण स्त्रीव्यवहाराच्या कोत्या दूरदृष्टीनं ती म्हणाली,

‘ आपला स्वभाव जरा चंचल आहे. आपण असं भलतंच कांहीं करायला प्रवृत्त होऊं नये गडे–’

'भलतंच? नीली! उद्यां तुझ्या घरांत तुझ्या वडिलांनीं, तुझ्या वहिनींनीं, तुझ्या आतेनं किंवा तुझ्या नोकरांनीं माझा अपमान केला तर तुला तो खपेल? माझ्या कार्याला पायबंद घातला तर तो तुला आवडेल? तुझा पति कर्तृत्वहीन झाला तर तुला आनंद होईल?'

'पण हे प्रसंग येतात कशाला? पपांनी मला निघतांना काय सांगितलं माहित आहे तुम्हाला? इथून जातांक्षणीच तुम्ही नी मी घरचेदारचे सर्व व्यवहार पहावयाचे आहेत. शेती, सावकारी, गिरण्या सर्व कांही आपल्या स्वाधीन करून पपा विश्रांती घेणार आहेत. मग कुठला मान आणि अपमान?'

'आज नसला तरी उद्यां होईल अशी भीति वाटते. पपा कार्यनिवृत्त होणार तर मग त्यांनी हे पत्र का लिहिल? माझ्या रंगीत कापसाची निपज, त्याची लागवड, इतर वनस्पतींची लागवड, माझी स्वयंसिद्ध खते, माझ्या दीडशे शोधाचे रजिस्टर्ड पेटंट घेण्यास त्यांना कशासाठी स्वतःच्या नांवाने अधिकारपत्र हवय्? ही कार्यनिवृत्ती आहे कीं कार्यप्रवृत्ती आहे?'

'पपा तुमचं नुकसान करतील असं वाटतं तुम्हाला? पपा माझं नुकसान करतील अशी शंका येते तुम्हाला? तसंच कांही निकडीचं व्यापारी कारण असेल म्हणून त्यांनी लिहलं असेल हे पत्र! तुम्हाला मी पाहिजे पण पपा नको'

'होय, नीली! राग मानूं नकोस! तुझ्या श्रीमंतीवांचून मला तूं हवीस! माझ्या महत्त्वाकांक्षेला प्रोत्साहन देणारी पत्नि म्हणून तूं मला हवीस! श्रीमंताची मुलगी, विलासी वनिता, नट्टापट्टा करणारी नटी म्हणून तूं मला नकोस'!

'मलाहि कीर्तिवंत पति हवा म्हणूनच मी लग्न केलं. तुमचा कोणी अपमान केला, अवहेलना केली, तर तर–त्याक्षणीं मी पपांच्या नांवाला नी माहेरच्या गांवाला पारखी होईन. तुम्ही सांगाल तिथं मी येईन--'

'शक्य नाही! नीली! सोन्याचांदीच्या चादरीवर तुझा जन्म गेला, तुझ्या जीवाला हा जंजाल सहन होणार नाही.'

'मी श्रीमंताची कन्या म्हणून मजकडे पाहूं नका. वहिनीच्या विलासी जीवनाकडे पाहून माझी पारख करूं नका. रजनीआत्याच्या वर्तनावरून माझं भविष्य वर्तवूं नका—अशोक! आमच घर, आमची श्रीमंती, आमची माणसं चमत्कारिक आहेत हे मला कळत का नाहीं? आज तुम्ही नी मी घर सोडून गेलो तर उद्यां कोणी तरी चोरपोर घरांत शिरतील, नी आहे ते खाऊन टाकतील' त्यापेक्षा आपण आपल्या हातांनी चार गरीबांचे संसार कां थाटूं नयेत? याउपर तुमची इच्छाच असली तर मी कुठेहि येईन! पण—'

'पण काय!'

'मा! मासाठीं; तरी तुम्ही घरीं रहा! अशोक 'मा'ला माझ्याशिवाय कोण आहे? 'मा'ला तुमच्याशिवाय कोण आहे? आज दहा वर्षं 'मा'ला सुखाचा क्षण तरी लाभलाय् का?' असं म्हणून नीली मिळमिळ रडूं लागली.

'मा! मा! नीली! तुला 'मा' तरी आहे! पण मला तीहि नाहीं!' अशोकच्या सद्गदित कंठांतून शब्द उमटेना! दोघेहि स्तब्ध झालीं. क्षणांत डोळे पुसावेत, क्षणांत दाटून आलेला कंठ साफ करावा. क्षणांत बोलण्याचा प्रयत्न करावा. पण कोणीच बोलूं शकेना! दोघांचीं समरस झालेलीं हृदये विव्हल झाली होतीं.

* * *

चहा व छोटी हजेरी घेऊन हॉटेलचा बटलर आला नसता तर दोघांची सर्व सकाळ अशीच गेली असती. नीली उठली. तिने मुखमार्जन केले. तिला बरीच हुशारी आली. या हुशारीबरोबर तिचा अल्लडपणा नी विनोदी वृत्तीहि आली. चहा पितांना तिनं विनोद करण्याचा प्रयत्न केला. हास्य हे कशाहि दु:खाला बुजवू शकते.

दररोज उठतांच दाढी केल्याशिवाय अशोक चहा पीत नसे पण आज दाढी न करतां तो चहा पिऊ लागला हे पाहून नीली म्हणाली, 'दाढी नाही करावयाची वाटतं आज?'

'असं कसं होईल? न केली तर तू कुरकुर करशील ना?'

'इश्‌! मी कशाला कुरकुर करूं?'

'तूं नाही, तुझे ओठ कुरकुरतील.'

'अस ना! मला त्यांना विचारा की! मग कशाला विचारतां?'

अशोक विरमला. पण नीलीच्या या नाजुक कोटीनं खूप हसला.

* * *

जेवण्यापूर्वी नीलीच्या सांगण्यावरून अशोकन बाळासाहेबांना पाहिजे असलेलं अधिकारपत्र रवाना केले. अशोकच्या दीडशे शोधांचे खरेदी विक्रीचे, लागवडी पेरणीचे सर्व अधिकार बाळासाहेबांना या अधिकारपत्राने मिळणार होते. अशोक या शोधांचा नामधारी उत्पादक बनला. मुंबईला जाऊन बाळासाहेबांशी समक्ष चर्चा करावी असं अशोकला वाटे. पण त्यांचं पत्र तारवजा असल्यामुळे व नीली एक महिना येथून परत जायला तयार नसल्यामुळे त्याचा नाइलाज झाला. प्रकाशलाहि त्याने खुशालीचे पत्र धाडले. त्यामुळे मात्र त्यास बरेच समाधान मिळाले.

* * *

जेवणास अवकाश होता म्हणून एका कोचावर तो कादंबरी वाचीत बसला. दुसऱ्या कोचावर नीली बसलीच होती. वल्लभरमणीचे चेहेरे म्हणजे एक महाकाव्य आहे. कादबरी वाचतां वाचतां ती दोघे या महाकाव्याचे निरीक्षण करित होती. या काव्यांत तीं तीं पदे, त्या त्या भावना पुन्हां पुन्हां येत, पण त्या रचनेत चातुर्य नी कौशल्य होते. अन्‌ म्हणूनच ससारांत पतीपत्नीचं मुखकाव्य इतकं रसाळ नी अमर ठरलं आहे.

## अशोकला अधिकारसूत्रें : : ७

नीली व अशोक अबूच्या पहाडावर एक महिना रहाणार होतीं; पण मुंबईहून बाळासाहेबांची अचानक तार आली. अशोकने ताबडतोब मुंबईस निघून यावे, असे बाळासाहेबांनीं तारेने त्यांना सुचविले होते. याला अनेक कारणे होती. बाळासाहेबांच्या स्वभावांत राक्षसी महत्त्वाकांक्षा काठोकांठ भरली होती. त्यामुळे नोकर लोकांना ते अत्यंत वाईट रीतीनं वागवीत. गरीबांचे हाल झाले, गरीबांच्या पोटावर आपले जडावाचें अवजड पाऊल पडले तर त्याबद्दल त्यांच्या राक्षसी मनाला नी महत्त्वाकांक्षी स्वभावाला अणुमात्र दिक्कत वाटत नसे. गरीब नोकर हाल सोसणार तरी किती? आघाताला प्रत्याघात, विरोधाला प्रतिविरोध करण हा मनुष्याचा स्वभावधर्म आहे. बाळासाहेबांची सतावणी, गांजणूक जसजशी गर्जू लागली तसतसे त्यांच्या जीवाभोवतीं जजालाचे जाळे पसरूं लागले. दररोज त्यांना धमकीचीं पत्रे येत. कधीं एकटे फिरावयास गेले तर एखादा दुसरा धटिंग त्यांना आडवा होऊन खाऊ कीं गिळू करी! गिरणींत पाऊल टाकतांच सर्व कामगार प्रक्षुब्ध चेहेऱ्यांनीं त्यांच्यावर धमकीची नजर रोखीत. त्यावेळीं वामनाच्या बटुचेहेऱ्यांत बळीला मिळालेला प्रलयसंदेश कामगारांच्या चेहेऱ्यावर त्यांना पाहावयास सांपडे. तेव्हां

हा डोईजड होणारा भार परस्पर अशोकच्या अंगाखांद्यावर टाकून आपण पडद्यामागे रहावे व सर्व सूत्रे हालवावीत, असे त्यांना वाटूं लागले. अशोक कर्तबगार आहे, मजुरांचा तन्मणी आहे, तेव्हां त्यालाच आपल्या कार्यविस्तारसृष्टीचा कर्ता करविता पुरुष केला तर क्षणाक्षणाला उठणारी ही हलकल्लोळी आग आपोआप शमेल अशी बाळासाहेबांची मनोदेवता ग्वाही देत होती. अन् म्हणून त्यानी अशोकला तडकाफडकी निघून येण्यास सांगितले.

परत येतांना अशोकला अलोट आनद झाला. आपणांस आतां नवी सृष्टि, नवे कार्य करावयास मिळणार, या विचाराने तो क्षणभर हुरळला. पण नीलीचे मन मात्र खट्टू झाले. आयुष्यांत हनीमूनसारखा प्रसंग वारंवार का येतो? आपण ऐन सुखविलासात असता पपानी असा विरस कां करावा याबद्दल नीली कुरकुर करूं लागली. पण अशोकपुढे तिचे कांही चालेना. ती दोघे अखेर मुंबईस आली.

बाळासाहेबांनीं अशोकला आपल्या सर्व कारभाराची साद्यंत माहिती दिली. वयोमानामुळे मला दगदग सहन होत नाही, तरुण पिढी आमच्याकडे सहानुभूतीने पहात नाही वगैरे अनेक सबबी सांगून संसाराची झालरझूल त्यांनी अशोकच्या अंगावर चढवली. तरुणांना कार्यसाधने, व सुवर्णसंधी मिळतांच त्यांना होणारा आनद अनिवार असतो. या आनंदांत त्यांच्या दृष्टीचा दूरवरपणा दुरावतो. अशोकचे तसेच झाले. पैसा, सत्ता, कार्यक्षेत्र, सर्वतोपरी आपणांस उपलब्ध होऊन आपल्या अनेक तत्त्वनिष्ठ कल्पना सत्यसृष्टींत उतरणार या एकाच विचाराने अशोक धुंद झाला.

बाळासाहेबांनी अधिकारसूत्रे अशोककडे देतांना एक टोलेजंग समारभ केला. गिरणीमधील सर्व अधिकाऱ्यांना व कामगारांना एकत्र जमविले. सर्वांना अशोकची औपचारिक ओळख करून दिली. नीलीला हा प्रसंग आपल्या जीवनांतील अत्युत्कट सुखाचा वाटला. हजारो मजूर तटस्थ नेत्रांनीं अशोककडे पहात आहेत, बाळासाहेब बड्याबड्या, वृद्ध अधिकाऱ्यांची ओळख अशोकशी करून देत आहेत, नव्या मालकापुढे लहान थोर, यच्चावत् सर्व जण प्रेमादराने व

विनम्र भावानें आपली मस्तकें नमवीत आहेत, —पतीचें हें अपूर्व वैभव पाहून कोणत्या पत्नीला आनंद होणार नाही ? दूरवर बसून नीली हें दृश्य पहात होती. तिला अलोट आनंद होत होता. लक्ष शब्द जिथें थिटे पडत, तिथें ती आपला अलक्ष्य भाव व आनंद नुसत्या मंद-स्मिताच्या लकेरीतून प्रकट करी. सहस्र शब्दांना ज्या अव्यक्त भावना व्यक्त करता आल्या नसत्या त्या तिनें मानेच्या मुरडत्या मोहिनीनें अशोककडे पहात व्यक्त कराव्यात. अशोकचें हें वैभव जितकें लोभनीय, तितकें चुंबनीय, तितकेंच स्पृहणीय होतें. पतीच्या वैभवाची चढती कमान पहाण्याची नीलीची ' भूक ' या क्षणी तृप्त होत असल्यामुळें तिच्या मुखावर समाधानाचा आनंदीआनंद ओतप्रोत भरला होता. उलट अशोकची दृष्टि अंतर्मुख होऊन भावी कालांतील गोडस्वरूपी सृष्टीचें निरीक्षण करी ! आपल्या नव्या सप्तरंगी कापसाचे प्रयोग आपण या गिरणींत यशस्वी करूं, या यशाच्या जोरावर मजुरांचा उद्धार करू–भुकेनें तडफडणाऱ्या असंख्य जीवांना सुखशांतीच्या सांवलींत विसांवा देऊं. असे अनेक विचार त्याच्या मनांत येत.

या प्रसंगानें मजुरांनाहि किती बरें वाटलें ! अशोकचें गरीब वर्गा-बद्दलचें प्रेम, त्यांच्याबद्दलची कळकळ नी आस्था मशहूर असल्यामुळें गरिबांना आशेचें नवें मृगजळ दिसूं लागलें. बाळासाहेब सेवानिवृत्त झाले, हा आपल्या मागणीचा, चळवळीचा प्रचंड विजय झाला असेंच त्यांना वाटे. पण या नव्या राजवटीमुळें सुधा नी रजनी यांच्या अंगाचा तिळ-पापड उडाला. त्यांना घरीं, दारीं सत्ता अशी कुठेंच उरली नाहीं. लौकिक, सत्ता नी पैसा या तिन्हींची व आपली कायमची फारकत झाली असें त्यांना वाटूं लागलें. पण त्या काय करणार ? आपल्या वयाची, आपल्या बरोबरीची नीली मात्र पूर्ण सुखांत पडली ही भावना सुधाला तर मुळींच पटेना ! वस्तुतः तीच या घरांतील मंगल ' कुंकू करंड्यांची ' राणी ! सर्वांवर अधिकार गाजवण्याचा खरा अधिकार तिचा ! व म्हणून हातचें वैभव हातोहात जात आहे असें सुधाला वाटून ती तडफड करूं लागली. ' निदान घरचा कारभार तरी मजकडे द्या ' म्हणून ती बाळासाहेबांची कानधरणी

करूं लागली. पण अशोकचा स्वभाव बाळासाहेबांना ठाऊक असल्यामुळें त्यांनीं या बायकी बोलीकडे फारसे लक्ष दिलें नाहीं.

*　　　*　　　*

अशोक चाणाक्ष बुद्धीचा असल्याने हा अवाढव्य विस्तार आत्मसात् करणे त्यास कठीण गेले नाही. पण त्यामुळे त्याला बऱ्याच कौटुंबिक व संसारीक गोष्टींना तिलांजली देणे भाग पडले. त्याला अष्टौप्रहर काम पडूं लागल्यामुळे त्याला नीलीचा व नीलीला त्याचा सहवास दुर्मिळ झाला. दुर्मिळतेने दूरावणाऱ्या सहवासामुळे नीलीला होणारा विरह असह्य होई. मोठेपणाबरोबर मोठमोठाली संकटेही येतात याची नीलीला काय कल्पना? अशोक पहांटेच उठून आपल्या कामधंद्यास लागे. दिवसभर राबून रात्रही त्याला थोडी वाटे. त्यामुळे कधीं बारा वाजतां तर कधीं एक वाजतां घरीं यावे, कधी कार्यबाहुल्यामुळे घरीहि येऊ नये असा त्याचा दगदगीचा जीवनक्रम सुरू झाला. घरी येताच शिणला देह बिछान्यावर टाकतांच अशोक आवश्यक असणाऱ्या गाढ निद्रेत गुंग होई; पण नीली, रात्रभर कुचकुच करित तळमळत पडे. अशोकला रात्र म्हणजे सुखशांतीचा संजीवन काल होता; पण तीच रात्र नीलीला सुखशांतीचा अपहरणकाल वाटे. रात्र एकच पण तिचे स्वरूप प्रत्येकाला भिन्न भिन्न वाटते. साऱ्या रात्री सर्वांना सारख्या कधींच नसतात. काहींना रात्र म्हणजे चौर्यकर्मावर उपजीविका करण्याचे सधिपर्व असते, तर कांहींना विलासी जीवनाची खैरात करण्याची महापर्वणी वाटते. ‘उद्यां कसे होणार?’ या चिंतेने तळमळणाऱ्या जीवांना रात्र म्हणजे देहांतील रक्त आटविणारा नंदादीप वाटतो. नीलीला साऱ्या रात्री खरखीत वैराग्याने विखारलेल्या भासत. विरही वैतागाने तिच्या स्वभावांत त्रासिकपणा प्रत्यहीं वाढत होता. नोकरांना उलटून बोलावे, त्यांना सतवावे, अशा नाहीं नाही त्या अप्रिय गोष्टी तिच्या हातून न कळत घडत. चंद्राने विरह वाढतो म्हणून सरोवरांत प्रतिबिंबित झालेल्या चद्रबिंबावर दगडफेक करण्यासारखाच मूर्खपणा तिच्या नित्याच्या व्यवहारांत दृष्टोत्पत्तीस येई.

अशोकने घराबाहेर पाऊल टाकल्यापासून परत घरांत पाऊल

टाकीपर्यंतच्या कालांत नीलीचा एकच कार्यक्रम ठरलेला असे. तो म्हणजे खिडकीत बसून अशोकची आशाळभूतपणे मार्गप्रतीक्षा करणे! जिन्यात ओळखीची पावले वाजताच देहभान विसरून नीली अशोकला सामोरी जाई. दोन डोळ्यांची भेट होतांच नीलीच्या गुलाबी अधरावर ठराविक प्रश्न उमटल्यावांचून रहात नसे. 'आता नाही ना जायचं बाहेर फिरून ?' नीलीचे हे शब्द बाहेर पडतांच अशोकला फार हसूं येई. शब्दामागे शब्द, प्रश्नामागे प्रश्न इतके पटापट बाहेर पडत की, अखेर अशोकला नीलीच्या ओठांचा बोलका सिनेमा तशीच एकादी गोड योजना उप-योजून मुका करावा लागे. त्यावेळी कुठं अशोकला विश्रांति मिळे. पण या विश्रांतीच्या अवकाशांतहि नीली त्याचा पाठपुरावा करीत असे. खोलींत येतांच आपल्या नाजूक हातानी कोट काढावा, टोपी हॅंगरवर टांगावी, कातडी बॅग हातामधून हिरावून घ्यावी. एक ना दोन अनेक प्रकारे नीली अशोकभोवती पिंगा घाली. इतक्यांत भगवंतराव दिवाण हातांत कागदपत्रे, बिले, पावत्या घेऊन दारात 'हुजूर' म्हणून पुकार देत. तेव्हा मात्र नीलीचा राग कळसाला जाई! 'दिवाणजी! अहो, त्यांना जेवणखाण तरी करूं देतां का?' छोट्या मालकिणीचा रोख ओळखून चक्रीदार पगडी घातलेले, पानतंबाखूच्या रसरशीत तोबऱ्याने तोंडाचे पोकळ बोळके तुडुंब भरणारे दिवाणजी फाजील लाघवीपणा करित. 'बरं, बरं, मी थोडा वेळानं येईन अ' असे म्हणत पळतां पाय घेत. त्यांची ती लगबग पाहून नीली खूप हंसे व लगेच दिवाणजीच्या अनेक गंमतीदार गोष्टी अशोकला सांगे! श्रीमंतांच्या घरांत 'दिवाणजीपुराण' सतत चालू असते. कारण ती व्यक्तीच मुळी तशी अजब आहे. श्रीमंताचा दिवाण कधीं फार बोलावयाचा नाहीं; सर्वांशी तुटकपणाने वागेल! हुकूम सोडतांना मात्र आपण कोणीतरी गव्हर्नर आहोत असा रुबाब आणील. साऱ्या जगांतील गुलामवृत्ति मुसेत ओतून ही मूर्ति बनवली की काय–इतका लाचारपणा मालकासमोर खडी ताजीम देतांना त्याच्या ठिकाणीं दिसेल. दिवाणजी म्हणजे देवळांतील नंदीकेश्वर आहे. श्रीमंतांची भेट घेतांना सरसकट सर्वांना या नंदीकेश्वराची पायधरणी करावी लागते. दिवाणजीचं वेतन पांचपन्नास

रुपड्या असले तरी घरीं त्याचे वैभव कुबेरी थाटाचे असते. श्रीमंताच्या पापपुण्याचा जमाखर्च करणारा हा साक्षात् चित्रगुप्त! या चित्रगुप्ताच्या ठिकाणी व्यापारी सचोटी मात्र सांपडत नाही. श्रीमंतांच्या पापाची हुंडी पटवितांना दलालीदाखल तो काय गिळंकृत करील याचा नियम नाही. दिवाणजीच्या भूकेचे होमकुंड अखंड पेटलेले असते. त्यांत श्रीमंताच्या अनेक चीजवस्तु पडतात. श्रीमंत उघड्या डोळयांनी पहातात. पण या पापाच्या पितरांचा दिवाणजी हा परमेश्वर असतो.

अशोकच्या राजवटीत दिवाणजीचे अस्तित्व जवळ जवळ नामशेष झाले. पैपैशाचे व्यवहार अशोकच्या संमतीने करावयाचे असल्यामुळे दिवाणजीची सर्व चंदी बंद पडली.

* * *

रविवारी अशोक पूर्ण विश्रांति घेई. त्यामुळे एक रविवार संपतांच दुसरा रविवार केव्हां येतो याची नीली वाट बघत राही.

आज रविवार होता. सर्वजण भोजनगृहांत बसले होते. अशोक अजून कां आला नाही म्हणून नीली त्याला पहाण्यासाठीं दुडदुड धांवत जिना चढूं लागली. दर रविवारी नीली अत्यंत मोहक पोषाक करी. आज तिने पांढरे शुभ्र जरीकिनारी रेशमी पातळ परिधान केले होते कानांत हिरव्या पाचूचे लोलक होते. द्रुतगतीमुळे हे रंगदार लोलक मलमली गालांच्या मैदानावर लोलायमान होत व त्यामुळे गालांची आरक्त छटा अधिकाअधिक खुलून दिसे. जिन्याच्या दोन पायऱ्या चढतांच नीलीने आपली गौर ग्रीवा सहज मागे केली. तो 'मा'च्या खोलीजवळ अशोक गंभीर मुद्रेने उभा असलेला दिसला. 'मा' यावेळीं व्यंकटेशस्तोत्राची पोथी वाचित होत्या. 'पुत्राचे सहस्त्र अपराध, माता काय करी खेद तयांचा' हे वाक्य जातां जातां अशोकच्या कानी पडलें. तो जागच्या जागी खिळून गेला. 'मा'साहेब श्वेतवस्त्र परिधान करून बसल्या होत्या. समोर तुपाची निरांजनी तेवत होती. तिची किरणप्रभा 'मा'च्या मुखमंडलावर पडल्यामुळे तेथे एक चित्ताकर्षक प्रकाशरेखा चमकत होती. त्यांचे विशाल ललाट, टपोरे डोळे, अमृततुल्य वाणी, त्यांच्या परम

पावित्र्याची साक्ष देत होते. त्यांच्याकडे बघतांच अशोकचे डोळे भरून आले. चटकन् पुढे होऊन, ' मा 'ला साष्टांग नमस्कार करून आपल्या मातेच्या प्रेमस्मृतीला उजळा द्यावा असे त्यास वाटलं. त्याने पाऊल उचलले असेल नसेल तोच नीलीने त्याच्या खांद्यावर हात टाकला.

' हे काय ? आम्ही सर्व वाट पहात बसलोय् आपली-' नीलीची नाचरी नजर नेहमीप्रमाणे असंख्य भाव प्रकट करीत होती. अशोक स्थान-बद्ध दृष्टीने नीलीला न्याहाळीत होता तिच्या लहरी स्वभावांतून अनेक भाव-लीला लहरी तरंग उलट होते. मानेची लचकदार लय क्षणांत विलय होई तर क्षणात दोलायमान होई. पण अशोकची मुद्रा गंभीर होती.

' नीली ! तू ' मा ' च्या अगोदर जेवीत असतेस ? '

' हो '--

इतक्यांत ' मा ' नी पोथी गुंडाळली. चटकन् उठून त्या म्हणाल्या,

' अशोक ! माझं आन्हिक फार मोठं असतं ! पोरांची जात. त्यांना ' भूक ' लागते. आपल्यासाठी त्यांच्या भूकेची आबाळ कशाला करा ? '

अशोकला ते पटेना ! जगांत मातेबद्दल ज्याला प्रेम नाही, आदर नाही, तो मग अखिल ब्रह्मांडामधील स्त्रीजातीचा कैवार घेणारा एकादा महात्मा असला तरी तो कवडी किंमतीचा आहे. जेवणासारख्या प्रसन्न प्रसंगी ' मा ' ची आठवण न ठेवणारी नीली त्याला शून्यहृदया वाटली.

' नीली ! ओठावरचा अर्धा घांस काढून ' मा 'नी तुझे ओठ भरले ! अन् आज...नीली ! तूं ' मा ' ला सोडून जेवतेस तरी कशी ? '

' कशी म्हणजे ? ' मा ' चं संपता संपत नाहीं. साऱ्या कंपाऊंडांत दहा वेळां फिरून येईल ! दहा घरीं कुणी उपाशी आहे काय म्हणून तपास करील. दहा जणाला हातांनी जेऊं घालील अन् मग तिसऱ्या प्रहरी कसेबसे चार घांस खाईल ! दररोज इतका वेळ का आम्ही थांबावयाचं ? '

' मा'ची दिनचर्या ऐकून अशोकचं हृदय भरून आलं ! अनत कालापासून माता ही एकच एक मूर्ती परमेश्वराची कीर्ति अमर करीत

आहे. दृश्य स्वरुपांत जगांत वावरण्याचा मोह परमेश्वराला होतांच तो मातेच्या रूपाने प्रगट होतो. ईश्वर घरोघर आहे म्हणतात तें मातेमुळेच ना ? अशोकला आपल्या आईची आठवण झाली. चटकन् खालीं वाकून त्याने 'मा'ला प्रणाम केला. 'मा'ला कसेच्या कसेच वाटले. त्या झटकन् भोजनगृहाकडे जाऊं लागल्या. अशोक व नीली त्यांच्या मागोमाग गेलीं.

* * *

रविवारचे जेवण म्हणजे चमचमीत विनोदी चर्चेची मेजवानी असे. सर्व विनोदाचे केंद्र डॉ. बिलेरे हे असत ! कुणीही त्याची चेष्टा करावी व हास्याचे फवारे उडवावे. डॉ. बिलेरे यांचा या घराण्याशीं फार वर्षांचा पारिचय ! ते 'फॅमिली डॉक्टर' होते या घराचे ! इतर दिवशीं सकाळ सध्याकाळ ते एक एक खेप टाकीत. पण रविवारी मात्र ते सारा दिवस तेथे काढीत. त्यामुळे नोकर लोक डॉक्टरांना 'वारकरी' म्हणत.

सुधा नी नीली डॉक्टरांची थट्टा करून हंसतां हंसतां भुई थोडी करीत. डॉक्टर तसे लठ्ठ नव्हते. पण विनोदाच्या सोईसाठीं सर्वांनी त्यांना 'लठ्ठपणा'च्या चौकटींत बसविले होतें. त्यांचा रंग गोरापान होता. वाम-बाहूवर त्यांनीं नाचता 'मोर' गोंदवून घेतला होता. डॉक्टरसारख्या सुशिक्षित माणसांना हा रानटीपणा कां केला असे कोणी विचारल्यास सुधा चटकन् म्हणे, 'अहो, चोरावर मोर म्हणतात ना त्यांतलाच हा प्रकार आहे.'

डॉक्टरांना चांगले टक्कल पडले होते. त्या तुळतुळीत टक्कलावर तेल लावलेले म्हणजे ते बेसुमार चकाके ! त्याचा फायदा नीली भलत्याच रीतीने घेई ! मुद्दाम कंगवा घेऊन ती डॉक्टराच्या टक्कलाचा आरसा करी व आपला मुखशृंगार करी ! दररोज जातांना डॉक्टर बागेमधील एक गुलाबाचें फूल कोटावर लावण्यासाठीं घेत. एकदा सुधानें त्यांना 'कॉलीफ्लॉवरच' कोटावर लावण्यासाठीं दिले. डॉक्टर ! तुमच्या ऐसपैस देहावर फुलाची शोभा यायला कॉलफ्लॉवरसारखें टपोरे व गेददार फूलच हवे.' गरीब बिचारे डॉक्टर हंसून सर्वांना हंसवीत. अशाच थाटांत जेवण झाले.

जेवण संपल्यावर श्रीमंतांचा कार्यक्रम अगदी ठराविक असतो. सर्वांनीं थोडी वामकुक्षी करावी, एखाद्या आचरट कादंबरीची दोन चार पानें चाळावींत, चहा घ्यावा नी गप्पाष्टकें सुरू करावी हाच त्यांचा कार्य-क्रम ! श्रीमंतांच्या गप्पा म्हणजे परक्यांची निंदा नी टिगल ! कोणाचेंहि नांव निघो, सर्वांनी तोडांच्या तोफा त्यावर रोखल्या नाहीत असें कधीच होत नाहीं. मग त्यांत स्वयपाकीणहि सुटत नसे. या घरांतील स्वयपाकीणबाई सरस्वतीबाई तर सर्वांच्या मान्याची व मोक्याची जागा होती. दुपारचा चहा घेऊन येतांच सुधा म्हणाली, " बलदेवप्रसादाला दिलात का चहा ? " येवढे वाक्य बाहेर पडताच सर्वजण खो, खो हंसूं लागली. वस्तुतः बलदेव-प्रसाद हा त्यांचा शागीर्द ! सर्वांनी त्याचा संबंध सरस्वतीबाईशी निष्कारण जोडून त्या गरीब गाईस शरमिंदे केलें. पण करणार काय ती ? पोटाची ' भूक ' मी मी म्हणणाऱ्यास मातीमोल करते.

या पाचकळ विनोदाचा अशोकला कंटाळा आला. तो उठून खोलींत जाऊं लागला तोंच बाळासाहेब पाईप फुंकीत दिवाणखान्यात आले व म्हणाले, " अशोक ! गिरणीत आपल्या हाताखाली बजाबा काम करूं लागले तर चालेल ना ? "

' माझी काही हरकत नाही. ' अशोकनें उत्तर दिलें. सुधाला त्यामुळे किती आनंद झाला. ती बजाबास उपदेशाच्या चार गोष्टीहि सांगू लागली.

अशोक खोलींत केव्हां जातो याचीच नीली वाट पहात होती. खोलीत अशोक पोषाक करीत असल्याचें तिला दिसलें. धांवत जाऊन तिनें हातामधील शर्ट ओढून घेतला.

" आज रविवार आहे ! बाहेर कुठं जायच नाही—"

" म्हणजे ! रविवार म्हणजे माझा बंदीदिन आहे वाटतं ? "

" इश्श ! खरंच, कुठं निघाली स्वारी ? "

" प्रकाशकडे !–"

" मी येते."

" कशाला ? "

" सहज तुमच्याबरोबर ! "

" चल ! "

' चल ' म्हणताच नीलीने आनंदाच्या भरांत अशोकच्या मानेभोवती आपल्या नाजुक बाहूंचा विळखा घातला. लाडीकपणाने ती म्हणाली,

" खरंच ! माझी चेष्टा नाहीं ना करीत ? "

" मुळीच नाही. "

नीलीने झटकन् दार लावले. पोषाक केला व अशोकपुढे येऊन उभी राहिली.

" वा ! तूं तर सिनेमा नटीच दिसू लागलीस की ! "

" बरं, बरं ! " असे म्हणत नीलीने अशोकचा हात धरून त्यास खुर्चीवरून उठवले.

## प्रकाशचें झणझणीत अंजन : : ८

लग्नानंतर दोन महिन्यांनी प्रकाशच्या भेटीस अशोक आज प्रथमच येत होता. नवलाखी बाग जसजसा जवळ येऊं लागला तसतसा त्याचा आनंद हृदयाच्या भावकुंडामधून वरवर उसळूं लागला. त्याला 'हरपलें श्रेय' पुनश्च प्राप्त होत आहे असं वाटलं. पण क्षणांत आपल्या तुटकपणा-बद्दल, स्वैर वृत्तीबद्दल प्रकाश काय म्हणेल, त्याला आपणाविषयीं काय वाटत असेल या विचाराने तो एकदम खिन्न होई.

बागेच्या फाटकाजवळ येतांच अशोकचा इमानी कुत्रा अशोकच्या अगावर एकदम भुंकत धावून आला. त्याकडे पहात नीली म्हणाली, 'पाहिलंत्, 'तुमचं खाऊन तुमच्यावर कसा उलटला तो ?'

'तुझ्यामुळं उलटला तो ! लग्नात तुझ्या लोकांनीं त्याला बेदम मार-ल्याचं आठवतं कां तुला ? कुत्र्यालादेखील श्रीमंत नावडूं लागले म्हणून हा असा अंगावर आला.–' असं म्हणून अशोकनं कुत्र्यास चुचकारण्यास सुरवात केली भीत भीत नीलीहि त्याच्या पाठीवरून हात फिरवूं लागली. तोंच कुत्रा शेपूट हालवून प्रकाशच्या झोपडीकडे धांवत गेला. जणूं अशोक आल्याची वर्दी देणारा तो ललकाऱ्याच झाला.

शेताच्या आवारांत लहान लहान मुली झिम्मा खेळत गाणं म्हणत होत्या. त्यांच्या अर्थशून्य गाण्याला कवीच्या महाप्रतिभेचा उजाळा मिळाला

नव्हता तरी गाण्याची माधुरी महाकाव्याला मागे टाकणारी होती. जानपद गीते कोणत्याही आधुनिक काव्यापेक्षां सरस असतात. अशोक हीं गाणीं तन्मयतेने ऐकूं लागला.

‘ भुलाबाई लेकी—सोनियाच्या बाकी
बाजूबंद टेकी—जडावाच्या जडवाच्या !
माथापूरचे एकच पान—भुलाबाईला दुरून नमस्कार ! ’

गाणं गात झिम्मा खेळत त्या अर्धनग्न बालबालिकानी शेताचा स्वर्ग केला होता. गाणे संपतांच अशोक नीलीला म्हणाला, ‘ पाहिलत, भुलाबाइ ! त्यानी तुला दुरूनच नमस्कार केला. ’ नीली किंचितूशा तिरस्कारान भ्रुकुटी उडवीत स्तब्ध झाली या रम्य वातावरणामधून मुळी हालूंच नये असे अशोकला वाटलं. पण इतक्यांत शेतावरील अनेक कामकरी तेथे आले व त्यांनी अशोकला ‘ भुइंगत प्रणाम ’ केला अशोक विरमला. ‘ अरे, जारे, भाई ’ अशा आत्मीय एकेरी नांवाने संबोधणारी ही मंडळी आज लीनतेने लवून ‘ जी हुजूर ! काय हुकूम आहे ? ’ अशा भावनेने आपणाकडे का पहातात याचं रहस्य अशोकला उलगडेना ! तो क्षणाक्षणाला विरमू लागला. शेतावरील आपला आत्मीय भाव येवढा नष्ट व्हावा ? मी या लोकाना इतका पारखा नी परका झालो ? तेव्हां आणि आतां-ते चित्र नी हे चित्र पहातांना त्याची स्मृती क्षणाक्षणाला विव्हल झाली.

स्मृती ही धीवरासारखी आहे. आपले जाळे विचारसागरांत टाकून ती त्यांत असख्य गतप्रसग पकडते. जाळ्यामधील मासे रेताड वाळूवर पडतांच ते जसे तडफड तडफड करूं लागतात, तद्वतच गतप्रसंग स्मृतीच्या जाळ्यांत येतांच तडफड करू लागतात. त्यामुळे मनाला किती दारूण क्लेश होतात ! ‘ जगांत स्मृती नसती तर कितीतरी दुःखांचा नाश झाला असता. ’ या महाकवीच्या उक्तीची सत्यता अशोकला आज पटली.

कोणी बोलेना, कोणी हंसेना ! कोणाच्या डोळ्यांत प्रेमाचं टिपूस दिसेना की, आपलेपणाचा जिव्हाळा भासेना ! अशोकला फार वाईट वाटले. मंदमंद पावले टाकीत तीं दोघे प्रकाशच्या झोपडीत आली. प्रकाश शांतपणे

बी बियाणें चाळीत बसला होता. त्यामुळे सर्वत्र राख उडून झोपडींत 'राखोडी' वातावरण झाले होते. सदाकदा याच धुळवडीत वावरणारा अशोक–पण त्यासहि आंत पाऊल टाकतांना संकोच वाटला. नीलीने तर डोक्यावर आजीबाईसारखा आडवा पदरच घेतला. अशोकला पहातांच प्रकाशला केवढा आनंद झाला, पण जवळच नीलीची मूर्ती दिसतांच तो चटकन् गंभीर झाला. त्याच्या धीरगंभीर चेहऱ्याकडे बघताना नीली न कळत नमली; तिनं प्रकाशला नमस्कार केला. दोन महिन्यांपूर्वी याच नीलीला नमस्कार करतांना केवढा ताठरपणा आला होता! पण ती आज अष्टांगांनीं लवलेली, नमलेली, पहातांच अशोकला आभाळ भरून आनंद झाला. कां? ती एक भूक होती.

श्रीमताच्या मुलीनं नमावं–ही अशोकची भूक!

प्रकाशसारख्या नोकरांनी आपणाला खडी ताजीम द्यावी ही नीलीची बालपणीची भूक!

मानसन्मानाच्या आदरसत्काराच्या याच भूकेनं जगांत 'तूं मी' 'उच्च नीच' भेदभाव निर्माण केला आहे.

'मी बाग पाहून येते अं' असं निमित्त करून नीली त्या धुरकट वातावरणामधून बाहेर पडली. मात्र अशोकला एकदम भडभडून आले.

'प्रकाश! शेतावरील सारीजण अशा दुजाभावानं आतां माझ्याशीं कां वागलीं?'

'प्रश्न न विचारतां तूंच याचे उत्तर देशील असं मला वाटलं होतं!'

'मी यांना कोणत्या रीतीनं दुखवलं?'

'वेडा आहेस! अशोक, तूं येथ लहानचा मोठा झालास. वयानं मोठा झालास, पण मनानं मूलच राहिलास! तुझ्याकडे ते आजवर आदरानें पहात, तूं माझा म्हणून त्यांनी तुला जीव कीं प्राण मानावे, आज ना उद्यां तूं कर्तृत्ववान् होऊन त्यांचा उद्धार करशील या आशाळभूत भुकेनें त्यांनीं तुला देवपण दिलं! तुला ते सहन झालं नाही. श्रीमतांच्या हळदीनं पिवळा होतांच तूं त्यांना विसरलास! त्यांच्या लग्नप्रसंगी ते तुला

कधीं विसरले का ? वराला मानपान दिला नसेल इतकी तुझी बडेजाव ते ठेवीत ! त्यांच्या आनदांत त्यांनी पहिलावहिला घांस तुला दिला. पण तूं–अशोक ! खेडुतावर अखंड प्रेम कसं करावं, त्यांना आत्मसात् कोणत्या मार्गांनीं करावं, हे सुशिक्षितांना कळत नाहीं–तुला या लोकांची कधीं तरी आठवण झाली ? ''

'–पण मी फार कामांत होतो–'

'वा ! ही मंडळी बेकाम पडून आहेत असं का तुला वाटतं ? सत्ता नी पैसा तुझ्या हाती येऊन स्वतःची चैन करण्यापलिकडे तूं यांच्या-साठीं काय केलंस ? त्यांनीं तुझ्यावर कां प्रेम करावं, त्यांनीं तुला आपलं कां म्हणून म्हणावं ? '

' कां ? लग्नाच्या सोहळ्याबद्दल मी या लोकांना– '

' हजाराची देणगी दिली हेंच तूं सांगणार ना ? ते तूं कशाला सांगायला हवय् ? वर्तमानपत्राच्या हजार जिभांनीं जगाला ते केव्हांच जाहीर केलं ! श्रीमंताच्या ' पै 'च्या दानास पासरीभर प्रसिद्धी मिळते, पण गरिबाने एका हाताने स्वतःचें प्राणदान केले तरी ते त्याच्या दुसऱ्या हाताला कळत नाहीं. मग साऱ्या जगाला कळण्याची गोष्टच राहो ! तुझे हजार रुपये, तुला चटकन् आठवले, पण लाखाच्या मोलाचा यांचा त्याग, प्रेम, आपु-लकी, यांचा मात्र तुला विसर पडला ! ''

शेतकऱ्यांचे नांव सांगून आपली स्वतःचीच तळमळ प्रकाश आपणा-जवळ व्यक्त करीत आहे हे अशोकच्या चटकन् ध्यानांत आले. त्याच्या डोळ्यांत नवीन अंजन पडले. प्रकाशच्या प्रेमाची त्याला विविधरूपे पटापट दिसूं लागलीं. आई नाही, बाप नाही, अशा निराधार स्थितीत प्रकाश परमेश्वरासारखा पाठीशीं आला. पाठचा भाऊ समजून त्याने आपणांस वाढवले, शिक्षण दिलं, मोठं करून मोठेपणा दिला. आईच्या प्रेमाची जागा अनेक कोडकौतुक करून त्यानेच भरून काढली, अन् आज लग्न होतांच त्याच्याशी इतक्या तुटकपणे वागलो ! का ? केवळ यौवनसुलभ प्रेमाच्या भुकेसाठीं ! हा स्वार्थ, हे प्रेम की हे कर्तव्य ? सर्व तरुणतरुणींना आई, बाप, बंधू, आप्त मंडळी लग्न होतांच आजकाल नकोसे कां वाटतात ? वाडवडील

आमचें पालन पोषण करतात हें पाप करतात की पुण्य करतात ? हक्काच्या माणसावर आम्हाला कर्तव्याने प्रेम करतां येत नाही, तेथे आम्ही विश्वबंधुत्वाच्या, साम्यवादाच्या, समानतेच्या दिखाऊ कल्पना उराशीं बाळगाव्यात ? अशोक जागृतीने दिङ्मूढ झाला. हातरुमालाने अश्रू पुशीत तो म्हणाला, " प्रकाश ! क्षमा कर ! मी सर्वांचेच महान् अपराध केले आहेत. तुमच्या प्रेमाची याचना करण्यापेक्षां ते मी होऊन मिळवलं पाहिजे–"

" शाबास ! आतां मात्र तूं ' माझा अशोक ' म्हणून बोलूं लागलास ! प्रकाशने अत्यानंदानं त्याच्या पाठीवरून हात फिरवला. व त्यास घेऊन तो झोपडीबाहेर आला. बराच वेळ कोणी कांहीच बोलले नाहीं. अखेर अशोक म्हणाला,

" प्रकाश ! मी शेत सोडलं ही मोठी चूक केली---"

" मुळीच नाही. नेहमी प्रश्न स्थलाचा नसून कार्याचा असतो. शहरांत राहूनहि तुला कितीतरी कार्य करता येण्याजोगे आहे--शहरांतील मजुरांच्या जीवनाची आज कोण बजबजपुरी झाली आहे ! त्यांच्यांत संघटना नाहीं, प्रतिकारशक्ति नाही, त्याना एकसूत्री बनवून आघाडीवर आणणारा हितकर्ता नेता नाही ! आरोग्य नाहीं, शिक्षण नाहीं, स्वाभिमानदेखील नाही. त्यांचा उद्धार कर, त्याना मार्गदर्शक हो ! परतंत्र राष्ट्राला पैसा नसला, शिक्षण नसले तरी एकवेळ चालेल ! पण मी गुलाम आहे, मला स्वतंत्र झाले पाहिजे येवढा स्वाभिमान जागृत झाला म्हणजे स्वातंत्र्य फार दूर राहूं शकत नाही. त्या स्वाभिमानाची ज्योत पाजळण्याचे महत् कार्य तूं कर ! "

प्रकाशने अशोकला गंभीरपणे अनत मोलाच्या अनुभवाचे घुटके पाजले. समाजाला काय हवे, काय नको–तरुणांनी आज काय करावे, सर्वांच्या जीवनांत आशेचा ओलावा कसा येईल, शहरांतील यांत्रिक जीवन व खेड्यांतील शेतकी जीवन यांचा मेळ कसा बसेल, आपण कसा बसवावा यासंबधीं अनेक उपाययोजना निवेदन करून त्यास कार्यप्रवृत्त

केले. त्यामुळे प्रकाशला बरे वाटले तर अशोकला पुनश्च उत्साहप्राप्तीनं आनद झाला.

अशोक आदर्शवादी तर प्रकाश वास्तववादी, व्यवहारवादी ! एकाच्या भराऱ्या गगनांत तर दुसऱ्याची सथ गती प्रत्यक्षाच्या प्रांगणांत ! एक नुसत्या कल्पनेत झुलणारा तर दुसरा प्रत्यक्ष कृतींत सुख मानणारा ! या भिन्न प्रवृत्तींचा हा एक सगम होता, आदर्शवाद नी व्यवहारवादाची ही सांगड होती.

प्रकाशाच्या उपदेशाचा प्रत्येक शब्द आपण खरा करून दाखवूं अशी ईर्षा अशोकच्या मनात यावेळी जागृत झाली. इतक्यांत संध्याकाळ होऊं लागल्याने अशोकन नीलीचा तपास सुरू केला. तोच निली परत येत असतांना त्यास दिसली.

'कां? कशी आहे बागेची शोभा?' प्रकाशने हंसत हंसत नीलीला विचारले.

'अप्रतीम आहे, अवीट आहे! पण सदानूकदा या सृष्टिसौंदर्यांत राहणाऱ्याना पुढ पुढ कंटाळा येत असेल, नाहीं? कधीमधी गंमतीखातर इथं सहल करण मजेचं आहे-''

चुकता तुम्ही! जसजसा अधिक काळ या ठिकाणी जाईल तसतसे तुम्हांला इथ अधिक सौंदर्य दिसेल! अति सहवासानं कटाळा यायला हे काही शहरांतील तकलुपी सौंदर्य नाही. आम्हाला तर प्रत्येक पानापानांत सौंदर्याचं विश्व दिसत आहे.'

नीली हंसली! तिच्या मनाला हे मुळींच पटेना! ती म्हणाली, ''सृष्टिसौंदर्याची येवढी महती गाता पण मला तर साऱ्या शेतात एक चिटपाखरूही दिसल नाही.

''शक्य आहे. शेतामधील पिकाचं संरक्षण करण्यासाठीं आम्ही मधून मधून कांठी मडक्याचे डोमकावळे उभारीत असतो. तुझ्यासारखा श्रीमत डोमकावळा शेतांत फिरू लागल्यावर पक्ष्यांची काय प्राज्ञा आहे घिरट्या घालण्याची! '' अशोकच्या या अर्धविनोदी शब्दांनीं नीली किंचित् ओशाळली, किंचित् संतापली व घरी जाण्यासाठी चुळबुळ करूं

लागली. तिचा उचलजागता, पळता भाव ओळखून अशोक म्हणाला, "आज मी घरीं येत नाहीं. इथंच राहणार! तुला लागेल तर तूं जा परत-"

"तर तर–मी एकटीं बरी जाईन ? तुम्हालाहि आलं पाहिजे"

इतक्यांत जेवणाची तयारी असल्याची वर्दी घेऊन एक कामगार प्रकाशकडे आला. सर्व मंडळी जेवायला निघाली नीलीच्या मनांत तेथें जेऊं नये असं होतं. पण अशोकपुढे ती बोलणार तरी काय ?

चांदणे टिपोर पडले होते. विहिरीशेजारी एक स्वच्छ जागेत जेवणाची तयारी केली होती. खेडवळ गलिच्छ असतात- छे छे जेवणाची त्यांची पात्रे, जेवणापूर्वी हातपाय धुण्याची त्यांची पद्धत या गोष्टी आम्हां सुशिक्षितांत तरी दिसून येतात कां ? जेवणाचा बेतहि अगदी साधा होता. जाड भरडलेल्या जोंधळ्याची गरमगरम भाकरी, कांदा, शेतामधील नुकतेच उपटून आणलेले ताजे मुळ, टोमॅटो व प्रत्येकाच्या थाळींत ताजे दूध नी ताक! किती गोड, किती रुचकर, किती सोज्वळ अन्न हें ! पुष्कळ दिवसानी अशा जेवणाचा स्वाद घेत असल्यामुळे अशोकला या अन्नाच्या रुपानें प्रत्यक्ष परब्रह्म भेटीला आले असे वाटले तर नीली–पंचपक्वान्नाला चटावलेली नीली-तिला पहिला घांस घशाखालीं उतरणं मुष्कील झाले. सर्वजण वर्तुळाकार बसले. प्रकाशनें चंद्राला नमस्कार केला. एकदम सर्व शेतकरी--'वदनीं कवळ घेतां नाम घ्या श्रीहरीचें !' "ॐ सहनो भुनक्तु, सहवीर्यं करवावहै" अशा उच्च स्वरांत प्रार्थना करूं लागले. ती ऐकून मात्र नीली स्तंभित झाली. आपण ज्यांना खेडवळ म्हणतो त तितके खेडवळ खास नाहींत अशी तिची मनोदेवता तिला सांगू लागली. गप्पासप्पा चालत, आग्रह चाले अशा एकात्म भावाने जेवण सुरू होते. इतक्यांत एक लॉरी तेथें आली व त्यांतून अशोकचा गडी खालीं उतरला. त्यानें मुजरा करून अशोकला एक 'अर्जंट' पाकीट दिलं. अशोकनं ते फोडून वांचलं. पाकीट व पत्र बाळासाहेबांचं होतं.

‘ पपांचं पत्र आलंय ! ’ प्रकाशकडे नी नीलीकडे पहात अशोक म्हणाला.

‘ काय आलंय ? ’

‘ अत्यंत जरूरीच्या कामासाठीं मी उद्याच्या विमानाने अमेरिकेला जाणार आहे. ताबडतोब घरीं या ! पुष्कळ गोष्टी आपणास समजावून द्यायच्या आहेत–’ वरील मजकूर वाचून अशोकन पत्र माडीवर ठेवलं.

‘ पाहिलं ? पैसा असला पाहिजे मनुष्य क्षणांत उत्तरध्रुवाला फेरी मारून येतो. ’ अशोक कुत्सित कोटीनं नीलीकडे पहात म्हणाला.

जेवणखान चटकन् उरकून अशोक व नीली परत जाण्यास निघाली. एकदिवसाआड तरी प्रकाशकडे नियमाने यावयाचे असा अशोकनं निर्धार केला. ‘ प्रकाश ! मी तर येईनच उद्या ! पण पुढील आठवड्यांत मी रंगीत कापसाचा पहिला प्रयोग गिरणीत करणार आहे. तुम्हाला आतांच निमंत्रण देतो. सर्वांनीं आलं पाहिजे. कसलीहि सबब मी ऐकणार नाहीं. ’ असे सांगून अशोक निघून गेला. जातांना आज आपण कांहीतरी नवीन शिकलो, कांहीतरी नवीन धडा घेतला या विचाराने त्याच्या मुखावर एक प्रकारचं सात्विक समाधान झळकत होतं.

*  *  *

घरी येण्यास जवळ जवळ रात्रींचे १० वाजले. तडक बाळासाहेब-कडे जाऊन अशोकने त्यांच्या सांगण्याची लांबलचक टिपणे करून घेतली. व पहाटे लवकर उठण्यासाठी तो झोपावयास निघाला. नेहमीं निजण्यापूर्वी तो सर्व बागेमधून, घरांतून सहज एक फेरी मारून येत असे. त्याप्रमाणें तो निघाला असतां-स्वयंपाकगृहांत स्वयंपाकीण सरस्वतीबाई झाकपाक करीत होती. पण पलिकडे कोठीत मात्र कोणची तरी धुसफूस चाललेली अशोकला ऐकूं आली. पाय न वाजवता तो कोठीजवळ आला. तो त्याला काय दिसले ? त्याने काय ऐकले ?

सरस्वतीबाईची तरुण मुलगी सुशिला बजाबाच्या तावडीमधून सुटण्याचा प्रयत्न करीत होती.

‘ सोडा मला ! तुम्ही श्रीमंत झाला म्हणून माझ्यावर असा घाला घालूं नका ! नाही सोडत ? मी मोठ्यानं ओरडेन--पहा...’

‘ सुशिले ! तू किती मूर्ख आहेस ! ओरडलीस तर त्यांत बेअब्रू कोणाची होईल ? तुझी की माझी ? लक्षांत ठेव, गडबड करशील तर उद्याच्या उद्या तुझ्या आईला कामावरून काढून टाकीन ! ’ असे म्हणून बजाबाने तिच्याशी अतिप्रसग चालवला. हे पाहून अशोकच्या अंगाचा इतका भडका उडाला की, बजाबाचं काय करावं नी काय करू नये असे झाले. दारावर लाथ मारून अशोकन दार उघडले. बजाबा अशोकला पाहून अगदी आयस्क्रीम बनला. अशोकनं दाराकडे बोट दाखवीत सुशीलेला निघून जाण्यास सांगितले. डोळे वटारून तो रागाने बजाबाकडे पाहू लागला. बजाबाने उलट एक मिस्किल हास्य केले. त्यामुळे अशोकच्या रागाचा पारा अधिकच चढला.

‘ शरम वाटत नाही तुम्हाला ? नोकर लोकांच्या गरीबीचा, दैन्याचा, दारिद्र्याचा तुम्ही असा फायदा घेतां ? सुशिला कुमारिका आहे, तिला अद्यापि सर्व आयुष्य काढावयाचं आहे ही साधी माणूसकीची गोष्ट तुम्हाला नाही कळत ? ’

‘ लग्नापूर्वी पांच वर्षे नीलीशीं संगनमत करतांना तुम्ही कोणत्या नीतीचा विचार केला होता, तर मी हिच्या बाबतीत करूं ? ’ बजाबाचे हे अर्वाच्य शब्द ऐकून अशोक गार झाला. वस्तुस्थिती काय असते व जग आपापल्या परीने काय कंड्या उठवते याची पहिली श्रीमंती ठेच अशोकला आज लागली. पुनश्च एक मिस्किल हास्य करून बजाबा निघून गेला.

‘ श्रीमंताचे राजवाडे म्हणजे गोरगरीबांना भ्रष्ट करण्याचे कुंटीणखाने आहेत. किती तरी निरपराधी लोकांच्या शीलाचे येथे खून पडत असतील. अरेरे ! श्रीमंतांची ही ‘ भूक ’ किती राक्षसी स्वरूपाची आहे ? ’ असे तळमळत अशोक आपल्या खोलीकडे निघून गेला.

# श्रीमंतांचे विलास : : ९

ठरल्याप्रमाणे बाळासाहेब अमेरिकेला गेले.

कांही सणानिमित्त सर्व गिरण्यांना लागोपाठ दोनतीन दिवस सुटी होती, म्हणून अशोक शेतांची प्रगती कुठवर झाली हे पहाण्यासाठी प्रकाश-कडे गेला. त्यामुळे नीलीचा जीव अगदी बेचैन झाला. नव्या नवतीच्या श्रीमंत पत्नीला पतिविरह अगदी सहन होत नाही. अशोक नसल्याने नीली दिवसभर सारखी चिडचिड करूं लागली.

दुपारचं जेवण होतांच रजनी नीलीला म्हणाली, "तुला घरी करमत नसेल तर चल आमच्याबरोबर! आज माझा 'हनीमून' रेस जिंकणार आहे." नीलीच्या विलासप्रिय मनाला करमणुकीचा हा उत्तम मार्ग मिळाला. उत्सुकतेने ती सुधा व रजनीबरोबर महालक्ष्मीवर रेसला गेली.

महालक्ष्मीच्या मैदानांत नीली उतरतांच हजारों लोक तिच्या नेत्र-उल्हासी पोषाकाकडे टकमक पाहूं लागले. तिला केवढी धन्यता वाटली! तशांत 'टाईम्स'चा फोटोग्राफर पटकन् पुढे आला व 'फॅशन्स ऑन महा-लक्ष्मी'साठी त्याने तिचा खास फोटो घेतला. या प्रसंगी नीलीला आपल्या मोठेपणाची बेफाम धुंदी चढली, आपण काय करतो अन् काय नाहीं याची जाणीव तिला नव्हती.

रेसेस सुरू झाल्या. सुधा व रजनीप्रमाणे तिनेहि पांचसात घोड्यांवर पैसे लावले. पण-सर्व रेसेस संपल्या! रजनीचा 'हनीमून' आला नाही कीं कोणालाहि पैसे मिळले नाहीत. तिघींनी मिळून काही नाही तरी आठ दहा हजार रुपयांचा चुराडा केला. श्रीमताच्या करमणुकीच्या भुकेला कसले तरी बंधन असते काय!

मन अत्यंत आनदी असलं म्हणजे किवा अत्यत उदास असलं म्हणजे त्याला करमणुकीची फार जरूरी भासते. रात्र कशी काढावी याचा ती विचार करित असतां, सुधा नी रजनी पुनश्च तिच्या खोलीत आल्या व म्हणाल्या, नीली! आम्ही जातो मुव्ही डान्सला! डबल प्रोग्राम आहे. तूंहि चल-घरीं एकटी तरी काय करणार?" आज नीलीन जवळ जवळ सर्वच बधनें फेकून दिली. पुनश्च ती त्यांच्याबरोबर गेली.

सर्वजणी सिनेमागृहात आल्या. जिकडे तिकडे युरोपीअन जोडपी, कांहीं सस्थानिक, व सरदार यानी सिनेमागृह अगदी फुलून गेले होते. अनेक ओळखीचे श्रीमत नीलीला भेटले. प्रत्येकानीं हस्तांदोलन करून तिची विचारपूस केली. तिला क्षणभर वाटले, 'याला म्हणाव आयुष्य!'

सिनेमाबोलपटाची लोक फार प्रशंसा करू लागले. बोलपटाचे नाव असेच कांहीं होते. हा बोलपट त्यांतील अश्लीलतेमुळं युरोपच्या बहुतेक राष्ट्रांत बंद पडला होता. मूळ प्रतीत थोडी छाटाछाट करून तो आज मुंबईत दाखवला जात असल्याने विलासी श्रीमंतांची सिनेमा गृहावर नुसती झुंमड लागली होती.

दिवे मंद मंद होऊं लागले. त्या हिरव्या अधुक अधारांत सिनेमागृह रेशमी साड्या व जरीकिनारी पातळांनी लखलख करित आहे असा भास झाला. त्यांत मनोभावना कंपायमान करणारी सारगीच्या सुरेल सुरांची लहर उठूं लागली. आमच्या श्रीमंतांना विलायती करमणुकीनी आजकाल जवळ जवळ वेडे केले आहे. त्यासाठीं ते वाटेल तसा पैसा खर्च करतात. स्वदेशांत या करमणुकी अपुऱ्या वाटू लागल्या म्हणजे हे धनपति प्रवासाच्या नांवाखालीं किंवा प्रकृतीच्या सबबीवर परदेशात जातात नी मनमानेल तशी जीवाची मुंबई करतात.

बोलपट सुरू झाला ! अथपासून इतिपर्यंत हा पट उत्तान शृंगारानं भरला होता. कथानक एका कुमारिकेच्या वाममार्गी जीवनवृत्तांतावर आधारलेले होते अर्थात् बोलपटांत या कुमारिकेचीं अर्धनग्न चित्रे ठिकठिकाणीं विखुरलीं असल्यास नवल नाही ! एका प्रसगीं तर या उत्तान शृंगाराचा अतिरेक झाला, एका कमलपुष्पांनी फुललेल्या प्रशांत जलाशयांत चांदण्या रात्रीं ही वाममार्गी कुमारिका विवस्त्र स्थितीत स्नान करतांनाचे दृश्य होते. पडद्यावर हे दृश्य दिसताच टाळयाचा नुसता कडकडाट झाला. स्नान करित असतां एक तरुण झाडामागे दडून या तरुणीच्या सौंदर्याचे नेत्रसुख घेत असता प्रेक्षकांनी मिटक्या मारावयास सुरवात केली. श्रीमंतांच्या सौंदर्याच्या, कलेच्या, करमणुकीच्या व विलासाच्या काय या हिडीस कल्पना ! याच विलासासाठी ते लाखो रुपये उधळतात ना ! यापेक्षां निर्भेळ आनद देणारीं करमणुकीची साधने जगांत नाहीत काय ?

बोलपट संपताच, अमेरिकेतील एका नग्नवसाहतीमधील अशींच अश्लील दृश्ये दाखवण्यांत आलीं. त्यानतर मधली विश्रांती सुरू झाली.

सर्व जण ‘ किती छान पट आहे ’ म्हणून गुणवर्णन करूं लागले. इतक्यांत ट्रेमध्ये ‘ बीअर, व्हिस्कीचे ’ ग्लासेस घेऊन वेटर खुर्च्यांच्या रांगामधून व बॉक्सच्या चौकटीतून फिरूं लागले. बोलपट पाहिल्यावर नीलीची सदसद्बुद्धि कलकित झाली असंच म्हणण भाग पडते. सुधाने नी रजनी देवीने तिला ‘ व्हिस्कीचा छोटासा पेग ’ पुढे केला. कसलाहि विचार न करतां तिने हात पुढे केला. पण पुन्हां तिला काय वाटले कुणास ठाऊक, तिने तो परत केला. विश्रांतीचा मधला अवधी सुरापानासाठींच ठेवतात काय ?

पुढील कार्यक्रम नृत्याचा होता. नर्तकी युरोपीय होती. या नृत्याचे नांव ‘ प्रेमहरण नृत्य ’ होते. पडदा वर गेला. रंगभूमीच्या मध्यावर नुसती चड्डी घातलेला भरजवानींतील एक तरुण पुतळयाप्रमाणं उभा होता. मंजुमधुर वाद्यांच्या छुमछुमाटांत नर्तकीनं प्रवेश केला. तिच्या केतकी देहावर बारा हात लाबीचें अत्यंत झिरझिरीत असे वस्त्र होतें. वुईंगमध्ये पंखे चालुं ठेवल्याने हे वस्त्र वाऱ्यावर वरवर उडूं लागले. नाचतां

नाचतां ती वस्त्रत्याग करूं लागली. शरीर जसजसे उघडे पडूं लागले तसतसा दिव्याचा प्रकाश मंद मंद होऊं लागला. नटव्या आविर्भावांत नर्तकी आपल्या 'सवंगड्या'जवळ येऊं लागली. प्रत्येक पदक्षेपणाला अंगावरचे वस्त्र हळूं हळू गळून पडत होते. सवगड्याने तिचा हात धरतांच देहावरील अखेरची माया गळून पडली. व या ठिकाणीं पडदा पडला. टाळयावर टाळया होऊ लागल्या. पुन्हा पुन्हा हा नाच 'वन्स-मोअर'च्या मागणीमुळे करण्यांत आला.

कार्यक्रम संपून सर्व मंडळी बाहेर पडली. मोटारमध्ये बसणार तोंच सुधा नी रजनीला दोन तरुण भेटावयास आले.

'ओ, हो-! तुम्ही केव्हां आलांत?' त्या दोघी त्यांना पाहून उद्गारल्या.

'आजच-'

'कुठं उतरलांत?'

'ताजमहालमध्ये. चला की, जरा थोड्या गप्पा मारून मग जा लागेल तर तुम्ही!' सुधाने रजनीकडे व रजनीनें सुधाकडे बघितले.

'नीली! तू जा घरीं-आम्ही येऊं मागाहून!' असे म्हणत त्या दोघी त्या तरुणांबरोबर ताजमहालांत निघून गेल्या. नीलीनं मोटार सुरू केली व ती घरी आली. रात्रभर तिला तींच दृश्ये दिसत होती. सकाळीं पांच वाजतां सुधा नी रजनी परत आल्या-पण तिला या तंद्रीत कळले नाही.

## कला, नीति व श्रीमंती : : १०

या बोलपटाचा नीलीला येवढा चटका लागला कीं, तिनं सकाळी गड्याला पाठवून एक तिकीट आणून ठेवावयास सांगितले. चार वाजले, नीली या 'शो'ला जाण्याची तयारी करित होती. समोर मेजावर पुष्प-पात्राजवळ ' इव्हीनिग न्यूज ' होता. पहिल्या पानावर ' महालक्ष्मीवरील ' आज कालची फॅशन ' या सदराखाली नीलीचा फोटो आला होता. त्याकडे पहात तिला आपल्या सौंदर्याची, आपल्या पोषाकाची फाजील घमेंड वाटूं लागली.

काय ही श्रीमंतांना सौंदर्याची विलक्षण ' भूक ! ' या ' भुके'मुळे श्रीमंतांना लागतील अशी विविध खाद्ये पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणीं जागोजाग ठेवण्यांत येतात. आज मोठमोठ्या शहरांत सौंदर्याच्या, कलेच्या, अश्लील भुकेची तृप्ती करण्यासाठीं अश्लील वाङ्मयाची दुकाने सर्रास उघडण्यांत आलीं आहेत. या दुकानांत नग्न स्त्रियांचे फोटो, लैंगिक विलासांचीं अनेकविध छायाचित्रे, नी अश्लीलताप्रधान लेख असलेलीं मासिके विकण्यांत येतात. हे खाद्य सर्वांसाठी असते. खास श्रीमंतांच्या ' भुके 'ला लज्जत देणारे वाङ्मय निराळेच असून त्यांच्या किंमती शंभर शंभर रुपयांपर्यंत असतात. या मासिकांचा व श्रीमंती साधनांचा किती अफाट खप होत आहे ! या विलासी वाङ्मयांतील विनोदी कोट्या, स्तन,

व कटिभागांतील अवयवांना अनुलक्षून असतात. अन् हा सारा अश्लील संग्रह ' कले 'च्या नांवावर बिनदिक्कतपणे विकला जातो. आजच्या कलोपासकांची हीच का अभिजात कला? नटीच्या कटीतटीं विलास करणं म्हणजेच का कलाप्रधान वाङ्मय? कांही कलोपासक शिंगे मोडून ' शास्त्रज्ञ ' बनले आहेत. हे कलोपासकी ' शास्त्रज्ञ ' लैंगिक ज्ञानाच्या प्रचारार्थ चदनापरि अहोरात्र झिजत आहेत. लैंगिक विषयांचे ज्ञान सुखी संसाराचे खरोखरीच सूत्र आहे का?

सौंदर्य, कला व जविन यांचा संगम अशा अधोगामी विलासप्रत जावा? त्यापेक्षां हे कलोपासक, त्याची कलावान् कलमे नी कुंचले बोथट कां होत नाहीत? श्रीमंताचे हे वैयक्तिक विलास समाजाची केवढी हानी करतात याची कुणालाहि कल्पना येणार नाही.

* * *

नीली आरशासमोर उभी राहून केशभूषा करूं लागली. मेजावर दहा पांच सुगधी तेलाच्या बाटल्या होत्या. यारडले, बरजुईस, पॉंड, फोर सेव्हन वनवन, किती तरी प्रकार होते! क्रीम्स, पोमेड, स्नो, सेंट्स, शापू, सोप-पावडर यांनी मेज नुसते भरून गेले होते. एकदा क्रीम लाव, त्यावर रोझ, चेरी ब्लॉसम पावडर लाव, पुन्हा पफने ती साफ कर-स्प्रेने त्यावर सेटचे सिचन कर-असा नीलीचा विलासी कार्यक्रम चालला होता. श्रीमंत घरांतलि रिकामटेकड्या पुरुषाचा व स्त्रियांचा हा ' ब्यूटी कल्चर 'चा विलासी खेळ आजकाल सर्वत्र पहावयास मिळतो. महिन्याकांठी या मुखसौंदर्यावर शेकडो रुपये खर्च करणाऱ्या पुरुष व स्त्रिया आजच्या आमच्या समाजांत किती तरी आहेत!

एका हातांत बारीकसा कॅमेल ब्रश घेऊन नीली भुवयांचे केस साफ करीत होती व दुसऱ्या हाताने त्यावर रगाच्या तिरप्या कमानी रेखाटित होती. हाताची नखे रंगवून होतांच तिने ओठ रंगविण्यास प्रारंभ केला. त्यासाठी तिनं ' गोल्डन रे ' नांवाची अत्यत भारी लिपस्टिक आणली होती. दुसऱ्या मेजावर फॅशनची अनेक पुस्तके होती. त्यांतील एक ग्रंथ काढून निरानिराळ्या मॉडेलवरून ती ओठ रंगवूं

लागली. नीलीचा हा नित्याचा कार्यक्रम असे. आजवर अशोकने या गोष्टीकडे मुळीं लक्षच दिले नव्हते. अबूहून आल्यापासून त्याला घरांत जेवणाखेरीज अवांतर वेळच मिळत नसे. नीली आरशासमोर उभी राहतांच एकदम दचकून मागे सरकली. तिच्या पोटांत धस्स झाले. अशोक अचानक आल्यामुळे तिची तारांबळ उडाली. तिने चटकन् 'सिनेमा शो 'चे तिकीट ड्रावरमध्ये टाकले. इव्हिनीग न्यूजचा अंक मागे टाकून दिला. अशोक दारांत उभा राहून हे सर्व पहात होता. नीलीच्या डोळयापुढे एकदम असंख्य तारे चमकूं लागले. तिच मन तिला खाऊ लागले. कारण 'सिनेमा शो 'ला जाऊं नकोस म्हणून अशोकन आठ दिवसापूर्वीच तिला बजावून सागितल होतं. त्यामुळे तिला अशी धागधूक वाटणं अगदी साहाजिक होते. अशोकला पहातांच प्रफुल्लित होणारा तिचा चेहरा मलूल झाला कावऱ्याबावऱ्या दृष्टीनं ती अशोककडे पाहू लागली. उलट अशोकचा चेहरा अत्यंत गंभीर नी रागीट झाला. अन् त्याला तसे कारणही होते. आज बरेंच दिवस तो सुधा, रजनी यांच्याबद्दल लोकप्रवाद ऐकत होता. एक दिवस या जातान तरी कुठ म्हणून त्यानं शोध करण्याच ठरवलं होतं व त्यासाठी तो प्रकाशकडे जाण्याचं निमित्त करून बाहेर पडला होता. दुर्दैवाची गोष्ट येवढीच कीं अशोकला सुधारजनीच्या विलासात नीली आढळली ! कालच्या 'सिनेमा शो 'मध्ये नीलीचे सर्व विलासी रगढंग अशोकने नीट न्याहाळले होते. त्यामुळे त्याच्या अगाचा संताप झाला व संतापाच्या भरांत तो आज असा अचानक दारांत येऊन उभा राहिला. अशोकने एक पाऊल पुढे टाकतांच नीलीच्या हातून मेकपचा ब्रश गळून पडला. तिचा वामबाहू गाल नी ओठ यांच्या यांच्या लज्जालांछित सौंदर्याला झाकून घेण्यासाठी पुढे झाला व उजवा हात काकुळतीच्या भीतीने तिने आपल्या वक्षःस्थलाच्या राजस राजीवाजवळ धरला होता. मेजावर दृष्टी फेकून ती चंचल नेत्राच्या नजरेने अशोककडे पाहूं लागली. पण क्षणांत तिला आपल्या दुर्बळ मनोवृत्तीची जाणीव झाली. मुखावर उसनें हास्य उधळून ती पुढे आली व घाबरटपणाने दाटून आलेल्या आवाजांत म्हणाली, 'केव्हां आलांत ?' अशोक कांहींच बोलला नाहीं.

ती दोन पावलें मागे सरकली नी पुनश्च स्त्रियांचा जन्मजात मोहिनी कटाक्ष टाकून अशोकजवळ आली. अशोकने तिचा हात धरला व आपली गंभीर नजर नीलीवर रोखून म्हणाला,

'नीली! काल रात्रीं तूं कुठं गेली होतीस?' नको असलेला प्रश्न अशोकनं विचारून तिच्या हृदयावर भयंकर आघात केला. ती गोंधळली तिचे दोन्ही हात नी ओठ थरथर कापूं लागले. हृदय धडधडूं लागले. आपल्या हृदयातील भितऱ्या भावनांचे तुफान लपविण्यासाठीं तिने पदर सावरला. पण झिरझिरीत पदरान स्त्रियांना जिथ आपलीं लज्जामुखी कुचाग्रे लपवितां येत नाहींत तेथे भावनाचे तुफान त्या कशा लपविणार? ती अधो-दृष्टीने जमीनीकडे पाही व हळूच नजर वर करून अशोकच्या नेत्रांत प्रश्नाचा भावार्थ हुडकण्याचा ती प्रयत्न करी.

'सांग, कुठ गेली होतीस?' अशोकने पुन्हा तोच प्रश्न केला.

'कुठं नाही' नीलीनं निःशंकपणे उत्तर दिले. सत्यवृत्तांत सरळ-पणे सांगावा म्हणून तिचे ओठ धीट झाले. पण हृदयांतील भीरुभाव एकदम उचंबळून आला. इच्छेविरुद्ध तिच्या मुखांतून वरील शब्द बाहेर पडले. अशोक अधिक रागावला तिच्या हाताला किंचित्सा झटका देऊन त्याने पुन्हा तोच प्रश्न केला. मन पापी असते. एक पाप लपविण्यासाठीं ते पन्नास पापांची फौज निर्माण करते. एक असत्य लप-विण्यासाठीं ते अनेक असत्यें आघाडीवर आणते. खरी हकिगत अजून तरी सांगावी असं तिला वाटले. पण या वेळीहि न कळत तिने तेंच उत्तर दिले. नकारी शब्दाबरोबर तिची मानहि नकारी नागमोडी तोऱ्याने फिरली.

अशोकचे डोळे भरून आले. 'आजवर एका शब्दाने मी नीलीची अवज्ञा केली नाहीं, एका शब्दानं कसलेहि रहस्य लपवून ठेवले नाहीं, किंवा शब्दाने कधीं खोटे सांगितले नाहीं. असे असतां नीलीनं हा लपंडाव कां खेळावा त्याबद्दल त्याला हुरहुर लागली. पुन्हा एकदा संधी द्यावी म्हणून त्याने तोच प्रश्न केला. नीलीने पूर्ववत् उत्तर दिले. अशोकचा राग अनावर झाला. त्याच्या प्रेमळ वृत्ती बधिर झाल्या. न कळत यंत्रगतीने त्याचा

हात वर झाला ! त्याने नीलीच्या कपोलावर रागाचा रंग पांचहि बोटांनीं उधळला. नीली,–नाजुक नीली–तळतळत पलंगावर पडली. उशींत डोकें खुपसून रडूं लागली. अशोक खोलींत इकडून तिकडे फिरूं लागला. मागे वळून तो ड्रेसिंग मेजाजवळ आला. ड्रावर उघडले. त्याचा आवाज ऐकतांच नीली चपलेप्रमाणे धांवत आली. तिचा चेहेरा रागाने लाल झाला होता. अशोकचा हात धरून–' माझ्या टेबलांत ढवळाढवळ करावयाची नाही ' म्हणून तिनं धीटपणे अशोकला बजावले. ' अस्स ' म्हणत अशोकनं नीलीला दूर करून ड्रॉवरमधून ' सिनेमा शो 'चा पास बाहेर काढला. तो वाचला व निःशंकपणे फाडून टाकला. मागे पडलेला ' ईव्हिनीग न्यूज 'चा अंक भरकन् घेऊन त्यांतील चित्र दाखवित तो तिच्या अंगावर फेकला. पुन्हा खोलीत तो फेऱ्या घालूं लागला. क्षणभराने त्याला काय वाटले कुणास ठाऊक, त्याने मेजावरील ती अमूल्य सुगंधी द्रव्ये–सेंट, पावडर–शेजारच्या वॉश स्टॅंडमध्ये ओतून देण्यास प्रारंभ केला. आतां मात्र नीलीच्याने रहावेना. सर्व अवसान एकत्र करून करारी दृष्टीने ती अशोकला म्हणाली, " त्याला हात लावूं नका ! " " नीली ! उद्यांपासून यांतील एकहि वस्तु इथं दिसता कामा नये. मला हे बिलकूल पसंत नाही. "

' नसेल ! मी हे सर्व वापरणार '

अशोकला धक्का बसला. नीली असे बोलेल म्हणून त्याची अपेक्षा नव्हती. त्याचे डोळे अश्रुंनी भरून आले. दीर्घ निःश्वास सोडीत तो नीलीला म्हणाला,

" ठीक आहे ! माझी चूक झाली. " दारांतून बाहेर पडतां पडतां येवढे वाक्य उच्चारून अशोक आपल्या खोलींत गेला.

# नीलीचें परिवर्तन : : ११

नीलीने दार लावले. पलंगावर पडून ती ओक्साबोक्सी रडूं लागली. झाल्या प्रकाराबद्दल तिला काय वाटत होते ? दुःख, संताप, प्रेम-प्रतारणा यांच्या संमिश्र भावनांनी तिच्या सर्व चिद्‌वृत्ती बधिर होऊन गेल्या होत्या. बराच वेळ तिनं आपल्या हृदयांतील वेदना अश्रुरूपानं ओसरून टाकल्या. उशी चिंब भिजून गेली होती. वाऱ्याच्या झुळकेने ऊन अश्रूंचे पाणी गार होऊन तिच्या गालाला गारपणा आणित होते. ती उठली. टॉवेलने डोळे पुसले. आरशांत चेहेरा बघितला. तो इतका हिडीस दिसत होता की, त्याच्या विखुरलेल्या विद्रूपतेकडे पाहून, 'हेच कां माझं सौंदर्य' म्हणून तिला खेद वाटला. ती झटपट नळावर गेली. साबूनें तो मेकअप, ती पावडर तिने साफ धुवून टाकली. खरखरीत टॉवेलने चेहेरा अगदीं आरशासारखा निर्मळ केला. पुन्हा ती आरशांत पाहूं लागली. तिचे डोळे भरून आले. आतांमात्र तिच्याने रहावेना. ती दडदड धावत, धुगधुगत्या हृदयाने अशोकच्या खोलीकडे जाण्यास निघाली. तोंच अशोक हातांत ट्रंक घेऊन तिच्या मागे उभा राहिलेला तिला दिसला.

नीली एकदम दारांत आडवी झाली.

'कुठं चालला ?' करुण स्वरानें तिनें पृच्छा केली.

'जिकडं वाट फुटेल तिकडं!'

या उत्तराने नीलीला काय वाटले? पावसाच्या लहरीने धुऊन गेलेल्या गुलाबासारखा तिचा चेहेरा म्लान मलूल झाला. तिच्या नेत्रांतील नेहमींची तेजस्वी चकाकी, काळया ढगाआड लपलेल्या खिन्न चांदण्यासारखी झाली. तिच्या ओठावरील नैसर्गिक आरक्तता नष्ट होऊन ते फिकट झाले. गालावरील जातिवत शोभा अश्रुसिंचनाने नाहीशीं झाली, पानांच्या पाचोळयाखाली पडलेले पक्ष्याचे पिल्लू चिवचिव करूं लागतांच वरील पानपाचोळा हालू लागतो. तद्वतच चिवचिव करणारे तिचं हृदय दुःखाने खालवर होऊं लागल्यामुळे त्यावरील विरलं अचल विचालित होई. कंठ दाटून आला, त्यांतून बाहेर उमटणारे शब्द दुःखावेगांत विरून जात व त्यामुळे नुसता आर्तस्वर बाहेर पडे.

अशोक तिला दूर करून जाऊ लागला. त्याबरोबर दोन्ही हात दरवाज्याच्या दोन चौकटीवर ठेवून ती रडत म्हणाली,

'मी चुकले, मला क्षमा करा–'

'चुकलो मी. तूं नाहीस. आंधळ्या अविचारानं लग्न केलं ही माझी मोठी चूक झाली. परस्परापासून दूर रहाण्यांत दोघांचे हित आहे. कारण पतिपत्नीच्या हृदयावकाशांत प्रेमाची तीक्ष्ण व दुधारी सुरी सदासर्वदा लटकत असते. दोन हृदयापैकी एकाद हृदय विचलित झालं तर या सुरीच्या तीक्ष्ण धारेवर दोन्ही हृदये आपटून चरचरा कापलीं जातात व त्यांतून भळाभळ रक्त वाहूं लागतं. उलट दोघांची तन्मयता नी समरसता झाली तर या सुरीवर सारंगीचे गोड सूर उठतात. पण ते भाग्य आपणाला नाहीं. तुझं हृदय विचलित झालं, माझ्या हृदयाची ग्वाही मला देतां येत नाही–नीली! आपण दूर रहाणेच इष्ट आहे'

अशोकच्या दोन्ही खांद्यावर हात टेकून स्वतःच्या बाहूवर आपलें रडकें तोंड उभे करून ती म्हणाली,

'मला वाटेल ती शिक्षा द्या–पण तुम्ही जाऊं नका.'

नीलीच्या नेत्रांमधून टपटप पडणाऱ्या, अश्रूमुळे अशोकचा शर्ट

भिजूं लागला. त्याने हातामधील ट्रंक हळूंच खाली ठेवली व तो निश्चेष्ट उभा राहिला. नीली स्फुंदत होती.

‘ मी काल सिनेमा शोला गेले होते.’

‘ कां गेली होतीस ? जाऊं नकोस म्हणून तुला सांगितले होते ना ? ’

‘ हो, पण मी आतां कधी जाणार नाही. खरंच अगदी तुमच्या गळ्याची शपथ मी जाणार नाहीं.’

बोलतां बोलतां चोरट्या नजरेनें तिनं अशोकच्या मुखाकडे बघितले व क्षणार्धात मान खाली घातली. पुन्हा पापणी वर करून पहाण्याचा तिला धीर होईना. आपल्या खांद्यावरील तिचा मुखभार दूर करावा म्हणून अशोकनं तिच्या गालाला हात लावला. अन् त्याबरोबर त्याच्या गभीर देहांत कारुण्याची लहर सळसळली कपोलस्पर्श होतांच त्याच्या बोटांना त्या गालावरील पांचबोटीं वळ लागले. त्याला कसेच्या कसेंच झाले. पश्चा-तापाच्या दाटलेल्या स्वरांत त्याच्या कठातून नुसता ‘ नीली ! ’ असा शब्द निघाला. या एकाच शब्दान नीलीला केवढा धीर आला ! मान फिरवून तिनं पुन्हा नजर वर करून बघितलं तेव्हां अशोकच्या चेहेऱ्यावर रागाच्या दाट छटेतून अनुकंपा, सहानुभूति नी प्रेमळपणा डोकावतांना दिसली व म्हणून मोठ्या धीराने अशोकच्या गळ्याला मिठी मारीत ‘ मी नाही जाऊं देणार तुम्हाला--’ असे ती म्हणाली.

क्षणभरानें अशोकने तिला दूर केले. विचारमग्न स्थितींत तो खिडकीजवळ उभा राहिला व डोके खाजवीत अखेर खुर्चीवर बसला व ‘ नीली ! इतःपर तूं सुधा नी रजनी यांच्याबरोबर कुठहि जातां कामा नये. ’ नीली ‘ हो ’ म्हणणार तोंच सुधा नी रजनी दोघीही तेथे आल्या. त्यांना पाहून नीलीची तीव्र संकोचाने तारांबळ उडाली व ती संतापलीदेखील ! अशोक मात्र अधिक गंभीर झाला. आपल्या विव्हल एकांताचा भंग करून आपले दैन्य बाहेर काढण्यासाठी त्या आल्या असे नीलीला वाटले. रागाने फणफणत ती म्हणाली, ‘ तुम्ही यावेळी इथं, कोणाला विचारून आलांत–आधीं बाहेर जा पाहूं–’

नीलीचे बोलणे ऐकले न ऐकले करून सुधा म्हणाली, 'नवरा हे जनावर कसं असतं हे पहाण्यास आले.'

'अशोक! खरंच तुम्ही माणूस अहांत काय ? काय हे मारणं? तिचा गाल कसा सुजला तो पहा एकदा' रजनी म्हणाली,

'पत्नीला मारण्याचा अधिकार पतीला आहे. नीलीला हे पसत नसेल तर तिनं बेशक आपल्यासारख नवऱ्याला टाकून द्यावं--' अशोकचे हे शब्द रजनीच्या अगदी वर्मी झोंबले. रागाने तिचा नुसतां जळफळाट झाला. कपाळाला आठया घालीत ती म्हणाली,

"मी नवऱ्याला टाकलं असेल नाही नाहीतर मारलं असेल, तुम्हांला ही उठाठेव कशाला हवी ? अन्नछत्री पोसलेली जीभ आज ना उद्यां अशीच वळवळणार हे माहित होतं मला !--'

'अन्नछत्री पोसलेली जीभ-? आत्या! तू काय बोलतेस अन् कुणाला बोलतेस-?' नीलीचे ओठ अपमानानं थरथरू लागले.

'नीली! नवरा झाला तर तो तुला! आम्हांला त्यांच्याशी काय करायच? पण या घरांत बाजारबुणग्याची नसती लुडबुड नकोय हे सांगायला आम्हीं इथं आलो!'

'बाजारबुणगा-! कोण बाजारबुणगा?' नीलीने डोळे वटारून सुधाला विचारलं.

'कोण म्हणजे? अशोक! अशोक! माझ्या व्यवहारांत ढवळाढवळ करायला कुणी सांगितलं तुम्हाला-?"

तुफान सागराच्या लाटेवर नावाडी ज्या निर्विकार चेहेऱ्याने बघतो त्याच निर्विकार चेहेऱ्यानं अशोक या वाकदुकी वादळाकडे बघत होता. उपहासाने हंसत तो म्हणाला,

'कसली ढवळाढवळ केली ?'

'असं, विचारायला तुम्हाला कांहींसुद्धां वाटत नाहीं ? तुम्ही दिवाणजीला काय सांगितलंत? मला विचारल्याशिवाय कुणालाहि पैसे द्यावयाचे नाहींत अस दिवाणजींना सांगताना आपण कोण अहांत याचा विचार केलांत ?'

'सुधा ' अन्नछत्रीं पोसलेली जीभ व श्रीमंती पक्वान्नावर पोसलेली जीभ यांत काय फरक असतो हे मला आज नीट कळल ! जन्मभर गोड खाऊन क्षणभर गोड बोलनां येत नाहीं तुम्हाला ? विलासाच्या उच्छृंखल लहरींना येवढीशी मुरड पडली तर काय आकाशपाताळ एक करतां तुम्ही ! पैसे म्हणजे चौपाटीवरील शंख नी शिंपले आहेत वाटत ? तुम्ही कुणाच्या जिवावर पैसा उधळतां ? कुणाच्या जीवावर रेसेस खेळतां ? कुणाच्या पैशावर नटतां मुरडतां ? दिवाणजींना मी सांगितलं ते अगदीं विचार करून सांगितलं आहे. ध्येयशून्य विलासी 'भूके'च्या तृप्तीसाठी पैशाची पैदास झालेली नाहीं.

'पण तुम्ही कोण सांगणार ? घर माझ आहे, सत्ता माझी आहे हे विसरतां तुम्ही–'

'अन् वहिनी ! माझं घर नाही हं ? माझी सत्ता नाहीं इथं ? '

वन्सं ! भिकाऱ्याशीं स्वयंवर केलत त्याच दिवशी तुम्ही भिकारी झालांत-समजल ! ' असे म्हणत त्या दोघीजणी तोऱ्यांत निघून गेल्या. मात्र-नीली ओक्साबोक्सी रडूं लागली.

* * *

'अन्नछत्री पोसलेली जीभ ! बाजरबुणग्या ! लुडबुडा ! घर माझं, सत्ता माझी आहे–वहिनी तुम्हांला नाहीं नाही ती बोलली ! माझ्यामुळं बोलली ! क्षमा करा ! मी चुकले ! आपला अपमान झाला ! आपली शोभा झाली ! चला, तुम्हीं सांगाल तिथं मी येते. बाहेर जाऊन जीव देऊं, पण या घरांत क्षणभरहि थांबू नका—'

'कां ? जीवाचा इतका वैताग आला ? श्रीमंतांच्या जाचणीला त्रासून सर्वच गरीब जीव देऊं लागतील तर मग जगांत जगायचं तरी कुणी ? अन् फिरून हे घर सोडल्यावर तुझं कसं होणार ?—'

'हे घर, माझं नाहीं; हे मला नीट कळलं. आज–माझे डोळे उघडले–'

डोळे उघडले असतील तर मग तुला बाहेरच्या दरिद्री जगाकडे

पहातांना काय वाटेल? त्या दीन, दरिद्री जगांत तुझा निभाव कसा लागणार?"

"का? मला तुमच्या सावलीत राहतां येणार नाही?"

"नीली, तुला भ्रम आहे! मी आहे असा सडाफटिंग! घर न् दार पैसा ना अडका, मान ना पान मला कांहीं नाही. दिवसभर देह झिजवावा, व पोट भरावं एवढं मला माहीत आहे. उशाखाली धोंडा घ्यावा, प्रसंगी पोटाला कोंडा द्यावा, नी आला दिवस साजरा करावा येवढीच कला मला माहीत आहे. माझ्या घरी तुझं कसं होणार? माझ्या जीर्णशीर्ण झोपडींत, हा यारडले, पॉंड, बुरजाईस, फोर सेव्हन वन वन, कुटी,- हा चेरी ब्लॉसम, ही लिली व्हाईट, हा पफ, हा स्प्रे, ही हजारो रुपयांची सुगंधीं द्रव्यें तुला कोठून मिळणार? महालक्ष्मीवर हॉर्सेखातर रेसच्या पैशासाठी मीं जीव गहाण टाकूं का? अन् हे पहा तुझं कपाट? अरेरे हीं पातळे, हीं लुगडीं–हा भरजरी बाजार, ही शंभर ब्लाउजे, नीं पोलकीं-- सकाळचा पोषाक, दुपारचा पोषाक, रात्रीचा पोषाक,–हे पोषाखांचे श्रीमती पीक त्या झोपडीत कोठून पिकणार? तिथं सिनेमा नाही, नर्तकीचा नाच नाहीं, कीं असे छिचोर फोटो वर्तमानपत्रांत येण्याची आशा नाहीं!–"

"याक्षणीं तुम्हीं मला हिणवूं नका! हें सामान माझं नाहीं. आतांच्या आतां मीं हे फेकून देते, जाळून टाकतें. पण तुम्ही माझा उपहास करू नका. मी या क्षणापासून जन्मदरिद्री आहे असंच समजा--"

"नीली! कांचेच्या कुपीमधून अत्तर उडून गेलं तरी त्याचा वास बराच काळ दरवळत असतो भाग्याच्या तेजीमंदीच्या धुपाट्यांत श्रीमंती धुऊन गेली तरी श्रीमंतीचा चढेलपणा धुतला जात नाहीं. देवाघरून श्रीमंती येत नसली तरी देवाघरी जाई तो श्रीमंतीचा दिमाख दूर होत नाहीं. तूं तर बोलून चालून गर्भश्रीमंत आहेस! श्रीमंताचा वर्ग म्हणजे निसर्गाच्या मंगल वैभवावरील अमंगल कलंक आहे; मानव कोटीचे महान् लांछन आहे. या कलंकांत अनंत विश्वाच्या अनंत कळकट कळा समावल्या आहेत. जगातले सत्य, सौंदर्य, शुचिता, शील सर्व पवित्र नी मंगल गोष्टी श्रीमंताच्या विलासी नी विराटी भुकेनं फस्त

केल्या आहेत. श्रीमतांचे हे चिताड चित्र तुझ्या गर्भश्रीमंत डोळ्यांना कोठून दिसणार? श्रीमंतांना मुळीं डोळेच नसतात व म्हणून पैशाचा धूर ते सोडूं लागले म्हणजे त्या धुराने त्यांच्या आश्रितांच्या डोळ्यांतून मात्र पाणी येते."

"श्रीमंतांच्या विचारानं तुम्हाला वेड तर लागणार नाहीं ना? तुम्ही जिवाचा असा त्रागा कां करून घेतां?"

'हीच ती श्रीमंती! तुझ्या मुखावरील ही रसवंती श्रीमंतीचा पाठपुरावा करीत आहे. नीली! श्रीमतांनीं जगांत काय करावयाचं ठेवलं आहे? जगांतील सर्व पुण्याई या लोकांनीं पिऊन टाकल्यामुळे जगांत पापाखेरीज कांहीच उरल नाही. पैशाच्या लोभानं परमेश्वराला पातळांत कोणी गाडलं? पैशाच्या लोभानं गरीबांना कोणी नाडलं? साग जगांत श्रीमंतांनी कोणतं पाप करावयाचं शिल्लक ठेवल आहे? व्यभिचार, अनीती, खून, दरोडे, गळेकापूपणा श्रीमताइतका सराईत रीतीनं दुसरा कोण करू शकेल? पैशासाठीं, आपल्या राक्षसी विलासासाठीं अनेक श्रीमंतांनीं हजारो गरीबांच्या स्त्रियांना नागवलं आहे तर त्याच क्षणीं, आपल्या शेजेवरील देवीला शीलासह परक्याच्या शेजेवर साजरी केली आहे. नीली! मी भलतसलतं बोलत नाहीं श्रीमतांच्या, सरदाराच्या व संस्थानिकांच्या सावलीत मी आयुष्याचा बराच काळ काढला आहे. दिव्याखाली अधार कां असतो हे मला नीटपणे माहित आहे. आजहि माझे कांहीं श्रीमंत मित्र आहेत. व म्हणून म्हणतो, जगांत श्रीमंतांमध्ये चांगलीं माणसे मोजू लागलो तर मला पांच बोटांपलीकडे मोजावे लागणार नाहीं पतियाळा महाराजाचे चरित्र तुला माहीत नाही? अलवार नरेशांनीं पाजी दिवटी कशी पाजळली हे तुला ठाऊक नाहीं? तुकोजीराव होळकरांचा इष्काचा प्याला फसफसून कसा भरास आला याची तुला स्मृती नाहीं? उभ्या हिंदुस्थानांत साडेसहाशे सस्थानिकांपैकीं किती संस्थानिक माणुसकीच्या सदरांत मोडूं शकतील? संस्थानिकांची ही तऱ्हा तर त्यांच्या सरदारांची ती तऱ्हा! सरदारकीच्या बहुमोल वस्त्रांसाठीं, मोठ्या मानासाठीं, पोकळ पदवीसाठी लाखो रुपयांचे नजराणे चांदीच्या झांकल्या

ताटांतून वरिष्ठांना देऊनच हे लोक थांबतात का? नाहीं, नीली! फुसक्या वैभवाच्या चिरंतन प्राप्तिसाठीं हे लोक प्रसंगी आपल्या भांडारांतील स्त्री-रत्नंहि नजर करतात. कारण श्रीमंतांची ही अजब भूक आहे नव्हे, ही व्यभिचारी भूक सर्व श्रीमंतांचा नवलाखी अलंकार आहे वंशपरंपरागत चालत आलेली ही वतनदारी आहे. तुमच्या तोलामोलाचे जगांतील सारे श्रीमंत याच पंथाचे आहेत. श्रीमंत पुरुष असो वा श्रीमंत स्त्री असो, त्यांचे जीवनच मुळीं व्यभिचारी असतें. तुला पटतें का माझं म्हणणं? नसेल पटत तर तूं आपल्या घरांतच पहाना! पपाचं चरित्र लज्जासंकोचामुळं तूं मला सांगितलं नाहीस. त्यांच्या हजारो पापकर्मांनीच मला तें दाखवलं! सुधा नी रजनी–जाऊं दे कशाला मी माझी जीभ उगाच विटाळून घेऊं? श्रीमंतांची भूक म्हणजे खांडववनांतील भडकता दावानल आहे. यांत जगाच्या सर्वस्वाची राखरांगोळी झाली आहे—"

नीलीनें अशोकच्या तोंडावर हात ठेवला व अत्यंत काकुळतीनं म्हणाली, "तुमच्या या बोलण्यामुळं माझं मस्तक फिरूं लागलं. माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हाला, पाण्यांत राहून तुम्ही माशाशीं असं उघड वैर करूं नका! तुम्हाला इथं रहाण्याची किळस आली ना? मग चला पाहूं. आपण जगांत कुठंहि जाऊं; पण इथं क्षणभर थांबूं नका. निदान माझ्यासाठीं तरी चला—" अशोकनं आपल्या तोंडावरचा नीलीचा हात दूर केला व तो म्हणाला,

"नीली, क्षणापूर्वी तुझ्या डोळ्यांनीं माझी अडवणूक केली नसती तर मी कदाचित् गेलोहि असतो. पण आत्ताच झालेल्या प्रकारानंतर मी सुखासुखी हे घर सोडीन अशी का तुझी समजूत आहे? पैसा नी सत्ता यांचा सदुपयोग केला तर पैसा परमेश्वर नी सत्ता सर्वेश्वर होते. माझ्या आशेवर आपल्या गिरणीमधील आठ हजार मजूर विसंबून आहेत. शेतावरील हजारपांचशे शेतकरी मी त्यांच्यासाठीं काय करणार म्हणून डोळ्यांत आशेचं तेल घालून मजकडे बघत आहेत. या सर्वांची मी निराशा करूं? रजनी नी सुधा यांच्या हुल्लडी धमकीला

भिऊन जाण्याइतका मी लेचापेचा का आहे? हीच का तूं माझी पारख केलीस ?–"

"म्हणजे तुम्ही या जंजाळांतच रहाणार का ?" नीलीने अर्ध्या रडक्या सुरांत पृच्छा केली.

"होय, इथे, या घरांत राहून मी माझे कार्य करणार ! कुणी निंदो, कुणी वंदो मी मात्र माझा मार्ग इथूनच काढणार !"

'नका, तुम्ही राहूं नका इथं ! ही मंडळी तुमची शोभा करतील. तुमचा पदोपदीं अपमान करतील ! माझ्याच्यानं हे बघवणार नाहीं–"

'नीली, अंधाराला भिऊन दिव्यानं कधी माघार घेतली आहे काय ? मी या लोकांना कां म्हणून भ्यावे ? त्यांचं मी असं काय घोडं मारलं आहे ? त्याना वठणीवर आणण्यासाठी तरी मी येथे रहाणार ! तुझी इच्छा नाहीं इथं रहायची ?'

काय उत्तर द्यावे हेच नीलीला सुचेना ! 'हो' म्हणावं तर अशोकची दृष्टी, अशोकची सृष्टी आपणास पारखी होणार, नाही म्हणावं तर– सारा जन्म अपमानाच्या खाईत कंठावा लागणार. या विचाराने ती गोंधळून गेली व तिने अशोकच्या गळयाला घट्ट मिठी मारली.

'आज तुम्ही माझ्याशी असं तऱ्हेवाईकपणानं का वागता ? तुम्हाला सोडून मी कुठं जाऊं– ?'

'पण, नीली, माझ्या सान्निध्यांत रहाणंहि यापुढं सोपं नाही माझा संसार संकटमय आहे त्याच्याशी समरस होणारास संसाराची लज्जत कळेल–'

'माझं कुठं चुकतं ? मी काय करूं तुमच्यासाठी ? सांगा ना ! माझा नी तुमचा संसार निराळा का आहे ?"

'नीली ! संसार सांगून का येत असतो ? संसार कसा करावा, हे प्रत्यक्ष संसार केल्याखेरीज कळत नाही. तुझ्या आजच्या कल्पना, आजचे विचार माझ्या संसारास उपयोगी तर नाहींतच पण उपद्रवी मात्र आहेत. जाऊ दे ! तुला बुद्धी आहे ती सांगेल तसं तूं वाग ! पण एक गोष्ट लक्षांत

ठेव कीं जोपर्यंत आपले भाव एकरूप होत नाहींत, तोपर्यंत आपण कुणी कुणाचे नाही असंच समज ! ' असे सांगून अशोक निघून गेला.

नीलीच्या हृदयाला केवढा धक्का बसला ! अवघ्या दोन घटके केवढी क्रांती झाली ! तिच्या डोळ्यापुढे काजवे चमकूं लागले जग जितकं मोहक आहे तितकंच ते भेसूर आहे. संसार अमृतमय असल तरी त्या अमृताचा सांठा विषाच्या गाभाऱ्यात असतो. मातींत सोनं सापडते, पण त्यासाठी धरत्रीचं हृदय मैलच्या मैल फाडून फोडा लागतं ! शिंपल्यात मोती असले तरी त्यासाठीं अगाध सागराच्या तळाचा ठाव घ्यावा लागतो. मोहरीयेवढ्या सुखासाठी दुःखाचे मेरुमंदा पचवावे लागतात.

* * *

अशोकच्या संसारांत आपणाला समरस कसे होतां येईल, त्याची मर्जी कशी संपादन करितां येईल, याचा ती विचार करूं लागली. विचा करतां करता तिला काय वाटले कुणास ठाऊक, तिनं खोलीमधील स विलासी वस्तु भराभर फेकून दिल्या शेकडो रुपयांची सुगंधी द्रव्ये नकली सौंदर्याची सर्व साधने पाण्यात ओतली. ताड्दिशी कपाट उघडले नी सर्व जरीची भारी भारी लुगडी, पोलकी, सारा भरजरी मायाबाजा गडी माणसांना वांटून दिला. दोन घटकापूर्वी राजवैभवानं नटलेल्य खोलीस आता साधेपणाच्या सोज्वल सौंदर्याचा उजाळा मिळाला. भिंती वरील सर्व नटनटीचे फोटो फाडून फेकून दिले. फक्त रविवर्म्याचे लक्ष्मीचं चित्र मात्र तिनं तसेंच ठेवले.

'कां हे चित्र तरी कशाला ठेवलेस ? ' अशोकने पृच्छा केली.

'लक्ष्मी देवता आहे म्हणून— '

'वेड्या जगानं तिला देवता केली आहे. '

'अनंत दानानें ती देवी झाली ! '

'लक्ष्मी वेश्या आहे, छिनाल आहे. छचोर आहे ! पवित्र देव नाही. '

'मुळीच नाही. ती परम पवित्र आहे. जगाला जगवणारी ती आदिशक्ति आहे—'

'फक्त श्रीमंतांना चोरांना जगवणारी ती महामाया आहे!'

'श्रीमंतांचीच नव्हे, गरीबांचीही ती माता आहे!'

'पण ती पक्षपाती आहे.'

'आपल्या चार हातांनी ती गरीब श्रीमंतावर सारख्याच प्रेमाची मायापांखर घालते.'

'या चार हातांवर ती अनेक हातचलाख्या करते.

'परमात्मा श्रीकृष्णाची ती अर्धांगी आहे. श्रीकृष्ण सर्वस्वी गरीबांचाच आहे ना!

'होय! त्यालाहि हिने फसवलं आहे, चकवले आहे.'

'श्रीकृष्णाचे डोळे सर्वसाक्षी आहेत. ते फसू शकत नाहीत.'

'पण तेच सर्वसाक्षी डोळे लक्ष्मीनें दोन हातांनी घट्ट दाबून ठेवले आहेत.'

'पण कान उघडे आहेत ना श्रीकृष्णाचे?'

'तेही तिने दुसऱ्या दोन हातांनी झांकले आहेत.'

'परमेश्वराला गरिबांच्या किंकाळ्या कानावांचून ऐकूं येतात-'

'पण लक्ष्मीने गरीबांच्या मुखावर लत्ताप्रहर करून त्यांची तोंडे कायमचीच बंद केलीं आहेत.'

'खरंच! तुम्हाला आवडत नाहीं ना हे चित्र? हे पहा! मी फाडून टाकते.' नीलीने लक्ष्मीच्या चित्राच्या चिंधड्या केल्या व समाधानी वृत्तीने ती अशोककडे पाहूं लागली. पण अशोक तेथें होता कुठे? नीलीच्या परस्परविरोधी भावनाच तिच्या प्रश्नांची उत्तरें देत होत्या. अशोक नाही, असे दिसतांच ती खिन्न झाली. तिच्या पायाशी–चित्रांतील लक्ष्मी जगाची मालकीण, छिन्नविच्छिन्न होऊन कवडी किंमतीच्या मोलकरणीप्रमाणे लोळण घेत होती.

## सुगृहिणीचें सौंदर्य : : १२

बरेच दिवस झाले, नीली-अशोकचा प्रेमकलह, व्यावहारिक तत्त्वनिष्ठ रुसवा फुगवा किंवा अशोकच्या दृष्टिकोनांतून बोलावयाचे झाल्यास दोन हृदयांच्या समरसतेसाठीं सुरूं झालेलें सात्विक समरप्रकरण अद्यापि मिटलें नव्हतें ! लवकर मिटेल असाहि रागरंग दिसेना ! इथून तिथून सर्व मुक्याचा कारभार ' अनेकवेळां नीलीने अशोकशी बोलण्याचा प्रयत्न करावा पण अशोकने घेतलेले ' मुक्याच व्रत ' तो कांही केल्या सोडावयास तयार नव्हता. नीलीचें संपूर्ण परिवर्तन झाल्याखेरीज अशोक आपला ' मौन सत्याग्रह ' सोडीलसें वाटत नव्हतें !

सुगृहिणीची अशोकची व्याख्या फार सोपी होती. ' पत्नीने पतीच्या प्रत्येक बाबींत समानहक्कानें भागीदार व्हावें, सर्व सुखदुःखांत, सर्व व्यवहारांत सर्व चळवळीत पतीसह आघाडीवर चमकून संसार करावा ! यांतच स्त्रियांचे स्त्रीत्व, स्त्रियांचे सुगृहिणीत्व आहे. भाराभर पुस्तकें वाचून स्त्रिया गृहिणीपदाला योग्य होत नाहींत, नखशिखांत नट्टापट्टा करून स्त्रिया घराचें भूषण होत नाहींत, किंवा पुरुषांच्या तांड्यांत मिसळून चटोर शब्दांच्या खैरातीची पोपटपची केल्याने त्यांना पत्नीपद प्राप्त होत नाहीं. तर आचार नी विचार, कृती नी कल्पना, पुस्तकी ज्ञान नी व्यवहार यांचा परस्पर मेळ मिळवून ज्या स्त्रिया समभोगी, समयोगी नी समत्यागी होतात

त्याच खऱ्या सुगृहिणी ! तेव्हांच स्त्रियांना खरे सौंदर्य लाभते. एरवीं स्वच्छंदाने वागणाऱ्या स्त्रियांना नवरा म्हणजे मनाची व देहाची रंजणणूक करणारा हक्काचा बाहुला वाटतो. त्यागाबरोबर तळमळ निर्माण झाल्याखेरीज त्यागाची मातब्बरी नसते. नीलीन श्रीमंती टाकली पण पतीसौख्यांत समरस होण्याची तळमळ मात्र तिला लागली नव्हती. अन् तशी तळमळ तिला लागती तर अशोकला दररोजच्या दररोज हालअपेष्टा कां भोगाव्या लागत्या ?

उलट सत्याग्रहामुळें अशोकला नेहमींपेक्षां जास्तच त्रास होऊं लागला. सुशीला–बजाबाच्या प्रकरणापासून सुधा–रजनी यांनी अशोकची पदोपदीं जाचणूक सुरू केली. त्यांनी सरस्वतीबाईवर नाना कुभांडं रचलीं व तिला कामावरून काढून टाकले ! आपल्या कह्यांत राहील अशी आंतल्या गांठीची नवी स्वयंपाकीण त्या दोघींनी घरांत आणली. वस्तुत. सरस्वतीबाई व सुशीला अत्यंत सालस प्रवृत्तीच्या ! खुद्द अशोकलाहि त्याची खात्री होती.

श्रीमंतांना, श्रीमंतांच्या नसत्या संशयी कुभांडांना सरस्वतीबाई इतकी भ्यायची कीं, केव्हांहि वाड्याच्या बाहेर पडतांना पिस्तुल रोखल्याप्रमाणे दोन्ही हात वर करून ती दिंडीतून जात असे. आपण पदराखालीं कांही लपवून छपवून नेत आहोत असा ओझरता संशयहि कुणास येऊं नये म्हणून ती फार दक्षता घेत असे. पण तिचे दुर्दैवच पुरेपूर ओढवलं त्याला अशोक तरी काय करणार ?

दोनचार दिवस सुशीला फार आजारी पडली तिच खाणंपिण, औषधपाणी करतां करतां सरस्वतीबाईंना वाड्यांत यावयास सहाजिकच उशीर लागे. ही संधी साधून सुधा एक दिवस वसकन् त्यांच्या अंगावर आली व श्रीमंतांच्या नेहमींच्या चढेल नी उर्मट तोऱ्यांत म्हणाली,

" सरस्वतीबाई ! आम्ही तुम्हाला हरामाचा पगार देतो अशी का आपली कल्पना आहे ? रोजरोज असा उशीर करूं लागला तर ते मला खपणार नाहीं. जुळत नसेल तर तुम्ही आपला गाशा उचला इथून...'

' बाईसाहेब ! मुलगी आजारी आहे म्हणूनच उशीर होतोय ! '

' मुलीच्या आजाराकडे पाहून आम्ही उपाशी रहावं अस का तुमच

म्हणणे? फिरून मुलगी खरी आजारी आहे कीं खोटी हे तरी कुणी सांगावं ?...'

सरस्वतीबाई या बोलण्याने भारी रागावल्या. गरीबांच्या दु:खाची पुसतपास करण एकीकडेच राहून श्रीमंत त्यावर उर्मट शब्दांनी डागण्या मात्र देतात. सरस्वतीबाई फार तापट स्वभावाच्या! त्यांनी बेधडक सुधाचा हात धरून तिला 'पहा ती खरच आजारी आहे की नाही' असं म्हणत आपल्या खोलीत नेलं. सुशीला खरोखरीच आजारी होती. एका खाटेवर ती कण्हत पडली. तिचा चेहेरा पिंगट होऊन डोळयाखालीं काळसर वर्तुळे उमटली, अंगावर बराच गोरेपणा आलेला दिसला अन् त्याहीपेक्षां कुमारिकेचे कधीमधी उन्नत दिसणारे स्तन दुग्धभारानं थवथवल्यासारखे दिसत. तिची प्रकृती पहाण्याच्या निमित्तानं सुधा तेथे बराच वेळ बसली. कां बसली हे तिच तिलाच माहित. पण अधिक अवधी होऊनहि सुधा बाहेर पडत नाही हे पहातांच सरस्वतीबाई कावऱ्याबावऱ्या होऊं लागल्या. सुधा खोलीत अत्यंत बारकाईनं पाहूं लागली. इकडून तिकडे येरझारा घालण्यासहि तिनं सुरवात केली. वेडाची लहर यावी त्याप्रमाणं तिनं झरकन् खिळयाचं उचटणं घेऊन समोरच्या चुलींत उकरण्यास प्रारंभ केला. त्याठिकाणी बरेच मुगळे जमले होते. सरस्वतीबाई गांगरून मटकन् सुशीलेच्या खाटेवर बसल्या. सुशीलेने कपाळावर हात मारला, व डोक्यावरून पांघरूण घेतलं! चूल उकरतां उकरता सुधाला फडक्यानं गुडाळलेलं एक लहानसं बोचकं सांपडल ? ते भरकन् बाहेर उघड्यावर फेकून सरस्वतीबाईना कर्कश स्वरांत सुधा म्हणाली, "हे पाप तुम्हाला लपवता आल नाहीं, सरस्वतीबाई!" ती काय बोलणार! त्या फडक्यांत चार महिन्यांचा मेलेला गर्भ होता. सुशीलेला वाड्यामधलि मोलकरणीच्या साहाय्यानं औषध देऊन सरस्वतीबाईनं तिचा गर्भपात केला! व पोरीच अभागी, अंगलट आलेलं, श्रीमंताकडून जबरदस्तीनं नजर झालेलं पाप चुलीत पुरून ठेवलं होतं! ही वार्ता मोलकरणीनं सुधाच्या कानीं लागून कळवली होती व म्हणूनच ती इतक्या उत्सुकतेन, बिलकूल आढेवेढे न घेतां सुशीलेची प्रकृति पहावयास आली.

'सरस्वतीबाई! तुम्ही इतक्या निर्लज्ज असाल असं स्वप्नांतहि

वाटलं नव्हतं ! अन् सुशीला, चांगली कॉलेजांत शिकणारी पोर इतक्या बदचालीची असेल, असंहि भासत नव्हतं ! शरम वाटायला पाहिजे तुम्हांला ! '

' कोणाला शरम वाटायला पाहिजे ? तुम्हाला की आम्हाला ! दुनिया गरिबासाठीं नाही ! बलात्कार व बदचाल यांत-बाईसाहेब ! फार फरक आहे. तुमच्या छायासंगतीत मी नीतिभ्रष्ट झाले हा दोष माझा नाहीं. तुमच्या भावानं माझी अब्रू घ्यावी नी तुम्ही मला नीतीचं ज्ञान सांगावं-सांगा-शरम तुम्हाला कीं मला वाटायला हवी ? ' सुशीला तापानं फणफणत असता गळयाच्या शिरा ताणून बोलत होती. स्फुंदत स्फुंदत सरस्वतीबाई तिला खाटेवर दाबीत होत्या. सुधा रागारागानं तिला खाऊं कीं गिळू करी. आपल्या भावाचा, बजाबाचा संबंध जोडून ही चवचाल कार्टी आपली जगजाहीर बदनामी करणार असं सुधाला वाटलं.

' कॉलेजमध्ये कुठं तरी शेण खाल्लं असशील नी आतां बजाबाचं नांव पुढं करतेस—! खाल्या घरचे वासे मोजणारी तूं-तुला काय त्याची लाज वाटणार म्हणा -'

' थांबा ! मी अशोकनांच साक्षीला आणते--मग पटेल--मी बद-चालीची आहे कीं, बलात्काराला बळी, पडलेली निरापराधी आहे—'

सुशीला धावत धावत दाराजवळ आली. सुधानं तिचा पदर ओढून-तिला खाटेवर बसवले व म्हणाली,

' मला ही शहानिशा नकोय् ! मुकाट्यान तुम्ही मायलेकी या कंपा-ऊंडच्या बाहेर पडा पाहू–'

सुधाने त्या दोघींना रात्रौ घराबाहेर हुसकून लावले. वीस वर्षें पवित्र-पणे केलेल्या नोकरीचा असा शेवट झाला. सरस्वतीबाईंना काय वाटले ? एवीतेवीं आपण अन्नाला मुकलो, मग भीडभाड तरी कोणाची व कशाला धरावयाची ? अशा निर्धाराने वाड्याबाहेर जातांना-सरस्वतीबाई तळतळून सुधाला म्हणाल्या, " बाईसाहेब ! आम्ही गरीब म्हणून कवडीमोलाचे ठरलो. आम्ही गरीब म्हणून आमच्यावर तुमची सत्ता चालली, आम्ही गरीब म्हणून तुमच पाप आम्हाला पदरीं बाळगावं लागलं ! अन् तुम्ही श्रीमंत म्हणून आमच्या पतितजीवनाकडे पाहून नाक मुरडतां ? गेल्या वर्षी

आपलं 'पाप' मी माझ्या हातांनीं जुहूवर टाकून आले– लक्षांत आहे का? कशाला लक्षांत राहील? नाहीतर नीतीच्या नांवानं आपण असे नाकानं कांदे सोलले नसते श्रीमंतांची पापं हसतां हंसतां पचतात! पापं करून ते पवित्र रहातात! अन् आम्ही--आमच दैव फुटकं! त्याला कोण काय करणार?' सरस्वतीबाईची जीभ लांबत चाललेली पाहून सुधाने बलदेव-प्रसादकडून त्यांना गच्ची मारून अखेर घालवून दिलं! गरीब बिचाऱ्या मायलेकी! ढळढळ अश्रू गाळीत श्रीमतांच्या भरजरी आगीमधून बाहेर पडल्या! श्रीमंताची भूक शमली--पण त्यामुळं गरीबांची पोटं कायमची जळलीं! अशोकला त्यांची दया आली. पण तो काय करणार?

* * *

घरामध्ये अशी नवीनवी थेर नित्यानं होऊं लागलीं. अशोक वैतागून गेला. त्याला वेळीं जेवणसुद्धां मिळेना! गिरणींत रंगीत कापसाचे प्रयोग अत्यंत धुमधडाक्यानं चालू असल्याने त्यास अगदी पहाटे उठून गिरणींत जावे लागे. रात्रौ घरी येण्यास बारासुद्धां वाजत! मनुष्य एखाद दिवस उपाशी तापाशी कामाला जाईल! पण दररोज हा शीण कसा सहन होणार? सुधा रजनीच्या तोंडी लागण्यास त्यास अवसर नव्हता, व तसे करणे त्यास भूषणावहही नव्हते. नीलीकडून दोन घास मिळण्याची आशा फोल होती. तिला इकडची कार्डी तिकडे कशी करावी हे माहित नव्हतं-मग चहापाणी, स्वयपाकाची गोष्टच राहो! श्रीमंताच्या सर्वच स्त्रियांची अशी परावलबी स्थिती असते. स्वयपाकगृह म्हणजे काय व त्यांत काय करावयाचं याची यांना थोडीसुद्धां माहिती नसतें. तीच अवस्था फार शिकलेल्यांची! इतकं असून मासिक वर्तमानपत्रांत स्वयंपाकगृहातील गोष्टी लिहिण्यांत त्या पटाईत असतात! असे कां? मोठेपणाची, प्रसिद्धीची, कीर्तीची त्यांना भारी हांव–भयंकर भूक असते व त्यासाठीं त्या कागदोपत्री स्वयंपाक फार छान करतात. नीलीची तीच अवस्था होती.

अशोकला ह्या परावलंबीपणाचा जन्मजात कंटाळा असल्यानें त्याने बेधडक नवीन प्रयोग करण्यास प्रारभ केला. सकाळीं उठून तो स्वयंपाक-

गृहांत जाई, व चटकन् दोन ताज्या, गरम गरम भाकरी स्वतः तयार करी, खाई व कामावर जाई. एक दिवस नीली प्रातःकाली सहज स्वयंपाकगृहांत आली. अशोकला स्वयंपाक करतांना पाहून ती चमकली, चरकली, शरमली व अत्यंत विरमली ! तिला भडभडून आल. ती रडूं लागली ! लगबगीने तिनं अशोकचा हात धरला.

" माझ्या गळ्याची शपथ आहे तुम्हाला, फिरून या स्वयंपाकघरांत असं कांही कराल तर—" या काकुळतीनं अशोक नुसता हसला. दही-भाकरीवर ताव मारून तो निघून गेला. प्रकाशच्या शिकवणीत त्याला या गोष्टी लहानपणापासून उत्तम येत. म्हणून त्याला त्याबद्दल कांहीच वाटले नाहीं. पण नीलीला कांहीं सुचेनासे झाले ! 'आपल्या हातून आपल्या पतीला सुखानं दोन घांस मिळू नयेत-मग आपण जगलो तरी कशाला ?' या विचाराने ती होरपळून गेली. काय करावे, कुठं जाव, कोणाला आपलं दुःख सांगाव, याचा विचार करीतच ती 'मा' कडे आली. एकदम आईच्या गळ्याला मिठी मारून ती रडूं लागली. 'मा ! लहानपणीं तूं मला स्वयंपाक कां शिकवला नाहींस ?' हा अचानक प्रश्न ऐकून 'मा' साहेबांना घरांतील पतिपत्नीच्या कलहाचे सर्व धागेदोरे लागले. मुलीला लडिवाळपणे कुरवाळीत त्या म्हणाल्या,

'बाळ ! काय करावयाचा स्वयंपाक शिकून तुला ?'

'कां ? स्त्रियांना स्वयंपाक नको यायला ? मा ! स्त्रियांचं स्त्रीत्व स्वयंपाकगृहांत आहे. आज मला पटलं, आज उमगलं, आज समजलं ! पण त्याचा उपयोग काय ? मा ! शिक्षणाच्या श्रीमंतीच्या मोठेपणाच्या, अहंकाराच्या ताठरपणांत मी माझं स्त्रीत्व दडवून ठेवलं ! अन् म्हणूनच आज–आज– मा ! मला त्यांना दोन घांसहि करून घालतां येत नाहींत ! हाच का आमचा संसार ? हेच का आमचं प्रेम ? मा ! मा......... ' असं म्हणून ती स्फुदूं लागली. 'मा 'नीं तिचं सांत्वन केले. आपली कन्या सुकन्या व्हावी, सुगृहिणी व्हावी असं कोणत्या मातेला वाटणार नाहीं ? 'हात् तिच्या ! येवढच ना ! मी तुला शिकवतें चल !' असं म्हणून 'मा' ने तिला स्वयंपाकगृहांत नेले व पाकशास्त्राचा पहिला धडा दिला.

पाकशास्त्रामधील पहिला प्रयोग यशस्वी होतांच नीलीला केवढा आनंद झाला! त्या आनंदाची तुलना तरी कशी करावी? अशोकच्या पहिल्या प्रेमभेटीमधील प्रणयाच्या पहिल्या चुंबनाचा आनदहि या यशाच्या आनंदापुढे फिका वाटला तिला! का? तिला हरपलेल्या श्रेयाची प्राप्ती झाली, स्त्रियाच्या खऱ्याखुऱ्या जीवनाचा जिवंत झरा तिला सांपडला! गृहिणीच्या खऱ्या अलंकाराचा अलभ्य लाभ झाला म्हणून तिला किती उल्हास वाटला!

या परमानंदाच्या परमावधींत रात्र केव्हां संपेल, आपण अशोक-साठीं स्वयंपाक केव्हां करूं, अशोकला आपल्या हातांनीं केव्हां वाढूं, अशोक आपल्या पहिल्यावहिल्या पाकसिद्धीचं सेवन केव्हां करील, या गोड विचारानं तिला रात्रभर झोपच येईना! एकदांची ती उतावळी उद्या उगवली. बोहल्यावर जितक्या लगबगीनें तिनें पदार्पण केलं नसेल इतक्या तातडीनं ती फटफटूं लागताच स्वयपाकगृहांत आली. पाकसिद्धी करून ती अशोकची मार्गप्रतीक्षा करूं लागली. अशोक नित्याप्रमाणं आला. जिकडे तिकडे त्याला नवी नवलाई दिसली. सकृत्दर्शनीं त्याचा विश्वासच बसेना! पण नीलीचं कर्तृत्व तिच्या लोचनामधून उत्कटतेनें चकाकत होतं! नीलीकडे चोरट्या नजरेनं पहातांना अशोकला तिच्या सौंदर्याची खुमारी नेहमींपेक्षां फारच नाजुक दिसू लागली. हात पिठा-मिठानीं भरले आहेत, त्याचे थोडे थोडे अवशेष नवखेपणानं तिच्या निळया पातळावर उमटले आहेत, धूलिधूसर पुत्राला पाहून दुष्यंताला आनद झाला नसेल इतका अशोकला तिच्याकडे बघतांना झाला. त्यास समाधान वाटले!

पहिला प्रयत्न या दृष्टीनें स्वयंपाक बरा झाला. भाकरीचा आकार क्वचित् युरोपखंडासारखा, क्वचित् आफ्रिका खंडासारखा दिसे. तिची जाडी फूटपट्टीशिवाय कळणं कठीण होतं. पण इतकं असून त्यांत त्याला नीलीचे ओथबलेलं प्रेम, जिव्हाळा, तळमळ, आत्मीयता, अधीरता, दिसली! खऱ्या सुगृहिणीचे सद्गुणी सौंदर्य त्यांत पूर्णपणे प्रतीत झाले अन् म्हणून

ती जळकी भाकरी खातांना त्याला अमृतसेवनाचा आनंद मिळाला. जेवण संपतांना मोठा धीर करून ती अशोकला म्हणाली,

'स्वयंपाक आवडला कां ?'

अशोकनं तिच्या नजरेला नजर भिडवून नुसते संमतीदर्शक मंद हास्य केले.

'मी केला आज स्वयंपाक-'

'हं—'

'उद्या अधिक चांगला करीन-'

'हं-'

विशेषसे न बोलतां अशोक आपल्या कामावर निघून गेला. नुसते 'हं' अन् नुसते 'हास्य' अशोकनं केले! पण तेवढ्यानंच नीलीला अशोक आपणाशीं प्रहर न् प्रहर बोलल्याच समाधान झालं! तिचा उत्साह द्विगुणित झाला. नीली आईच्या सरस शिकवणीनं अल्पावधीत चांगली 'सुग्रण' झाली. त्यामुळे अशोकला नित्य नवे नवे पदार्थ मिळूं लागले.

दुपारीं नीली अशोकसाठी फराळाचं घेऊन मुद्दाम गिरणीत जात असे. विश्रांतीच्या खोलींत अशोक फराळ करी! त्यानं तृप्तीचा ढेकर देतांच आपण पतीला अधिक चांगले अन्न कसे घालूं या विचाराची 'भूक' नीलीच्या ठिकाणीं अधिक प्रज्वलित होई! पुरुषांचा निम्मा अधिक पराक्रम त्यांना पत्नीकडून मिळणाऱ्या प्रेमळ घांसामध्ये असतो, हे तत्त्व नीलीला कळलें. पाकशास्त्राची कला स्त्रियांच्या ठिकाणीं उपजतच असते. पण अलीकडे शिक्षणाच्या, श्रीमंतीच्या, बडेजावाच्या, फाजील अहंमन्यतेच्या तोऱ्यांत ही कला स्त्रिया कायमची गमावून बसल्या ! याची साक्ष, सुशिक्षित, श्रीमंत, पांढरपेशांच्या संसारांत हरघडी पहावयास मिळते. स्त्रियांच्या आळशीपणामुळे आम्हा हिंदुंचीं अनेक पक्वान्ने इतिहासजमा व्हावयाची वेळ आली आहे. समाजांत "Back to kitchen" ची चळवळ जोरांत करावी असच अनेक संसारांचं निरीक्षण केल्यावर नीलीला वाटूं लागलं! तिची ही तळमळ येवढ्यावरच थांबेना! समाजांत प्रत्यक्ष चळवळ करून आज नष्ट

होत असलेलं कौटुंबिक सौख्य सर्वांना द्यावं असा परोपकारी विचार सदानकदा तिच्या मनांत येऊं लागला.

वृत्तपत्रांमधून हिटलर-मुसोलिनीने स्त्रियांना स्वयपाकघरांत ' चूल नी मूल ' संभाळावयास लावल्याचे अनेक हृदयंगम लेख ती वाचीत होती. तशी चळवळ आपण खालच्या वर्गात, आपल्या गिरणीमधील मजूरवर्गात केली तर—?

परोपकारी ' भूक ' जगांत श्रेष्ठतम असते. नीलीच्या आत्म्याला बहुजन समाजाच्या ' उद्धारा 'ची प्रखर भूक लागली ! अन् म्हणून तिन तसा प्रत्यक्ष प्रयोगही आपल्या मजूरवर्गांत सुरूं केला !

लोक तिला हंसू लागले.

नीलीच्या या कर्मदरिद्री जीवनाकडे पाहून सुधा-रजनी तिचा उपहास करूं लागल्या !

पण अशोक मधून मधून संमतीच्या स्मितानं तिला प्रोत्साहन देत होता !

## समरसता व समाधी : : १३

आयुष्याचे कांहीं क्षण असे असतात कीं साऱ्या आयुष्यांत न घडणाऱ्या घटना क्षणार्धांत एकदम घडून येतात नी त्यामुळे जीवन-ग्रंथांत त्यांची स्मृती चिरजीव होते. निदान अशोकला तरी आज असे वाटल्यावांचून राहिले नसेल !

सायंकाळीं निसर्गरंगीत कापसाच्या पहिल्या प्रयोगाचा जाहीर समारंभ होता. त्याच्या सांगतेत अशोक गुंतला असतां, ऑफिसच्या शेजारच्या खोलींत कांहीं तरी वर्दळीची वादळे उठत असल्याचा त्याला भास झाला त्याने उठून कानोसा घेतला. ती बजाबाची ऑफिस रूम होती. गिरणीतील एक मजूर सांवळ्या बजाबापुढं उभा राहून करकर दांत ओठ खात व तोंडानं अपशब्दाची लाखोली उधळीत होता.

सांवळ्याच्या या अवसानाकडे बघून बजाबा भयभीत झालेला दिसला. पण आपली भीति उघडपणे प्रकट न करतां बेफिकीरपणाचं उसनं अवसान आणीत तो सांवळ्याला शब्दाशब्दानं चेपण्याचा प्रयत्न करी व सांवळ्या अधिकाधिक संक्रुद्ध होई ! अंगलट आलेलं प्रकरण झटकून टाकण्याच्या इराद्याने बजाबाने विजारीच्या खिशांतून दहा रुपयांची एक नोट काढली व ती सांवळ्याच्या अंगावर फेकित म्हणाला 'ही घे

अन् निघ पाहूं कसा!' सांवळयाने ती नोट घेऊन तिच्या चिध्या केल्या! चवताळून बजाबाचा नेकटाय् हासडला व त्यास खुर्चीवरून खालीं ओढलें! बजावाने दुसरी नोट पुढे केली! तिचाहि सांवळ्याने चुरळा केला. सांवळयास जोराचा धक्का देत बजाबा उठून उभा राहिला व रागारागाने म्हणाला, 'काय मूर्ख माणूस आहे! अवलाद भडभुंज्याची, पण मिजास मात्र बादशाहाची' येवढे शब्द बाहेर पडले असतील नसतील तो सांवळयाने बजाबाचे कानशील रगवून काढले. 'काय म्हणालास? अवलाद भडभुंज्याची नी मिजास बादशहाची! मी कोणाची अवलाद आहे हे सांगण्यास माझी आई तरी जिवंत आहे, पण तूं कोणाची अवलाद आहेस हे सांगायला तुला आईही नाही नी बापहि नाही! ... '

प्रकार भलत्याच थराला जातो असे पाहून अशोक आंत आला' सांवळयाचा हात धरून त्यास त्याने तसेच मागे खेचले व 'काय करतोस हे मूर्खासारखं?' अशोकने पृच्छा केली. "मूर्ख? अन् मी? साहेब! श्रीमंताच्या संगतीन तुम्हीदेखील श्रीमंतांची बाजू घेऊ लागलांत? गरिबांचा कांहीं विचार करा— "

'काय विचार करावयाचा! जा, तुला आजपासून कामावरून काढून टाकलं!' बजाबा जणूं काय आपण मालकच आहोत अशा थाटानं बोलू लागला.

"कोणाला धमक्या देतोस या? नोकरी, नोकरी, काय घेऊन बसलास! हाड मोडून काम करणाऱ्यांना लाखो नोकऱ्या मिळतात. तुला हवी नोकरी? ऐतोबासारखे फुकटाचे तुकडेच मोडावे तूं! अशा धमक्या मला देऊं नकोस— "

'सांवळया! गप्प राहतोस का नाहीं?' दरडावणीच्या स्वरांत अशोक बोलूं लागलेला पहातांच सांवळया म्हणाला,

साहेब! श्रीमंतांच्याच बायकांना अब्रू असते अन् गरिबांच्या नसते का? देवानं आम्हाला देखण्या बायका दिल्या त्या श्रीमंतांनीं त्यांच्या अब्रूवर दरोडा घालण्यासाठीं? हा पाजी गृहस्थ काल माझी रात्रपाळीची संधी साधून घरीं गेला नी बायकोच्या अंगावर हात टाकूं लागला! इतकं

होऊन तुम्ही मला गप्प करतां ? रात्रीच्या रात्री मला ही बातमी कळती तर सकाळीं याचं नख नसतं दाखवल तुम्हाला ! ”

बजाबाच्या कृणकृत्याची अशोकला पुरेपूर प्रचीती मिळाली होती. गंभीर चेहेरा करून तो बजाबाला म्हणाला,

‘ आपण घरी जा ! फिरून या गिरणींत पाऊल टाकूं नका; मेहेरबानी करून– ’

‘ हो, हो, माहित आहे. बायकोच्या कुंकवावर जगत आला नी मला शहाणपण शिकवतोय् ! पाहून घेईन - ’ बजाबाची स्वारी तेथून रागारागाने निघून गेली. सांवळ्याला शांत करून अशोकने त्याच्याकडून सर्व हकीकत ऐकून घेतली. त्याचे अभिनदन केले. बलात्काराचा प्रतिकार करून आपल्या स्त्रीत्वाचे स्वतः संरक्षण केल्याबद्दल त्याच्या पत्नीचे तर त्याने शतशः अभिनंदन केले. सांवळ्याची प्रेमाने पाठ थोपटून त्यास घरी जावयास सांगितले.

खोलीत येतांच अशोकचं मस्तक भ्रमण करूं लागले ! ‘ इथूनतिथून सारे श्रीमंत, श्रीमंताचे ऋणानुबंधी असेच का ? यांना थोडीदेखील नीतीची चाड नाहीं का ? हा बजाबा, ती सुधा, ती रजनी, अन् ते पपा ! ’ पपाचं स्मरण होतांच त्याच्या अंगावर शहारेच आले. गिरणीमधील किती तरी गरीब स्त्रियांचे संसार त्यानी विस्कळीत केले ! त्या पापाचं परिमार्जन करण्यासाठीं त्यांनी वेळोवेळी खर्चे केलेल्या पैशाच्या मोठमोठ्या रकमा त्याला दिसू लागल्या ! पैसा नी नीती हीं सलोख्याने कधीं तरी नांदणे शक्य आहे काय ?

* * *

विचाराने त्याला कांहीं सुचेनासे झाले ! कामाच्या ढिगाकडे नजर टाकीत त्याने दीर्घ नि श्वास सोडला व आलेलं टपाल चाळण्यास सुरवात केली. आज शुक्रवार असल्याने ‘ फॉरीन मेल ’चा भला मोठा गठ्ठा त्याच्या टेबलावर पडला होता. तो चाळतां चाळतां त्याने अमेरिकेत असलेल्या आपल्या जिवलग मित्राचे–नरहरी परांजपे याचे - पाकीट प्रथम फोडले ! पुन्हा त्याच्या हृदयावर दुसरा आघात झाला !

अमेरिकेत बाळासाहेब आल्यापासून त्यांच्या सर्व हालचाली, त्यांची तेथील वर्तमानपत्रांत झालेली जाहीर छीथू-यासंबंधींच्या हकीकतींचीं त्यानें अनेक कातरणें अशोकला पाठवलीं होती. तीं वाचतां वाचतांच त्याच्या हातामधून गळून पडली ! 'बाळासाहेब किती नीतीभ्रष्ट माणूस आहे ! आपण काय पाप केलं म्हणून त्याच्याशीं आपला असा ऋणानुबंध यावा–' घृणा, लज्जा, संकोच, शिसारी या अनेक विकारांनी एकदम उचल खाल्ली ! त्याने तीं कात्रणं न वाचतां एकत्र केली व कपाटांत खोलवर दडवून ठेवलीं ! जग काय आहे याचा तो विचार करीत किती तरी वेळ सचिंत बसला.

* * *

बाराचा सुमार झाला ! जेवणासाठीं अशोक उठणार तों गिरणीचा हिशेबनीस बरीच कागदपत्रे घेऊन आला. कारकुनाने तीं सर्व बिले अशोकच्या टेबलावर टाकलीं.

'ही कसलीं बिले ?' अशोकनं विचारणा केली. कारकून कांहिंच बोलेना. तो बराच गांगरून गेल्यासारखा दिसला. म्हणून अशोकने तीं चाळण्यास सुरवात केली. आश्चर्यानें कपाळास हात लावीत तो म्हणाला,

'हीं बिले इथं कशीं आलीं ? कुणीं आणली ?'

'बिले जुनींच आहेत पण—'

'त्याचे पैसे चुकते करावयाचेत कां ?'

'नाहीं, पैसे मागेच चुकते केले, पण—'

'पण कांय ?'

कारकून थरथर कांपत होता. 'यांत कांहीं तरी गळती झालेली आहे ! मी सर्व पैसे बजाबांना दिले. पण त्यांनीं बिलें चुकती केल्याचं दिसत नाहीं–'

'म्हणजे ? हीं बिलं आहेत तरी कोणाचीं !' मस्तक ताळयावर आणून अशोकनं ती यथासांग चाळलीं ! इजा, बिजा नी तिजा ! पुन्हा तिसरा आघात बसला. घरीं दिवाणजींना आपल्या परवानगीशिवाय कुणालाहि एक पै न देण्याचं अशोकनं बजावलं होतं. त्याबद्दल सुधा-

रजनींचे अशोकशीं चांगलेच भांडण झाले. पैसे मिळत नाहींत म्हणून त्यांनी गांवांतून गेल्या वर्षात लागेल तो माल, लागेल तीं सुखसाधनें उधारीवर आणलीं होती. बिले येतांच त्यांनी कावा करून परस्पर तीं गिरणीतील मॅनेजरकडे पाठवली बजाबानं व्हॉऊचर्स करून तीं वसूल केली!

मॅनेजर झाला तरी तो हुकमाचा बंदा सेवक! अशोक संतापला!

' पण माझ्या परवानगीशिवाय या बिलांचे पैसे तुम्ही दिले कां? '

' साहेब! आपल्या मंजूरीच्या सह्या होत्या म्हणून दिले! '

' म्हणजे? मी कधीं असल्या बिलांना मंजूरी दिली नाहीं कीं सह्या केल्या नाहींत. प्रथमच पहातोय मी हीं बिले—'

नाहीं साहेब! ह्या पहा आपल्या सह्या!—' असं म्हणून कारकुनानें सर्व पावत्यांवरून अशोकच्या सह्या दाखवल्या. सही आपली नाहीं असं म्हणण्याची अशोकची छाती होईना! सर्व कागद गोळा करून त्यानें ते जोरांत मेजावर आपटले.

' अन् एकूण किती रुपये तुम्ही दिलेत बजाबाला? '

' आतांपर्यंत वीस हजारांचीं बिले चुकती केली त्यांना! '

' वीस हजार! अन् यातील एकहि बिल चुकतं झालं नाहीं? '

' नाहीं; सर्व दुकानदारांची तातडीची पत्रं आलीं आहेत.

'तुम्ही येथून जा! तुम्हाला हाक मारतो थोडा वेळानं—' कारकून ' सुटलो ' म्हणून सुस्कारा सोडीत निघून गेला.

' काय हीं बिले! किती अघोर प्राणी बजाबा! काय करावे याचे? देऊं का खोट्या सह्या केल्याबद्दल याला पोलिसच्या ताब्यांत? ' त्याला विचार सुचला. भरकन् एक जाहीर नोटीस लिहिली! बेल वाजवली. टायपीस्टला बोलावले व त्या नोटीशीच्या बऱ्याच प्रती करावयास सांगून त्या साऱ्या वर्तमानपत्रांकडे पाठवावयास सांगितले.

पांच वाजले. समारंभाची वेळ झाली. समारंभासाठी उभारलेल्या खास मंडपांत गांवांतील बडे बडे लोक उपस्थित होऊं लागले. मनांतील सर्व दुःख, संताप, तसाच गिळून अशोक मंडपांत आल्यागेल्याचं स्वागत

करीत होता. पण त्याचा चेहरा त्याने कितीही प्रयत्न केले तरी उदासच दिसूं लागला.

मंडपाच्या मध्यवर्ती एक लांब मेज ठेवले होते. त्यावर कपाशीच्या कमलपद्धतीपासून तो नव्या निसर्गरंगीत वस्त्रापर्यंत सर्व प्रकार रांगेने मांडून ठेवले होते. निमंत्रित पाहुणे त्यावर नजर टाकून कोणी आश्चर्याने तर कोणी आनंदाने, कोणी आशाळभूतपणे उद्गार काढूं लागले. आपल्या यशाचा सितारबिंदु आज उगवत असतांनाही अशोकला हुरूप येईना. हळूं हळू मंडप भरून गेला. अखिल हिंदुस्थानमधील गिरणीमालक, व्यापारी, गिरण्याचे प्रमुख एजंट, इतर ऋणानुबंधी श्रीमंत लोक झकपक पोषाखांत मंडपात आपापल्या स्थानी विराजमान झाले.

निसर्गरंगीत कापसापासून अशोकनें हरतऱ्हेचा माल, हरतऱ्हेचीं नवी डिझाईन्स तयार केली होती. त्याचे भव्य प्रदर्शन त्याच्या विशाल बुद्धिमत्तेची साक्ष सर्वांना देत होते. केवळ कमलपद्धतिवर निसर्गावर आपण कसा विजय मिळवून हा शोध लावला, नवीन खतांचा पिकांना कसा उपयोग होतो, या शोधाचा राष्ट्राला कसा फायदा करून देणार याचे विवेचन अशोकने साकल्याने केले. या समारंभाची चिरस्मृती रहावी म्हणून प्रत्येकास कांहीं ना कांहीं तरी चीज 'भेट' म्हणून दिली. वृत्तपत्रांनी त्याच्या यासबंधांत अनेक मुलाखती घेतल्या! आलेली मंडळी 'हा कांही अजब शोध आहे' असें म्हणत निघून गेली. प्रकाश या समारंभासाठी मुद्दाम आला होता. जातांना तो अशोकला भेटला. अशोकचा चेहरा उतरलेला पाहून त्याला कसेच्या कसेच झाले. अशोकने त्याला आपल्या खोलींत नेले!

'प्रकाश माझ्या निसर्गरंगीत कापसाचं हे पहिलं पातळं! 'मा' असती तर ही यशाची कमाई म्हणून तिलाच हे अर्पण केलं असतं! पण मी तितका भाग्यशाली नाहीं! हें पातळ तुजजवळ ठेव! मातृचरणीं वाहिलेली ही भेट-जन्मदात्या आईला मिळाली नाहीं तरी धरितीमातेला तूं अर्पण कर–' अशोकचे डोळे डबडबून आले. कसला तरी निराळा विषय काढून त्याने प्रकाशशीं बऱ्याच गोष्टी केल्या. 'मा'च्या आठवणीनं अशोक उदास झाला अशा समजुतीनं प्रकाशनं त्याचं सांत्वन

करून मोठ्या प्रेमानं निरोप घेतला. अशोकच्या यशाबद्दल प्रकाशला किती धन्यता वाटली होती. अन् तशी कां वाटू नये ? प्रकाश-अशोकचा निराधार, निराश जीवनाचा खरोखरीच प्रकाश होता.

*　　　*　　　*

सर्व समारंभांत अशोकच्या मनाची अशी चलबिचल चालली तर नीलीच्या मनांत भलत्याच विकाराचं वादळ उठलं! "समारंभांत जमलेल्या सर्व स्त्रियांना भेटीदाखल पातळं दिली. प्रत्येकास कांहीं ना कांही दिले! अन् मला ? मला का त्यांनी देऊ नये ? अशोक इतका निष्ठूर झाला ? अशोकला आपण इतके नकोसे झालो ? त्याच्या हृदयमंदिरांतील आपले प्रेमाचं स्थान कायमचे नष्ट झाले ?' या नी नानातऱ्हेच्या विचारांनीं ती वेडी झाली! सयमाला व सहनशीलतेला सीमा असते. 'ज्या समारभांत आपण अर्ध्या यशाची वाटेकरीण म्हणून मिरवावयाचं तिथ आपणास साध्या निमन्त्रित मंडळीचा साधा मानहि मिळूं नये ना! सुधारजनीलाहि अशोकनं हास्यमुखाने आपल्या नव्या कृतीचीं निदर्शके बहाल करावींत, अन् मी कुणीच नाहीं का ?' तिच्याने विचार करवेना. हृदय पिळवटून येऊं लागले. मन मोहरून गेले. पोलक्याच्या खिशांतून रुमाल काढून तिने डोळ्याला लावला पण सहस्रधारांनी फुटणारा बंधारा कापसाच्या बोळयांनीं कां थांबतो ? तिला रडू आवरेना. भर समारंभामधून ती हळूच उठली! अशोकच्या विश्रांतीच्या खोलीत आली. मुक्तकंठाने तिने अश्रुविमोचन केले. समारंभ चालू होता तरी जिना उतरून ती घरीं जाऊं लागली.

*　　　*　　　*

समारभ संपला. विजयाच्या नी विषण्णतेच्या अर्ध्या उर्मीत अशोक ऑफिसांत आला. रात्रीचे नऊ वाजण्याचा सुमार झाला होता. सकाळच्या सर्व विचित्र घटना तात्पुरत्या विसरून जाण्याचा त्याने निर्धार केला आणि तो विसरलाहि! पण त्याबरोबर नीलीची कारुण्यमय मूर्ती त्याचे डोळयापुढे आली. समारंभांत मधून मधून तो नीलीकडे पहात होता. तिच्या चेहेऱ्यावर खिन्नपणे उमटणाऱ्या निराशेच्या सूक्ष्म छटा त्याला

लांबून दिसत होत्या. अर्ध्या समारंभामधून उठून वर गेल्याचेहि त्यानें पाहिले होते. पण सांप्रत खोलींत तीं कुठेच दिसेना. त्यामुळे अशोकला फार वाईट वाटले. नीलीला इतकं दुखवावयास नको होतं, असं त्याला वाटूं लागलं! आपल्या या चुकीचं परिमार्जन करण्यासाठीं तो झटकन् उठला. कपाटांतून खास नीलीसाठीं रेशमी दोरव्याचं निसर्ग-रंगीत पातळ घेतलं. घडी करून ती बॅगमध्ये ठेवली व एक प्रकारच्या नव्या उत्कठेनं तो घराकडे जावयास निघाला.

* * *

फाटकाजवळ जातांच गिरणीमधील एक मजूर त्याजकडे धांवत आला व म्हणाला,

'आग लागली!'

'कुठं?'

'आमच्या गल्लींत–सांवळ्याच्या घराला!'

अशोक चमकला. अन् नकळत त्याच्यापुढे बजाबाची मूर्ती उभी राहिली. विशेष चौकशी न करतां त्याने मोटार मजूरवस्तीकडे वळवली. क्षणार्धांत नीलीविषयी त्याच्या मनांत सहस्रावधी प्रेमविचार आले होते. पण या वार्तेने ते तितक्याच क्षणात अंतरधान पावले. कर्तव्य व प्रेम! प्रेम जीवनाचा आधार असला तरी ते विश्रांतीच्या काळांतील खेळणं आहे. जगासाठी तळमळणाऱ्या लोकपुढाऱ्यांना कर्तव्याचं जितकं प्रेम वाटतं, तितकं प्रेमाच्या, प्रणयाच्या कर्तव्याचं वाटत नाहीं.

सांवळ्याचं घर आगीच्या धगधगीत जळत होतं! आसपासचीं पांच सहा घरेहि आगीनं भस्मसात् केलीं होतीं. आगीची इंजिने झपाझप पाणी मारून आगीचं पारिपत्य करीत होतीं. अर्ध्यापाऊण तासांत आग शमली. कुणाचं काय नुकसान झालं याची अशोक चौकशी करूं लागला. त्याच्या हृदयांत धडकीच भरली आगींत गरीबांची खापरमडकीं जळलीं असतीं तर चार पैसे देऊन गरिबांचा संसार साजरा करून देतां आला असता–पण सांवळ्याची व शेजारचीं सात आठ लहान लहान मुलें या आगींत नखशिखांत भाजून निघाल्याचं ऐकतांच अशोकचं हृदय फाटून

गेलं. मुलांच्या शोधार्थ तो मजूरवस्तीमधील आपण व नीलीनं चालविलेल्या दवाखान्यांत आला. तेथे सर्व मुले जीवत आहेत, तीं लवकरच बरीं होतील असं त्यास कळतांच केवढा आनंद झाला! देवावर कधींहि विश्वास न ठेवणारा अशोक न कळत धन्यतेने अनेक तारांनी नटलेल्या आकाशाकडे पाहूं लागला. सभोवती जमलेल्या लोकांना उद्देशून तो म्हणाला,

‘ आग सात वाजतां लागली नी तुम्ही मला इतक्या उशीरा कळवावयास आलां ? ’

‘ नाहीं! आम्ही लगेच धावत गिरणीत आलो. आपला समारंभ चालला होता. नीलीसाहेब बाहेर उभ्या होत्या. त्यांच्या कानावर ही वार्ता घातली. त्यांनीं समारंभाचा विरस होईल यासाठी आपणास ही बातमी इतक्यांत देऊ नका म्हणून सांगितलं, नी त्याच आल्या आमच्याबरोबर. ’ जमलेल्या लोकांच्या तोडून ही हकिकत ऐकतांच अशोकचं मुख हर्षानं फुलून गेलं! ‘ कर्तव्य नी प्रेम! नीली! तुझं मोल मी कशानं करूं ’ त्याच्याने क्षणभरही राहावेना! तो परिचारिकागृहाकडे आला.

* * *

दारावर एक परिचारिका उभी होती.

‘ बाई आंत आहेत! ’ असं तिनं नम्रपणानं अशोकला सांगितले. अशोक दार उघडून आंत आला. त्याला किती विचित्र दृश्य दिसलं ? नीली किती विचित्र पोषाखांत तेथे बसली होती! वनवासांत नलाबरोबर अर्धवस्त्रानें फिरणाऱ्या दमयंतीसारखी ती त्याला दिसली. अन् खरोखरीच नीली अर्धवस्त्र कसं तरी लपेटून बसली होती. कर्तव्यपूर्तीचं पूर्ण समाधान तिच्या मुखावर झळकत होत.

अचानकपणे अशोक आंत आलेला पहातांच नीलीचा कंठ गहिवरून आला. व आनंदहि झाला. ती न कळत आपला पदर सावरूं लागली. पण आपण अर्धवस्त्रांतच आहोत हे कळून येतांच ती ओशाळली, लाजली, मनांतल्या मनांत भारीच थिजली. लज्जा नी विनय यामुळें तिचे राजीव लोचन धरणीवर खिळले व दोन्ही हात आपोआप वक्षःस्थला-

कडे वळले. लज्जांकित अधोमुखान ती उठून उभी रहाणार तोंच अशोकनं एका हाताने तिचे हात धरले व दुसरा हात तिच्या श्रमदग्ध कपोलावरून फिरवला. कानाजवळ मुख आणून, ‘ तूं अशी कां ? ’ म्हणून विचारले. नीलीने घळघळणाऱ्या अश्रूंनी उत्तर दिले. अशोकला त्याचा अर्थ कळला. मुलांच्या मोठमोठ्या जखमा बांधण्यासाठी बॅंडेजेस अपुरीं पडली असावीत ! प्रसंग जाणून नीलीन आपलं श्वेतवस्त्र फाडलं असावं. त्याचा हा तर्क अगदी तंतोतंत खरा होता.

‘ खरच का हे ? म्हणून का तू अशी अर्धवस्त्रात बसलीस ! ’ अशोकच्या अत्यंत मृदुल, प्रेमळ व उत्कंठित स्वरातून उमटणारा प्रश्न ऐकतांच नीलीने मान वर करून ती होकारार्थी हालवली मात्र ! अशोकनं दोन्ही हात पसरून नीलीला हृदयाशी घट्ट धरले. किती तरी वेळ तो तिच्याकडे अभिमानाने टकमक पहात राहिला. ‘ तुला असं पहातांना मला किती आनंद होतो म्हणून सांगू ! ’

‘ खरच का ? मी येवढी भाग्यशाली आहे का ? ’ अगदी अस्पष्ट शब्दांत तिने अशोकच्या वक्षःस्थलावर विश्रब्धपणे आपली मान टेकली. दोन्ही हातांनीं तिचे मस्तक वर उचलीत अशोक म्हणाला,

‘ भाग्यशाली कोण ? तूं का मी ? ’

सहाजिकच नीली ‘ मी ’ म्हणण्यासाठी ओठ उघडणार हे जाणून उत्तरापूर्वीच ‘ तूं नव्हेस–मी ’ असं म्हणत, अशोकने तिच्या ओठाच्या अर्ध्यामिटल्या पाकळ्या आपल्या अधरांनीं घट्ट मिटून टाकल्या. स्वर्गीय सुखसमाधानांत जीव बुडाल्याने आपण कुठं आहोत याचं नीलीला भान राहिलं नाहीं.

* * *

बॅग उघडून रेशमी पातळ त्याने नीलीला नेसण्यास दिलें. नीलीचा हात कांहीं केल्या पुढे येईना ! तिला समारंभांतील अनेक दृश्ये दिसूं लागली. तिचा गोरामोरा चेहरा पहातांच अशोकला तिच्या हृदयाचं दुःख कळलं. तो तिला जवळ घेत म्हणाला,

' वेडी कुठली ! आपला अबोला आज मी या भेटीनं सोडणार होतों, म्हणून तुला समारंभांत पातळ दिलं नाहीं. '

' खरंच का हे ? ' तिने अशोकच्या गळ्याला मिठी मारली. फिरून ' खरंच का हे ? ' असा किती तरी वेळां प्रश्न विचारी व अशोक तिला पातळ नेसण्याचा आग्रह करी.

' एका अटीवर ' नीली नेत्राची उघडझांप करीत म्हणाली.

' कसली अट ? '

' माझ्याशी कधीं कधी अबोला धरता कामा नये. '

' कबूल —पण तू पातळ नेस तर खरी ! ' क्षणार्धांत नवी नवलाई परिधान करून ती अत्यानंदाने अशोकपुढं उभी राहिली ! तिच्याकडे हास्यमुखाने पहात अशोक म्हणाला,

' किती सुदर दिसतेस ? खरच सागू–रागावणार नाहीस ना--मला वाटतं असाच एक फोटो काढून वर्तमानपत्रांत छापावा—'

फोटोचे नांव निघतांच निली विरमली. महालक्ष्मीवरील ज्या फोटोने तिला इतक्या दिवस विरहांत झुरविले त्या फोटोचे नांव काढतांच तिचे डोळे डबडबले. अशोकच्या या कुत्सित चेष्टेन व गतस्मृतीच्या कल्लोळानं तिला रडू आले. ' हात् वेडी कुठली ? रडायला काय झालं ? ' असे म्हणत त्याने तिच्या सात्वनार्थ तिचे पटापट मुके घेण्यास सुरवात केली. एक, दोन, तीन–नीलीच्याने ते मोजवेनात, तिने स्वमुख सावरीत डावा हात अशोकच्या तोंडावर ठेवला व अगदी निर्भयपणे हंसत म्हणाली, ' हे काय ? याचे ' रेकार्ड ' करून वर्तमानपत्रांत का छापावयाचं आहे तुम्हाला ?' या नर्मविनोदाने अशोक खूप मोठ्यानं हंसला व तिची पाठ थोपटली. हातांत हात घालून ती हर्ष, समाधान- कर्तव्यपूर्ती, प्रेम, उल्हास, मीलनचा मधुर आनंद उधळींत घरीं आली.

* * *

मध्यरात्र उलटून गेली तरी, ती दोघे सुखदु खांच्या गोष्टी करीत होतीं पहाटे नीलीचा डोळा लागला नाहीं तो ती दचकून उठली.

' काय झाल दचकायला ? ' अशोकनं तिला जवळ घेत प्रश्न केला.

' मुलं रडतात वाटतं ?'

' अग, तूं दवाखान्यांत नाहींस घरीं आहेस. '

' नाहीं मला वाटलं, मुलं रडतात. भास झाला ! '

' स्वप्नांत तुला मुलांचं रडूं ऐकूं आलं, वा ! तुला ' मुलाचे डोहाळे ' तर होत नाहीत ? '

" इश्श ! "

नीलीने अशोकच्या कुशीत अर्ध्या झोपेत, अर्ध्या हास्यांत, अर्ध्या आनंदांत आपली नाजूक मान हळूंच ठेवली. समरसतेच्या समाधानाने तिचा अंतरात्मा हलुवारपणें खालवर होत होता. प्रणयसंभोगानंतर स्त्रियांच्या देहांतून दरवळणारा सुगंध त्या दोन हृदयांत बहरत होता. नीलीच्या उष्ण उच्छ्वासाने अशोकचा कंठमणि क्षणांत स्फुरण पावे व क्षणांत निद्रेच्या अनिवार धुंदीनें निश्चल होई. उलट अशोकच्या तरमरळत्या श्वासाने नीलीच्या विस्कटलेल्या केशकलांपातील गोफ मधून मधून तिच्या गालावर उडत व त्यामुळे तिचा निद्राभंग होई. अन् ती आपले गाल हळूंच अशोकच्या दंडावर चोळी. हातांच्या कोमल बोटांनीं अशोकचीं बोटे दाबी. अशोकच्या सर्वांगावर गोड झिणझिण्या उठत ! प्रणयी जीवन आणि मृत्यु यांत फक्त श्वासाचा फरक असतो. मुळीच नाहीं ! प्रणयाला फक्त जीवन आहे – मृत्यु नाहीं

## रजनीचा तारुण्योन्माद : : १४

गेलीं सहासात वर्षें ‘ परित्यक्ता ’ म्हणून रजनी माहेरी जीवन कंठीत होती. रजनीचं सारंच जीवन वैचित्र्याने नटले होते. क्षणांत विलास, क्षणांत खिन्नता, क्षणांत हंसावे, क्षणांत मनांतल्या मनांत मिळमिळ रडावे ! लहर लागली कीं, अप्सरेसारखा शृंगार करावा व लहर फिरतांच साधें वस्त्र नेसून वैतागवनांतील वनवासी बनावे ! शृंगारविलासाच्या ऐनरंगांत चार्वाक वृत्तींची दिवाळी करावी तर लगेच भगवे वस्त्र नेसून ‘ जगन् मिथ्या, जीवन मिथ्या ’ जपत जोगीण बनावे ! तिची ही विचित्र प्रवृत्ती होती. पुष्कळांना या विविधविरोधी जीवनाचा उलगडा होत नसे. एक प्रकारचे तिचं हे वेडच होतं ! वैद्यशास्त्रांत तरुण स्त्रियांच्या या वेडाला ‘तारुण्योन्माद’ अशी संज्ञा आहे.

मूलतः स्त्रिया भावनाप्रधान असतात. निराशेनें आशेची चकाकी क्षीण होते, अन् त्याचा परिणाम त्यांच्या विचारशक्तीवर घडून त्या अति चंचल, अति विकारवश होतात.

रजनीचा खराखुरा विकार हाच ! त्यामुळे अमूक गोष्ट करावयाची याची तिच्या ठिकाणीं कारणपरंपरा सांपडत नसे. या अकारणभावामुळे अलिकडे तिचं मन अशोककडे सारखं धांव घेई !

निसर्गरंगीत कापसाच्या समारंभांत अशोकनं हास्यमुखानें तिला

पातळ बहाल केले, त्यावेळी अशोकची नखाग्रे तिच्या कोमल करांस लागतांच तिच्या विकारी मनांत स्त्री-पुरुषांच्या नैसर्गिक आकर्षणाचा प्रभाव पडला. त्यामुळे ती न कळत अशोकशी करीत असलेला विरोध विसरून गेली. किंबहुना या वेड्याच्या लहरी आल्या म्हणजे तिची अवस्था अत्यंत दारुण होई! तिला मग कांहीं सुचूं नये की कांहीं रुचूं नये! रिकाम्या स्थलीदेखील तिला अशोक दिसावा! त्याकडे पाहून ती एकांतांत रडे, हसे अन् अखेर निराशेने खिन्न होऊन पडे. वासना, विकार देहांत जसजशा सळसळत तसतशी ती बेभान होई!

आजच्या वेडाची लहर फार विचित्र होती. उत्तम साजशृंगार करून आपल्या खोलीत ती बसली! विरही वनितेची आतुरता तिच्या गोल मुखमंडलावर पसरली होती. प्रहरामागे प्रहर गेले. मध्यरात्र होण्याचा समय आला-'अशोक आला नाही' असा सुस्कारा सोडीत ती तळमळत बिछान्यावर पडली. वेणी विस्कटून टाकली, शृंगार उधळून लावला; पण अशाने देहांत भडकलेली आग थांबत का असते? उलट तिचा जीव अधिक तगमगूं लागला! वासना अतृप्तीनं थयथयूं लागल्या! तिने झगझगीत दिवा मालवला. पुन्हां स्विच दाबलें व हिरवा प्रकाशी दिवा उजळला! सर्व शय्यामंदिरांत गहिरी शोभा निर्माण झाली. अंधुक हिरवा, अंधुक पांढरा प्रकाश सर्वत्र पसरला.

हिरव्या रगांत तशीच अजब जादू आहे. हिरवा रंग विलासी-विकारांचा चैतन्यरंग आहे. अन् म्हणूनच जीवनांत हिरव्या रंगाला अनादिकालापासून फार महत्त्व आहे हिरव्या रंगाची साडी, हिरवा साजशृंगार, हिरव्या वस्तूंच्या सर्व कल्पना विलासाचे द्योतक असते.

या हिरव्या रंगदारीत तिचे मन अगदीं बैचेन झाले. वासनेचा एक क्षण असा असतो कीं, त्यावेळी सर्व विचारशक्ति कुंठित होते. केवळ आसक्तीच्या तृप्तीसाठीं विचारशून्य मन विकारामागे निर्बुद्धपणे धांवत जाते. व या प्रसगीं दृष्टीला जे दिसेल त्यावरच वासना खिळून जाते. अति विचाराने ती विवेकशून्य बनली. अतिवासनेनें ती धुंद झाली. त्या धुंदींत ती गच्चीवर आली. बाहेर गहिरी चांदणे फुलले होते. त्याकडे

पाहून ती खिन्न झाली गच्चीच्या वळचणीखालीं नेहमीप्रमाणे तिचा गडी गाढ झोप घेत होता. त्याकडे पाहून तिला काय वाटले कुणास ठाऊक! तिथे लत्ताप्रहार करून त्यास जागे केले. दरडावणीच्या सुरांत त्यास खुणवले. पण क्षणांत ती भांबावली.

'गडी, साधा गडी! मी–माझे कुल, माझे वैभव–आपण हे काय करतो?"

प्रबुद्ध विचार आला नी गेला. देह तगमगत होता. निराशेनं डोळे डबडबत होते. अनिवार इच्छेला भय नी लज्जा नसते.

* * *

मखमलीच्या उशीवर गाल ठेवून ती किती तरी वेळ खिन्नपणे पडली. इतक्यांत—

'रजनी!' अगदीं हलक्या सुरांत हाक मारीत बजाबा तिच्या चेहेऱ्यावरून आपली दृष्टी फिरवीत होता. रजनीने डोळयांच्या पापण्या वर करून बघितले. बजाबाने तिच्या कानाशी ओठ नेले. त्याबरोबर ती केवढ्या उत्साहानं उठून उभी राहिली!

'खरच! मी जाऊं? अशोक भेटेल! अशोकने मला बोलावलं...' अंधारातून ती झपझप पावले टाकीत बाहेर गेली. बजाबा 'ठीक' म्हणत स्वत:शीच हंसला.

* * *

यावेळीं अशोक बागेतील चांदण्यांत फिरत होता. कारंजाचे तुषार दिलरंगी चांदण्यांत स्वैरपणे उडत नी लगेच खालीं जलाशयांत पडत! पण त्या पतनांतही त्यास मौज वाटे. नीली 'मा'ला औषध देण्यासाठीं बंगल्याच्या मागच्या खोलीत गेली. बराच वेळ झाला ती येईना म्हणून अशोक निजण्यास वर आला. शय्यामंदिरांत येतांच त्याने दिवा न लावता हँगरवर नाईट गौन टांगला. नेहमींची खोली, नेहमींचा बिछाना–त्याला दिवा लावण्याची कधींच जरूर भासत नसे. दाराला कडी लावून तो झोपण्यास बिछान्याजवळ आला. नीली तेथें झोपली होती.

'वा! मी बागेतच तुझी वाट पहात बसलो नी तूं खुशाल येथे येऊन झोपलीस–'

नीली कांहींच बोलेना !

'झोपेचं चांगलं सोंग घेतलंस–'

तरीही अवाक्षर नाहीं.

'रागावलीस ?'

जास्त प्रश्न न विचारतां त्याने तिच्या गालावर हात ठेवला. आनंद, हर्ष, आसक्तीचा उच्छ्वास उसळून तिने अशोकला मिठी मारली. त्याबरोबर अशोक दचकला. तो स्पर्श, ती करमाला नीलीची नव्हती ! आपल्या बिछान्यावर कोण आले, आपण कोणाच्या कपोलास स्पर्श केला कुणाशीं इतका वेळ बोललो, या विचाराने त्याची मनस्वी तारांबळ उडाली. आश्चर्याने तो जागच्या जागीं खिळला. विस्मयाने कंपायमान होणाऱ्या ओठावरून 'कोण ?' हा साधा प्रश्न त्याला स्पष्ट करतां आला नाही. त्याने झट्दिशीं दिवा लावला तो—

–ती रजनी होती. मूर्तिमत वासनेची छाया होती. एकच स्पर्श पण तेवढ्याने तिच्या वासनेच्या कळया उमलून देहलता सर्वस्वी पुष्पांकित झाली.

अश्रू नी हास्य, विरह नी विलास, तळमळ नी तृप्ती यांच्या छटा तिच्या गौर कायेवर बहरूं लागल्या. तशांत तिने आपली कुंचकी परिधान केली नव्हती. गौरग्रीवा निरकस झाल्याने वेणीचा विस्कटलेला शेपटा उजव्या स्कंधावरून पुरोभागीं झुलत होता. प्रत्येक अंगविक्षेपाच्या ढंगदार कलाटणीने तो घसरत घसरत स्तनमंडलावरून पर्यंकापर्यंत आला. त्यामुळे ती अत्यंत मोहक दिसे. पण या सौंदर्याचे अशोकला भय वाटले, घृणा आली.

'किती भ्याला तुम्ही ? बोलावणं पाठवून भ्यालां–कां– ?'

रजनीच्या या बोलण्याचा अशोकला अर्थच कळेना ! अशोकचे ते विशाल ललाट, ती सरळ नासिक, ते टपोरे भयभीत डोळे पाहून तिचा मोह इतका अनिवार झाला कीं प्रणयाच्या नाचऱ्या आशेने पदन्यास करीत, नेत्रांची प्रत्यंचा उडवीत ती अशोकजवळ आली. तों—

शय्यामंदिरांतील बाथरूममधून नीली बाहेर पडली. अशोक-समोर रजनीला अशा विचित्र वेषांत पहातांच ती दचकली अशोक आल्याची चाहूल तिला बाथरूममध्ये लागली. अशोकने दिवा लावल्याचे तिला कळले पण दहापांच क्षणाच्या अवकाशांत ही विचित्र घटना कशी घडून आली हे कोडं मात्र तिला उलगडेना. स्त्रीस्वभावानुरूप तिचं मन संशयानं ग्रस्त झाले व मत्सरी भावानं 'हे काय ?' म्हणून तिनं पृच्छा केली.

नीलीला पहातांच रजनीचा विरस झाला.

ही इथ असतांना मला कशाला निरोप धाडला ?' अगदीं काकुळ-तीच्या स्वरांत तिनं अशोककडे टक लावून विचारले.

'कोणी बोलावले तुला ?'

'हे काय बरं ! बजाबाला तुम्हीं सांगितलं...'

संतापानं दार उघडीत अशोकने तिला जावयास सांगितले. भग्न हृदयानं ती मंद मद पदं टाकीत निघून गेली. क्षणभरानं दुरून बजाबाचे सूडबुद्धीचे हास्य अशोकला नी नीलीला ऐकूं आले.

'एकूण बजाबाचं हे कारस्थान होत' असं म्हणत नीलीनं अशोकचा हात घट्ट धरून ठेवला. जणूं अजूनहि आपल्या सौख्याचा ठेवा कुणी हिरा-वून नेईल असे तिला वाटत होते. कितीतरी वेळ ती दोघे विस्मयानं एक-मेकांकडे पहात राहिली. जो जो अशोकच्या रूपसौंदर्याकडे नीलीनं रोखून पहावे, तो तो तिला अधिक भीति वाटावी. आपलं रत्न हिरावण्यासाठी सारी स्त्रीजात टपून बसली अशी तिला वारंवार शंका येई व त्याक्षणीं ती अशोकला अधिक घट्ट धरून ठेवी.

रात्रींतून दहा वेळां उठून अशोक आपल्याच शेजारी आहे याची खात्री करून घेतली. तरीहि तिला झोप येईना !

'ममत्वा'ची 'भूक' अशीच संशयी नी मत्सरी असते.

रजनी व सुधा यांचे तारुण्याने ओतूं जाणारे जीवन जवळ जवळ सारखेच ! तथापि दोघींच्या विकाराचा ओघ मात्र थोडासा भिन्न असे. रजनीच्या तारुण्याची ' भूक ' इतकी प्रदीप्त व्हावी की, तिच्या वासनेत अविनयाची कलकशोभा सर्वांना दिसावी. पण सुधा मात्र विनयाच्या थाटांत वासनेला सौजन्याची निर्मळ तीट लावी रजनीच्या अतृप्त आशा भंगलेल्या वारुळांतील वाळवीप्रमाणे सैरावैरा धावत नी लोकनिंदेची व लज्जेची तिरीप लागतांच वितळून जात !

सुधा तशी विवेकी होती. तिच्या वासना अहंकारामुळे व श्रीमंतीच्या बडेजावीमुळे लोकनिंदेच्या सीमेपर्यंत पोहचत नसत. सुधाची आसक्ती गांभीर्यातून उसळे तर रजनीच्या आसक्तीमधून गांभीर्य निर्माण होई. लोकलज्जेस्तव सुधाच्या ठिकाणी विनयशील लज्जा दिसे तर रजनी लाजेसाठीं विनय आपल्या ठिकाणीं ओढून ताढून आणीत असे. एकीच्या पापाला आपोआप प्रसिद्धी मिळे, तर दुसरीला प्रसिद्धी पापासारखी वाटे. पण प्रणयाचे अनेक प्रश्न असले तरी उत्तर एकच असतें.

सुधाच्या विलक्षण चाणाक्षतेमुळे तिचे सारेच मार्ग खानदानी पद्धतीचे वाटत. त्यामुळे पापाचरण करतांनाहि ती आपल्या अभिजात श्रीमंतीला विसरली नाहीं. क्लब, संस्थानिक सरदारांची विश्रामस्थानें, आपल्या तोला-

मोलाच्या धनिकांची विलासस्थाने म्हणजे सुधाच्या वासनाविहाराचीं कुंज-वने! तेथेच ती मनसोक्त रमे, पण रमतांना लोकनिंदेचा नंदादीप आपल्या मागें आहे याची तिला कधींच विस्मृती होऊ नये. कारण अंधारांतील पापं याच नंदादीपाच्या प्रकाशांत प्रसिद्धीला येतात याची तिला पूर्ण जाणीव होती. तेव्हां सर्व कांहीं करून सवरून ती अखेरपर्यंत 'प्रतिष्ठित पतिव्रता' म्हणून मिरवूं शके!

डॉ. बिलेरे, सरदार जदुनाथ, सरदार मोहनराव प्रभृती मंडळीच्या मंडळांत ती खेळीमेळीने वागे, हंसे, चेष्टाविलास करी, पण प्रत्येक वेळीं निष्कलंकतेचे घेतलंलं मोहक सोंग ती व्यवस्थित राखी! श्रीमतांचा हा विशिष्ट वर्ग आहे. पावित्र्य हे या वर्गाचे ब्रीद असते. पण सारा संसार बर्फाच्छादित ज्वालामुखीसारखा असतो. ज्वालामुखीचीं भव्य शिखरे बर्फामुळे किती सोज्वल, किती सुंदर दिसतात! पण त्याच्या अंतरंगाची प्रेक्षकांना कल्पना नसते. श्रीमतांचे जीवन असेच असते. बाह्यांतरी खुलणारे कृत्रिम सौंदर्य, झळाळणारे वैभव नेत्रांना दिपवीत असले, तरी त्याखाली वासना, विकार, आतुरता, आसक्ति सदैव सळसळत असते. हृदयांतून वरवर उसळणारे हे भाव पैशाच्या दडपणाने दाबले जातात. ही एक अजब कला आहे. श्रीमंतांखेरीज इतरांस ती सहसा साधत नाहीं. या कलेची परिणती सुधाच्या ठिकाणीं पूर्णत्वाने झाली होती.

* * *

सुधा पलंगावर पडून 'कामसूत्रा'चा इंग्रजी ग्रंथ वाचीत होती. ग्रंथांतील सूत्र वाचतां वाचतां तिच्या मनाची कोण चलबिचल होई! उत्तान वर्णनानें तिला हवा असलेला उन्माद येताच त्याची प्रतीके दुलईवर ठेवलेल्या पायांच्या तरल गतीमधून प्रकट होत. मधून मधून सलीलया मखमालीची मऊ उशी उरोभागीं कुरवाळावी, व क्षणभर अतृप्त आसक्तीचे आवंढे घ्यावेत; विशेष हर्षोत्फुल्ल भाग वाचतांना तिच्या अधरावर लाळेचा ओलासा तवंग उठे व त्यांतून विलासी वांछना झळके! अशा अवस्थेत निमिषमात्र ती आपले डोळे झांकून घेई.

अति आनंद, अति प्रणयप्रभाव हृदयांत फुलले, म्हणजे स्त्री वा पुरुष डोळे कां झांकून येतात?

जीवनाचा शेवट करतांना मृत्यू नेहमीं नेत्रावाटे प्रवेश करून जीवन-ज्योत मालवतो. अन् म्हणून आनंदाच्या, प्रणयाच्या, विलासाच्या समाधि-कालांत तरी मृत्यूची झडप पडूं नये या आत्यंतिक खबरदारीनें या प्रसगीं स्त्री-पुरुष डोळे झांकून घेतात

सुधाला हा कामुक आनंद ग्रंथ वाचतांना वारंवार होई व वारंवार ती डोळे मिटून पडे. अशीच डोळे मिटून तन्मयतेंत ती पडली असतां डॉ. बिलोरे तिच्यासमोर येऊन उभे राहिले.

'कोणाचं येवढं चिंतन चाललय?'

'कोण? डॉक्टर—' आनंदानें उठत सुधा म्हणाली. 'केव्हां आलांत?'

'तुमची समाधी लागतांच आलो!'

'आतां समाधी लावण्याची वेळ आली खरी!'

'म्हणजे?'

'डॉक्टर! तुम्हाला कळावयास हवं! वर्तमानपत्रं वाचलं नाहीं वाटतं आज?

'नाहीं बुवा! काय आलंय् वर्तमानपत्रांत?'

'सार ब्रह्मांड आलंय! ही घ्या वर्तमानपत्रं, वाचा एकदां! अन् सांगा मी म्हणत होते तेंच खरं झालं ना अखेरीस?'

विशेष लक्ष न देतां डॉक्टर बिलोरे वर्तमानपत्र चाळूं लागले. त्यांत सुधाला लागणारा अचूक मजकूर त्यांना सांपडेना. म्हणून तो दाखवण्यासाठी सुधा त्यांच्याजवळ गेली. पटापट पानें उघडून एका विवक्षित मजकुरावर बोट ठेवले व 'हं, वाचा हा मजकूर' अशा आदेशसूचक अभिप्रायांत ती डॉक्टरांकडे पाहूं लागली.

ती जाहीर नोटीस होती. नोटीशींतील मजकूर साधारणतः असा होता—

" कुबेर कंपनीच्या नांवावर श्रीमती सुधा कुबेर, सौ. रजनी लखपती व श्रीयुत बजाबा यांनी वैयक्तिक स्वरूपांत उधारीचे व घालमेलीचे व्यवहार केले आहेत. यापुढे कोणीही कुबेर कंपनीच्या नांवाने व्यवहार केल्यास त्यास कंपनी जबाबदार राहाणार नाही."

नोटीशीखाली अशोकची सही होती. नोटीस वाचून दाखवतां दाखवतां सुधाचा चेहेरा लाल होई. डॉक्टर मात्र 'यात काय झाल ?' अशा निर्भय सकेताने सुधाच्या मुखाकडे टक लावून पहात होते. वृत्तपत्र वाचण्यासाठी सुधाने जेव्हा डॉक्टराच्या पसरलेल्या दोन्ही बाहूत आपले विशाल कुंतलभाराने खुललेले मुखमंडल पुढे केले, तेव्हा मजकूर वाचण्याऐवजी डॉक्टर तिच्या अतुल सौंदर्याचे धुद दृष्टीन सारखे निरीक्षण करीत होते.

स्त्री अत्यत रागावली म्हणजे तिच्या मुखावरील खुलावट अपूर्व असते. रागाच्या स्पंदनांतून तिचे उठणारे उष्ण उच्छ्वास डॉक्टरांना रोमाचित करित. मजकूर वाचून संपताच ती पूर्ववत् आपल्या आसनावर बसली. सतप्त आवेशाने गालावर उमटलेल्या खळ्यावर आपली करागुली ठेवित ती म्हणाली,

'तुम्हीच सांगा, कायमची समाधी लावण्याची वेळ आली की नाहीं ? ही नोटीस वाचल्यापासून कुणालाहि तोंड दाखवू नये असं वाटू लागलंय् मला—'

'तुम्ही फारच भितऱ्या बुवा! पर्यांना एकदां स्पष्टास्पष्ट कां सांगत नाहीं ?—'

'तुमचं आपलं तेच! अहो, अमेरिकेला ते गेले अन् इकडचं जग विसरले. त्यांना काय, आम्ही मेलो की जगलो, अब्रूनं रहातो की बेअब्रूनं तोंड लपवतो, तपास करण्याइतकी तरी माणुसकी राहिली काय त्यांच्याजवळ ? हजार पत्र धाडलीं. एकाच उत्तर धाडतील तर शपथ ? तरी मी म्हणत होते की, जांवई झाला म्हणून अंगच सोडून सर्वस्वाचा आहेर करूं नका! माझं ऐकतं कोण ? त्याच्या शोधावर म्हणे ते लाखाचे दहा लाख करणार आहेत. घ्या आतां—'

'तुम्ही असं करा, ही सर्व हकीकत पपांना टेलिफोननं सांगा! त्यांनीं ऐकलं नाहीं तर–'

'तर--मी स्पष्टच सांगणार! सत्ता नी संपत्ती माझी माझ्या हातांत हवी! लोकांच्या तोंडाकडे बघण्याची माझी इच्छा नाहीं. त्यांना मानवलं तर ठीक, नाहींतर मी कुठं तरी जाऊन जीव देईन–! चला, न्यूयॉर्कला आतांच्या आतां टेलिफोन करते नी सोक्षमोक्ष लावून घेते.'

'पण मला कोर्टांत गेलं पाहिजे आज!'

'कशाला?'

'बजाबाची केस आहे ना! अशोकनं त्याला धुळीला मिळविण्याचा चंग बांधलेला दिसतोय. मी तपास केला. सांवळ्याच्या घराला आग लावण्याचा आरोप ठेवून संशयावर पोलिसांनीं बजाबाला पकडलं; याला कारण अशोक आहे. त्याने पहिला वहीम बजाबावर घेतला.

'अस्स! तर मग मला आतांच टेलिफोन केला पाहिजे. उठा! दिवाणजी जातील कोर्टांत! तुम्ही चला मजबरोबर फोर्टांत!' स्वतः उठत, सुधा डॉक्टरांना त्यांचा हात धरून उठवू लागली. तिच्या आर्जवी शब्दांतही मोहकता होती. उठतां उठतां डॉक्टरांनी तिच्यावर पाठीवरून हात फिरवीत तो अर्धा मानेवर अर्धा गालावर आणला. अणुमात्र प्रतिकार न करतां सुधा 'उठा ना' अशा मूक भावांनीं त्यांना उठण्यास सांगत होती. तोंच–

चहाचा ट्रे घेऊन गडी आंत आला. डॉक्टर व सुधा दचकून दूर झाली. यांच्या दचकण्याने गडी दचकून त्याच्या हातामधील ट्रे पडला. उभ्या आयुष्यांत पहिल्यांदा व तेही गड्याने आपणांस विचित्र देखाव्यांत पहावे याबद्दल सुधाला अतिशय वैषम्य वाटले. चहा न घेतां तीं दोघे फोर्टांत न्यूयॉर्कला टेलिफोन करण्यास निघून गेली.

* * *

न्यूयॉर्कच्या एका श्रीमंत हॉटेलांत बाळासाहेब आपल्या खोलींत बसले होते. टेलिफोनचा रिसीव्हर खालीं ठेवून सुधानें निवेदन केलेल्या हकिकतीचीं टिपणं ते गंभीरपणे वाचीत होते. कपाट उघडून त्यांतून आज-

वर आलेल्या सुधा-रजनीच्या पत्रांची पुडकी त्यांनीं टेबलावर पसरलीं. यांतून कसा मार्ग काढावा याचा तीनतीनदां डोके खाजवून विचार करावा. व कांहींच न सुचल्याने विचारचक्राला गती मिळावी म्हणून ते पाईपचे भराभर झुरके ओढीत. त्यानेहि कांहीं सुचले नाही म्हणजे मेजावरील प्याल्यांतून मदिरेचे दोनचार घोट घेत. या क्रमांत जवळ जवळ दोन बाटल्या रिकाम्या झाल्या. त्यामुळे त्यांच्या धुंद नेत्रांना 'पैशा'खेरीज कांहींच दिसेना! थोड्या वेळांत ते जागच्या जागी झिंगूं लागले.

वस्तु खराब होऊं न देतां ती चिरकाल टिकवण्यासाठी दारूंत बुडवून ठेवतात. पण कीर्ती ही अशी एकच चीज आहे कीं, ती दारूंत पडतांच सपशेल नाहींशी होते. पण त्याचे बाळासाहेबांना काय? कीर्तीची अभिलाषा त्यांनी कधींच केली नव्हती. त्यानीं पुनश्च रिती बाटली झिंगत असतांनाच तोंडास लावली. मदिरेचा मादक उन्माद त्यांच्या ठिकाणीं सारखा फेसाळत होता. त्या क्षणिक गोड धुंदीत त्यांना लक्ष्मीच्या खेळाचीं अनेक दृश्ये दिसूं लागली.

*           *           *

'किती कोट रुपये? फक्त शोधांचे सर्वाधिकार तुम्हाला द्यावयाचे? आजन्म 'राईटमनी' म्हणून मला इतकी रक्कम मिळणार!—ठरला सौदा? आणा तो करार, मी सही करतो त्यावर!

बाळासाहेबांचा हात या करारावर सही करतांना सारखा थरथरत होता. मा, नीली, अशोक, असंख्य मजूर आणि शेतकरी आपला हात मागे मागे ओढून आपणास विरोध करीत आहेत असा त्यांना भास झाला. असंख्य आवाज उठून आपणास सळो का पळो करीत आहेत- पण नाण्याच्या झंकारांत या कल्लोळाचा एकहि पडसाद त्यांना स्पष्टपणे ऐकूं येईना!

'पोरीच्या संसाराचं आपल्या हातांनीं कां वाटोळं करतां?'

'पपा! पपा! हे पाप पदरीं बांधून तुम्ही कोणती पुण्याई कमावणार?'

'वेडी! कसलं पाप? पैशाला पापपुण्य असतं का? पैसा कुठंहि पवित्रच असतो. शुचिर्भुत ब्राह्मणाला खाटकाची सावली सहन होत नाहीं.

पण कत्तलखान्यांतील रक्तलांछित पैसा पवित्र समजून ब्राह्मण तो पदरीं बांधतोच ना ? देवळातील पैसा पवित्र अन् दरोडेखोराचा पैसा अपवित्र म्हणून कुणी भेदाभेद करतो का ? वेश्या महापापी ठरली तरी तिच्या पैशाला तुमच्या आमच्या पैशाइतकच बाजारांत मोल आहे ना ? साधूच्या दमडीला कोणी दीनार म्हणत नाहीं कीं सैतानाच्या दीनाराला कोणी दमडी ठरवीत नाहीं. पैशाला कुठेहि एकच किंमत पैसा कुठेहि सारखाच पवित्र असतो...'

'तुम्ही असंख्य बांधवांच्या ओठावरील अन्न हिरावून परक्याची पोटं भरीत आहांत ! हा राष्ट्रद्रोह आहे, शुद्ध विश्वासघात आहे !...'

'मूर्ख आहेस झाल ! राष्ट्र राष्ट्र काय घेऊन बसलास ? उद्यां तूं, मी उपाशीं राहिलो तर राष्ट्र का तुला जेवूं घालील ? पैसा ज्याचा त्यालाच कमवावा लागतो. फिरून राष्ट्र म्हणजे काय समजतोस ? पांच वेडपट पुढारी व पन्नास अप्रबुद्ध दे. भ. एकत्र जमले की झाल राष्ट्र ! '

पैशाच्या रुमझुम नी छुमछुम आवाजात ते इतके तन्मय झाले की, त्यांना आपपर भावाचा भेद कळेना ! त्यांच्या दृष्टीला पत्नी, मुलगी, जावई कोणी कोणी दिसेना ! फक्त पैसा नी पुढे ठेवलेले करारपत्र ! यापेक्षां जगांत काही असेल असेहि त्यांना वाटेना ! टांक दौतीत बुचकळतांच त्यांतून अनेक बुडबुडे उठले. बुडबुड्यांमधून अनेक किंकाळ्या उठल्या.

'माझ्या सहाय्याने पांढऱ्यावर काळे करून देशाला बुडवण्याचें पाप करण्यापेक्षां देशाच्या स्वातंत्र्याच्या सूक्ती लिहा '

पण हे काळ्याभोर शाईचे बुडबुडे ! क्षणांत उठले नी क्षणात बडबडले. क्षणांत फुटून गेले. बाळासाहेबांची धुंदी चढत होती, करारनाम्यावर सही करतांच त्यांना केवढा आनंद झाला !

पैशाच्या असंख्य राशी पडून त्यांतील कलदार नाण्यांच्या गोड झंकाराने दाही दिशा फुलल्या आहेत. लाखो लोकांचें जीवन, ससार व मृत्यू ठरविण्याची अपूर्वशक्ति आपणास मिळाली आहे. हेनरी फोर्ड, रॉकफेलर सारखे नवकोट नारायण हेव्याने आपणाकडे पहात आहेत. तर–

वेडे जग, भांडवलवाला फासिस्ट म्हणून दातओंठ खात आपणावर चवताळत आहे व आपण उपहासाने सर्वांकडे पाहून हंसत आहोत

'फासिस्ट! कोण मी? छट्! मी फासिस्ट नाही. मला तुमचा फासिझमहि ठाऊक नाही.'

'फासिझम ठाऊक नाही? भाडवल अधिक खून म्हणजेच फासिझम!'

'खून! कोणी केले खून? मी?'

'होय. असंख्य बांधवांचे तुम्ही खून केलेत–! असख्य मजुरांना मारले. असंख्य शेतकऱ्यांना अन्नान्न करावयास लावून ठार केले!'

'मग त्यात काय झालं? गुलाम मेले–पण गुलामांना जीव असतो कोठे? मेलेल्यांना मी कसा मारणार? ते जिवंत असते तर त्यांनीही उद्योग, उत्साह याच्या जोरावर माझ्यासारखा उत्कर्ष करून घेतला असता! नाण्याच्या बाजारांत सर्वांना संपूर्ण स्वातंत्र्य आहे. हा पैसा माझा आहे....'

'मुळीच नाही! या प्रत्येक नाण्यावर पराक्रम व परिश्रम केलेल्या लोकांची नांवे कोरलेली आहेत. त्या नावाप्रमाणे ज्याचा पैसा त्याला पोचतां करा! ते औदार्य आहे. माणुसकी आहे. सहृदयता आहे... ..'

'जगात औदार्य कोणाला आहे, तर ते मला असावं? येवढा मोठा 'रत्नाकर,'–असंख्य लोक त्याची पूजा करतात. पण त्याने लोकांना काय काढून दिलें? शंख आणि शिपले त्यांच्या तोंडावर फेकून हिऱ्या-मोत्यांच्या राशी मात्र उदरांत दडवून ठेवल्यांत! खुद्द देव तरी कुणाला काय देतो? तारकांच्या हिऱ्यामाणकांनीं आकाश फुलले आहे. त्या अगणित संपत्तीमधून उल्का–शुद्ध फत्तर–यापेक्षां देवाने अधिक कांहीं दिले का? मग मी तरी मजुरांना माझा पैसा कां द्यावा? असतील ते दुःखी! त्यांच्या दुःखांचा माझ्या सुखाशी संबध काय?

जीवनकलहाच्या गर्दीत तत्त्वज्ञान ऐकतो कोण? हजारो लोक त्यांच्या वर तुटून पडले.

'हा शुद्ध दरोडा आहे!'

'हा दरोडा नाहीं ! समाजाची ही हक्काची मागणी आहे.'

'असंख्य लोकांना अन्नाला लावणं-हा पराक्रम आहे. तुम्ही ज्याचे त्याला पैसे परत करा—'

'पण पैसे गेल्यावर मला कोण विचारणार? पैसे संपल्यावर मला काय किंमत राहणार? संपत्ती नाहीं तर सत्ता नाही, सत्ता नाही तर सुख नाही.'

बाळासाहेब पैशाच्या गडगंज ढिगाऱ्यांत प्राण वांचवण्यासाटीं दडून बसले. पण तेथे जीव गुदमरू लागला. ते 'वांचवा !' 'वाचवा' म्हणून ओरडत बाहेर आले.

तो नुकतीच सकाळ झाली होती. आपण आपल्या बिछान्यावर आहोत असे त्यांना कळले. 'मग हे स्वप्नच का ? स्वप्नाला मी येवढा भ्यायलो?' असं म्हणत ते मनाशी हंसले. घाईघाईने फोनजवळ आले व भराभर दहापांच जणांस त्यांनी फोन केले.

'गाडी तयार आहे, साहेब !'

'अच्छा—' बाळासाहेब बंदरांत आले. तेथे त्याची अनेकजण मार्गप्रतिक्षा करीत होते. सर्वजण बोटीवर चढले. बोट क्षणार्धांत चालू झाली.

## अशोकचें नंदनवन : : १६

आपल्या निसर्गरंगीत कापसाच्या कलाकृतीचे नमुने पुढें ठेऊन अशोक धन्यतेने पाहात असतां नीली तेथे आली. अशोकच्या मागे ती किती तरी वेळ उभी होती. पण कलाकृतीच्या तन्मयतेत अशोकला तिचं आगमन कळलं नाहीं. म्हणून तिनं हळूंच आपल्या हातामधील ' केबल ' पुढे केली.

' हे काय ? ' अशोक अर्ध्यामिटल्या नयनानी नीलीचा गोंडस हात व त्यांतील ' केबल ' न्याहाळीत म्हणाला.

' ही पपांची केबल ! पपा, इंग्लिश आणि अमेरिकन मित्रमंडळी-सह आज दुपारीं येणार आहेत... '

' अस्सं ! ' झटकन् खुर्ची फिरवीत, तिच्या हातामधून केबल घेत त्याने आश्चर्योद्गार काढले. पपा येणार या वार्तेनं त्याला मुळींच आनंद झाला नाहीं. आनंद झाला तो यासाठीं कीं, इंग्लंडमधील व अमेरिके-तील बडेबडे शास्त्रज्ञ, वनस्पतीतज्ज्ञ, गिरणीमालक, आपल्या नवनवीन शोधांच्या अपूर्व कलाकृती पहावयास येणार म्हणून ! हिंदी बुद्धिमत्तेची चमक पाश्चात्यांना दाखवण्याचा हा बहुमोल प्रसंग आला या कल्पनेनं अशोक प्रमुदित झाला.

' नीली, केवढी आनंदाची बातमी आणलीस तूं ही ! तुला काय

बक्षिस देऊं याबद्दल? ...... ' अखेरचं शब्द अशोकनं अशा झोकनोकांत उच्चारले, की त्यातील गर्भितार्थ चटकन् ओळखून, नीलीनं नेहमींचा लाडिक मुरका मारला! डोळे अशा विचित्र पद्धतीने उडविले की, 'मला कांहीं नको' ही भावना एक चकार शब्द न बोलता तिनं प्रकट केली. अशोकला या नाजुक भाषेचा चांगलाच सराव झाल्यानें त्याला ती कळण्यास कधीच जड जात नसे.

* * *

बाळासाहेब आले! त्यांच्यासमवेत अमेरिकेतील व इंग्लंडमधील वनस्पतींचे मोठमोठे वाचस्पती, शेतकी खात्याचे अधिकारी, शोधक, किती तरी नाणावलेले जगविख्यात पुरुष होते.

लगेच दुसऱ्या दिवशी ही मंडळी नवलाखी बागेतील जादुगिरी पहाण्यास आली. हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश आहे, ही नवखंडांत पसरलेली कीर्ति नवलाखी बागेत सहजासहजी पटे! किती रम्य जीवन ते! सृष्टीसौंदर्य तरी किती अमोघ! कुठेहि नजर फेकली तर वसुंधरा विचित्र वैभवाने विलसत असल्याचं दृग्गोचर होई! अवघा दहा खेड्याचा गट! पण त्या विभागांत अशोक व प्रकाश दोघानी विश्वामित्राची नवी सृष्टीच निर्माण केली होती! या वैचित्र्याने नटलेल्या बागेत पदार्पण करतांच पाहुणे मंडळीची पदोपदीं किती गंमत उडे! मयसभेत दुर्योधनाची जशी फजिती व्हावी तसाच काहीसा गोड गंमतीचा प्रकार येथे घडू लागला.

आवारांत वाऱ्याच्या तरंगावर डुलणारी लहान लहान रोपटी बघावीत, त्याच्या पानांकडे बघावे तर तीं बटाट्याचीं झाडें आहेत असे सर्वांना वाटे! पण तत्क्षणींच सर्वांची पानाखालीं नजर जाई! व रसरसलेले, लालबुंद टोमॅटो ठिकठिकाणी लटकलेले दिसतांच हा काय चमत्कार आहे म्हणून त्यांनीं एकमुखी आश्चर्योद्गार काढावेत! या समयीं बांधावरील एकादे रोप मुळासह उपटून अशोक त्यांच्यापुढे करी! निसर्गाची किती विचित्र कृती ती! मुळाला चांगले डोळेस, भरीव बटाटे लागले आहेत तर फांद्याफांद्यावर टोमॅटो बहरले आहेत.

पुढे पाऊल टाकावे तो पुन्हां नवी नवलाई! वेलीवरील हिरवेगार

काळें खुडून अशोकने कुणाला तरी द्यावे त्यानें हौसेने ते चाखावे नी ' थूं थूं ' करीत, ' किती कडू जहर फळ हे हो ' म्हणत फेकून द्यावें. तोंच त्याच वेलीच्या दुसऱ्या फांदीवरील दुसरें फळ चाखणारा, ' अहा! किती गोड फळ! ' म्हणून आनंदोद्गार काढी एकाच वेलीवरील ही परस्पर-विरोधी फळे पाहून ही नजरबंदी आहे की जादुगिरी आहे असा त्याना प्रश्न पडे.

द्राक्षाच्या मळयांत पदार्पण करतांच आपण नंदनवंदनांतून तर विहार करीत नाही ना असा त्याना आभास होई! फ्रान्स, अमेरिका येथे त्यानी अनेक द्राक्षाचे मळे पाहिले. पण येथील सर त्याना कुठच आढ-ळली नाही. वस्तुत द्राक्षाच्या एका वेलीवर फार फार तर शसव्वाशे घड लटकतात! पण नवलाखी बागेतील वेलीवर पधराशेपर्यंत रसरसलेले घोस बहरले होते. काय ही करामत! निसर्गाची केवढी ही लयलूट! वसुंधरेचे किती अगाध वैभव हे!

अनेक फळांनी विनम्र झालेल्या वृक्षांच्या राजीतहि किती विविधता, किती अपूर्व रुचिवैचित्र्य होते! सफरचदाच्या झाडावरून तवतवीत फळ काढून अशोकने त्याच्या दोन फाका केल्या. फळ एकच पण रुचि भिन्न! एक फाक आंबट होती तर दुसरी अमृतचवीला हार न जाईल इतकी मधुर होती.

बदामाच्या अर्ध्या फांद्या बदामांनी लवलेल्या दिसाव्यांत तर त्याच वृक्षांचे अर्धांग काजूच्या फळांनीं फुललेले दिसावे! एक ना दोन, हजारो जातीचे वृक्ष, त्यावरलि हजारो जातीचीं फळे, त्यांचा विविध आकार, विविध रुची पाहून सर्वजण विस्मयचकित झाले.

शेतावरच्या माळरानांत फड्या निवडुंगाची घनदाट रानेच राने होतीं. जहरी काट्याचें पीक म्हणून जग आजवर त्याचा निर्घृणपणे उच्छेद करीत आले! पण अशोकने कलमपद्धतीच्या अनेक प्रयोगांनी व नव्या खतांच्या अद्भूत चैतन्याने बिनकाट्यांचा निवडुंग निर्माण केला. त्याचीं रसदार, जाडजुड पाने हातांत धरली तर मखमालीसारखी मऊमऊ लागत! या पानांचा सर्रास उपयोग अशोक गाईगुरांना खाऊं

घालण्यांत करी. यांत अनेक जीवनद्रव्यें आहेत, गाई याच्या सेवनाने चांगल्या दुधाळतात. सनातनी जगाला नवीन डोळे नाहींत! अन् म्हणूनच जुन्यांतून नवीन शोधण्याची कला त्यांना अवगत नाहीं. ती असती तर आमच्या किती तरी टाकाऊ गोष्टींना संशोधनाचा उजाळा मिळाला असता बरे! अशोकला हीच नवी दृष्टी होती. तिच्या जोरावरच तो नवी सृष्टी निर्माण करी!

फळांची ही अभिनव सृष्टी संपते न संपते तोंच फुलांची वनराजी सुरू झाली! पाश्चात्य लोक फुलांचे अति शोकी! तेथील फुलांच्या अनेकविध जाती पाहून ते हुरळले! सौंदर्याकडे पाहून कुणाला सुंदर विचार सुचणार नाहीत?

या सृष्टीचे मूलभूत तत्त्व फारच सोपे नी बुद्धिगम्य होते! जातिसंकराच्यायोगाने चित्रविचित्र रंगाची, क्षणाक्षणाला भिन्न भिन्न सुगंधाचे उमाळे सोडणारी फुलबाग कुणालाहि करता येण्यासारखी असते. फुलांत रंगवैचित्र्य कुठून येते? हे विविध, मोहक, नेत्रसंतोषी रंग मिळण्याची फुलांची सौंदर्यखनी वसुंधरेच्या वैभवशाली अंतरंगांत असते. फुलांत निसर्गदत्त रंग देणाऱ्या पेशी असतात! या पेशींत विशिष्ट रासायनिक, संग्राहक व प्रसारक अशा विविध शक्ति असतात! जमीनींत रंग निर्माण करणारीं रासायनिक खतें टाकलीं व त्यांत मनोवांछित रंग असलेल्या जातीचे रोप लावले तर तो विशिष्ट रंग अथवा झांक सारखी क्रमाक्रमाने दरएक पिढींत वाढवतां येते.

याच तत्त्वावर अशोकने अनेकविध गुलाबाची अपूर्व ‘ गुलाब सृष्टी ’ नटवली होती. बागेत–काळा गुलाब, निळा गुलाब, सुवासिक पानांचा गुलाब, स्वादिष्ट गुलाब, पिवळा सोनेरी गुलाब, नारिंगी गुलाब, अत्यंत सुवासिक गुलाब,, सुंदर कांट्यांचे गुलाब, शेकडो प्रकारांनीं एकच फूल फुलतांना दिसे, फुले सुगंधीं निघालीं तर तो निसर्गाचा नियमच ठरेल. पण गुलाबाचीं पाने चुरगळताच त्यांतून अत्यंत हृदयंगम गुलाबपुष्पाचा सुगंध दरवळावा हे आश्चर्य नाही का? गुलाब झाला तरी तो कडवटच असतो. फळाचा व फुलाचा अर्धा अर्धा स्वाद असलेली नवी जात

निर्माण करण्यांत किती अलोट बुद्धिसंपन्नता असेल बरं! फूल कोमेजले कीं रंगहीन होऊन निर्माल्यवत् होतें; पण पिवळा सोनेरी गुलाब अनेक दिवस त्याच नवतीने नटलेला दिसावा–किती मोहक काव्य हे !

गुलाबांच्या कांट्यावर कधीं कुणी प्रेम केले का ? पण अशोकनें हेच गुलाबी कांटे पारदर्शक करून त्यांत नवलाई निर्माण केली होती. शर्टच्या बटनाच्या आकारापासून तो तीन फूट व्यासाच्या आकारापर्यंत येथे गुलाब पहावयास मिळत. पण हा शोध केवळ नेत्रसंतोषी होता. त्यांत प्रत्यक्ष असा फायदा नसे.

अन् म्हणून नीली अशोकला अनेक वेळां म्हणे कीं, 'हा गुलाबी शोध केवळ अव्यवहार्य आहे.'

'होय! अगदीं स्त्रियांच्या गालासारखा! स्त्रियांच्या गालांनाहि जग गुलाबाची उपमा देतं पण त्या गुलाबांचा व्यवहारांत काय बरं उपयोग? स्त्रियांच्या गालावरील गुलाबांचा कुणी कधी गुलकंद केला का?' नीली या उत्तराने निरुत्तर होई व नकळत तिच्या गुलाबांची बाग फुलूं लागे.

याच फुलांतील तत्त्वावर त्याने निसर्गनिर्मित रंगदार कापसाची निपज केली होती. अन् म्हणून तो या गुलाबी सृष्टीवर इतका मोहित होई! कपाशीचीं शेते म्हणजे अशोकच्या शोधाचा सितारबिंदु होता. आर्थिक व्यवहाराचीं अगम्य कोडीं उलगडणारा तो एक अभिजात ठेवा होता! क्षितिजापर्यंत भिडणाऱ्या अथांग शेतांत हिरवी, निळी, पिवळी, सातरंगी कपाशीचीं बोंडे अर्धोन्मीलित होऊन सर्वत्र अपूर्व सौंदर्याची खैरात करीत! एकच झाड–पण त्यावर लांब धाग्याची, व्हेरमला मागे टाकणारी, रेशमासारखी मऊ कपास सातशे बोंडामधून डोकावूं लागलं म्हणजे किती कौतुक वाटे! वसुंधरेच्या उदरांतील हे सौंदर्य इतक्या दिवस कोठे दडले होते? वसुंधरा इतकी वैभवशाली असून आम्ही तिला किती निकृष्टावस्थेत नेली, असे आनंदाचे नी खेदाचे विचार येत.

सृष्टिसौंदर्याचा हा हंसता खेळता संसार पाहून परदेशी भांडवलवाल्यांना अशोकचा किती हेवा वाटला! ही अगाध सपत्ती आपणांस कशी लुटता येईल याचाच तर ते विचार करीत नसतील ना! दहा खेड्यांतील

ती सामुदायिक शेती, तेथील सामुदायिक जीवन, सामुदायिक संसार पाहून हे भांडवलवाले जरा चमकले! त्यांना या सुंदरतेत साम्यवादाचा वास येऊं लागला!

अन् तेही कांही खोटे नव्हते. अशोक नी नीली त्याच तत्त्वावर अविश्रात आपलं तनमनधन खर्च करीत होती. अशोकप्रकाशची ही कर्तृत्वगिरी अशी फुलली होती; तर नीलीनं या खेड्यांत ससारिक साम्य-वादाचा संसार थाटला होता. शेतकऱ्यांचा संसार सुखी करण्यासाठीं तिनं येथे तीन मडळं स्थापन केली होती! शेतकऱ्यांच्या अप्रबुद्ध स्त्रियांना साक्षर करण, सुगृहिणी करण, खऱ्याखुऱ्या कर्तबगार संसारिका करणं हे तिचं ध्येय होत. परिचारकागृह, पाकशास्त्र मंडळ, गृहव्यवस्था मंडळ अशी तीन मंडळे तिने जर्मनीच्या पद्धतीवर चालवली होती. त्यामुळे तेथील स्त्रिया गेल्या पाच वर्षात उत्तम परिचारिका बनल्या. मुलांची जोपासना त्या इतक्या उत्कृष्ट रीतीने करीत की, त्या मुलांच्या मुखसौंदर्याकडे पाहून ' हा मुलांचा बाग कीं, फुलांचा बाग ? ' अशी सामान्य प्रेक्षकांस शंका येई! चौरस आहार त्यांना माहित होता. अन्नांतील विविधसत्वे त्या पटापट सांगूं शकत! मुलांचे, पतीचे कपडे त्या स्वतः शिवूं शकत! त्यासाठी नीलीने सामुदायिक शिवणकला मदिर उघडलं होतं.

या सर्वांची प्रतिनक्कल आपल्या सर्व गिरण्यांतून, गिरणींतील मजूर-वस्तीमधून करण्यांत आली. गिरणीतील मजूरांची सामुदायिक ड्रील, त्यांना व्यायामानतर मिळणारं निर्मळ दूध, मजूरांना जागतिक उलाढाली सांगणारे पगारी पडित, निरक्षरांसाठी रातशाळा, मुलासाठीं नव्या धर्तीची शिक्षण-मदिरे, आरोग्यमंदिरे, लवाद मडळे, एक नी दोन किती तरी सामुदायिक जीवनाच्या कला येथे खुलत होत्या. या शेतकऱ्यांचा व मजूरांचा इतर मजूर हेवा करीत. त्यांचा सुखाचा ससार पाहून ते असंतोषाने आपल्या मालकवर्गाचा द्वेष करीत. इतकी सुधारणा होऊनहि अशोकला यांत अद्यापि हजारपटीनी सुधारणा झाली पाहिजे. अन् म्हणून तो हरघडीला हुरहुरत असे.

* * *

'आपण हा विस्तार केला तरी कसा ?' असा पाहुण्यांनीं प्रश्न करतांच अशोक मोठ्या उत्सुकतेने आपल्या कार्यविस्ताराची फोड करून सांगे ! तो म्हणे,–

"संसारक्षितिजावर नव्या युगाचा जन्म झाला, त्याबरोबर नव्या कल्पना, नवी साधने अस्तित्वांत आलीं. पाश्चात्यांनीं या बदलत्या काळांत नव्याचा अंगिकार करून संसारांत नाविन्य निर्माण केलं ! आम्ही पौर्वात्य लोक मात्र जुन्याला चिकटून बसलो. त्यामुळे नवयुगांत जन्मूनदि आम्ही जुनेच रांहिलो, जगाला दुरावलो. अन् म्हणून जगाच्या मानाने आम्ही सर्वस्वी कंगालावस्थेत आलो. पाश्चात्यांत यांत्रिकजीवन व ग्रामजीवन यांची सांगड बेमालूमपणे झाली आहे. अमेरिका, रशिया, आयर्लंड हीं राष्ट्रे याची चांगली साक्ष देतात. आमच्या हिंदुस्थानात मात्र यांत्रिक युगाचा विस्तार झाला नी ग्रामजीवन जवळ जवळ नष्ट झाले ! हिंदुस्थान कृषिप्रधान देश आहे. जगाबरोबर चालावयाच झाल्यास आम्हांस यांत्रिक युगाला लाथाडता येणार नाहीं. पण त्यापूर्वी आम्हीं ग्रामजीवन पूर्णतेला नेलं पाहिजे. आमच्या शेतीच्या आंधळया परंपरा, सनातनी साधनें, झुगारल्याशिवाय आमच्या शेतीच्या मातीला मोल येणार नाहीं. नाविन्य व चैतन्य हे वसुंधरेचे आवडते अलंकार आहेत. ते तिला अर्पण केले तर ती मातीच्या अणूरेणूतून फुलून तुम्हाला प्रसन्न होते. कल्पवृक्ष स्वर्गात नसून वसुंधरेच्या उदरांत आहे, असं मी नेहमी म्हणतो ते याच हेतूनं ! तुमच्या अमेरिकेत 'ॲग्रिकल्चरल कॉन्सेन्ट्रेशन सिस्टिम' प्रचारांत आली. तशीच ती आमच्याकडे आली तर हां हां म्हणता आम्ही भूमीचा स्वर्ग करूं !

आजची हिंदुस्थानची शेती सनातनी परंपरेमुळे मातीमोल ठरली ! शेतकरी कर्जात बुडाले, साऱ्याच्या डोईजडपणाने त्यांना शेती नकोशी झालीं ! शेती सुधारण्यासाठीं शेतकऱ्यांना कर्जमुक्त करा, सारा कमी करा म्हणून आमची सारखी ओरड चालली ! सुशिक्षितांना 'खेड्यांत चला' म्हणून आमचे पुढारी स्वाभिमानानं प्रेरित होऊन तळमळीची फर्माने

सोडितात! पण या सर्व गोष्टी व्यर्थ आहेत! सारा कमी झाला, शेतकरी कर्जमुक्त झाला, सुशिक्षित खेड्यांत गेले, तरी पुढच्या पिढीला ‘पुढें काय?’ असा प्रश्न येणारच! हिंदुस्थानची आत्यंतिक जरूरी ही नाहीं! तर–आमचीं शेते थोड्या खर्चांत अधिक उत्पन्न कशीं देतील, मोलाचं नी तोलाचं पीक कसं निर्माण होईल हाच महत्त्वाचा प्रश्न आहे. तो सुटल्याशिवाय मेलेल्या शेतकऱ्यांस संजीवन मिळणार नाहीं, लाखो सुशिक्षित खेड्यांत गेले तरी त्यांना तेथे उपाशी मरण्यावाचून मार्ग मिळणार नाहीं. आज एका एकरांत दोनशे रुपयांचं उत्पन्न होत नी त्यावर दीडशे रुपये खर्च होतो. वर्षभर राबून शेतकऱ्याची काय ही कफल्लक कमाई! नवीं साधने, नव्या पद्धती आम्ही अमलांत आणल्या तर त्याच खर्चांत आम्हीं दोनशे ऐवजीं दोन हजार रुपयाचं पीक काढूं शकतो. होय! हेंच मी या नवलाखी बागेत सिद्ध केले आहे. हीच ‘कॉन्सेन्ट्रेशन सिस्टीम!’ तुमच्या अमेरिकेत ल्यूथर बरबंकनी तरी काय संदेश दिला? डॉ. स्क्रोएनर तरी जगाला हाच संदेश देतात ना? ही सुधारणा नुसत्या बडबडीनं होणार नाहीं! आम्ही खेड्यांचे गट करून त्यांत खतांचे हजारो कारखाने, कलमपद्धतीचीं नवीन साधने, व संशोधनमंदिरे निर्माण केले पाहिजेत! जमीनीचें पृथःकरण करणाऱ्या शेकडो प्रयोगशाळा हव्यात, शेतामधील पाण्याचें पृथःकरण करून अभावीं द्रव्यांचा पुरवठा पिकांना करण्याची कला शेतकऱ्यांना शिकवली पाहिजे. वैयक्तिक व विभक्तपणे शेती करण्याचा काल आतां नाहीं! सामुदायिक जीवनांतूनच शेती सुधारूं शकेल! या भावनेची प्रचीती व जागृती आम्ही शेतकऱ्यांना दिली पाहिजे! अन् इतके केल्यावर शेतीचा मंत्र नी शहरांतिल यंत्र यांची सांगड घालावयास हवी! हिंदुस्थानचा उद्धार याच पद्धतीने होईल! कोट्यवधी शेतकऱ्यांची ‘भूक’ याच अभिनव प्रयोगांनीं शमणार आहे.

आज हिंदुस्थानला शस्त्रास्त्रांचं वा निःशस्त्रांचं राजकारण सांगणारे राजकारणी नकोत! अध्यात्मिक वेदांताचे घुटके पाजणारे तत्त्ववेत्ते नकोत! निसर्गाशीं तन्मय होऊन गाणारे महाकवी नकोत! पुस्तकी ज्ञानाची पोपटपंची करणारे पंडितहि नकोत! यापैकीं कोणीहि आमची

माध्यानाची ' भूक ' भागवू शकत नाहीं ! आम्हाला संशोधक हवेत ! शेतीच्या मातीमधून पीकांचे मोती निर्माण करणारे महाभाग हवेत ! वनस्पतींची रहस्ये उलगडून तीं नित्याच्या व्यवहारांत रुळविणारे विश्वामित्र हवेत ! वसुंधरेच्या अथांग अंतरंगांत दडलेलं निसर्गाचं वैभव लुटणारे बुद्धिवंत हवेत ! वसुंधरेला अनंत रुपांनी नटविणारे रसायनज्ञ आज आमच्यांत जन्मले पाहिजेत...... "

*　　　　*　　　　*

अशोकचा हा कृषिजीवनाचा वेदांत ऐकून पाहुणे मंडळींना भारीच अचंबा वाटे ! त्यांच्या विस्मयचकित चेहेऱ्यांकडे पाहून बाळासाहेब अशोक नसतांना कुतुहलाने विचारीत, ' तुम्हाला कसं वाटतं हे ? '

' प्रयोग अभिनव आहे खरा ! पण एका दृष्टीनं ही जागतिक आपत्तीच आहे ! असे प्रकार ठिकठिकाणी होऊं लागले तर उद्यांची क्रांति यांतूनच निर्माण होईल नी जगांतील सर्व धनिकांचा फडशा उडवून देईल ! तुम्हीच विचार करा ! आज इतके शोध, इतक्या सुधारणा यांनीं घडवून आणल्या, तुमच्या पैशावर त्यांना मूर्तस्वरूप मिळालं ! पण याचा प्रत्यक्ष फायदा तुमच्या पदरांत किती पडला ? '

पाहुण्यांचा हा सवाल ऐकून बाळासाहेब गोंधळून जात ! जगांतील सारेच धनिक, सारेच भांडवलवाले, एकाच माळेचे मणी असतात ! या सर्वांचा परमेश्वर पैसा असतो. पैसाठीं प्रत्येक जण पंचप्राण पाखडावयास तयार होतो. परमेश्वराला धर्मांधर्माप्रमाणे जात आहे, निराळीं नांवे आहेत ! पण पैशाला जात नाहीं, धर्म नाही-! जगांत पैसा हा कुठेहि एकरूप आहे. अन् त्यामुळे त्याचे भजक यच्चावत् सर्व धनिकहि एकरूप आहेत. बाळासाहेबांना हे ऐकून हुरहुर लागे अशोकची ही कृति उधळेपणाची वाटे ! यांतून कसे बाहेर पडावे याचा ते अहोरात्र विचार करीत ! त्यासाठींच या परदेशी भांडवलवाल्यांना त्यांनी बरोबर आणले होते दिवसभर त्याबद्दलचीचं ते गुप्त खलबते करीत ! अशोकला याचा थांगहि नव्हता ! तो आपल्या विजयाच्या विचारांत तन्मय होऊन गेला होता.

## हा हन्त ! हन्त !—   :   :   १७

दिवाळीसारखा सुखाचा, आनंदाचा, उत्साहाचा सण नाहीं. नव्या वर्षाचा नवा दिवस ! नवीन उद्योग, नवीन आशा ! श्रमजीवी अल्पसंतुष्ट जीवांच्या तुटपुज्या वैभवाचा हा विलासी काळ ! शेतकऱ्यांचा विश्रांति-विरामाचा आनदपर्व ! श्रीमंतांना दिवाळी कधींच नसते. पण कवडीकफल्लकांना हा सण लाखमोलाचा असतो ! या मंगलप्रसंगीं, आपल्या यशस्वी पचवार्षिक योजनेचा पांचवा वाढदिवस साजरा करावा, कृतकार्याचा संतोषदायी आढावा कामकऱ्यांपुढे ठेवावा, पुढील कार्यासाठीं त्यांना तीन महिन्यांचा पगार 'बोनस' म्हणून द्यावा–किती तरी सुखप्रद कल्पनांनी अशोक दिवाळीच चित्र रगवीत होता. त्या दिवशीं मोठी सभा भरवून सर्वांना आनदीआनंदाच्या विचारांनीं विस्मयचाकित करावं असा अशोकचा संकल्प ! त्यासाठीं तो गेले कित्येक दिवस अहोरात्र राबत होता. अनेक टांचणे करावींत, अनेक टिपणे करावींत, अनेक योजना आखाव्यांत, व त्या अनेक वेळा सुधाराव्यांत असा त्याचा उपक्रम चालला होता.

अखेर तो दिवस आला. पांच वाजले ! मैदानांत यच्चावत् सर्व मजूर अनेक आशा करीत जमा झाले.

अशोकनं सर्व नियोजित कागदपत्रे खाकेंत मारलीं अन् तो जावयास

निघाला ! तोच समोर अनपेक्षितपणे बाळासाहेब नी सुधा दत्त म्हणून उभीं राहिली. यावेळी सुधाचे डोळे विजयाच्या लकाकीनं लुकलुकत होते. बाळासाहेबाचा चेहेरा भिवयाच्या मुरडीनं मुरपला असल्याने त्यावर एक प्रकारचं विकृत गांभीर्य उमटले होते. पाईपमधून उठणाऱ्या धूम्रलोटाच्या विरल नी नीलसर पटलांतून त्यांचे डोळे इतके बारिक दिसत की त्यांत कोणते भाव समावले आहेत हे अशोकला कळणे शक्य नव्हते.

मध्यवर्ती असलेल्या फिरकीच्या खुर्चीवर ते बसले. सुधाने आपल्या दोन्ही हातांचे पंजे कमलदलाप्रमाणे पसरून त्यावर अनेक रंगांनीं रंगलेले मुखमंडळ अलगद ठेवले, नी ती अशोककडे विजयाच्या मदोन्मत्त, अहंकारी भावनेनें पाहू लागली !

बाळासाहेबांनीं फोन उचलला ! भराभर तबकडीवरील आकडे जुळविले.

‘ हॅलो ! कोण ? दिवाणजी ? हे पहा नीली घरीं आहे कां ? नाहीं ? ठीक ! ती घरीं येतांच जशीच्या तशीच तिला इकडे गिरणीत पाठवून द्या–’ इतकं बोलून त्यांनीं फोन खाली ठेवण्यास हात फिरवला तो खुद्द नीली हास्यमुखानं आपल्यासमोर असल्याचे त्यांना आढळले.

‘ वा ! तूं आलीस ? कशी आलीस ? ’

‘ कशी म्हणजे ? मी आज येणारच होते ! ’ लाडिकपणे वडिलांच्या खुर्चीवर रेलून नीली सांगत होती.

‘ पपा, आज केवढा आनंदाचा दिवस !– ”

‘ आनंदाचा दिवस ! ’

‘ हो, तुम्हाला माहित नाहीं ? यांनी सांगितलं नाहीं ? ’ असं हंसत हंसत विचारीत तिने अशोककडे ओठावरून जिव्हणी फिरवीत दृष्टिक्षेप केला. ‘ मी सांगू का पपांना ? का, नको ? एकदमच त्यांना आश्चर्यचकित करायचं ? ’ असा प्रश्न नेत्रपल्लवीनं अशोकला विचारण्याचा तिचा इरादा होता. पण अशोकने दाराकडे तोंड फिरवल्याने तिचा तो बेत तेवढ्यावरच राहिला व ती उतावीळ उत्सुकतेने म्हणाली,

‘ पपा ! आज आमच्या पचवार्षिक योजनेचा पांचवा वाढदिवस

आहे... ! अमेरिकेला तुम्ही गेल्यानंतर या गिरण्यांत नी शेतांत आम्ही केवढी क्रांति घडवून आणली... '

—' नीली ! तुझ्या या काव्याचा अर्थच कळत नाही मला ! आल्या दिवसापासून मी पहातोय, घरीदारी, कारखान्यांत नी शेतांत सर्वच कांही नवनव दिसू लागलंय् ! त्याबद्दल विचारणा करण्यास्तव मी बोलावलं तुला ! अशोक, असे समोर बसा नी मी विचारतो त्या प्रश्नांची उत्तरे समर्पकपणे द्या !... ' वडिलांचा हा विचित्र सूर पाहून नीली चपापली व खुर्ची दूर ओढून बसली. अशोकनं भिवया वर चढविल्या ! बाळासाहेबां-कडे कटाक्ष टाकीत त्याने आपल्या ओठाची डावी कडा किंचित्शी दातांनी दाबली. यावेळी बाळासाहेबाच्या मुखावरील गांभीर्ययुक्त आविर्भाव त्यांच्या मनोगताची मनोमय कल्पना अशोकला देऊं शकले. कसलासा निर्धार करून तोहि त्यांच्यासमोर बसला !

' काय प्रश्न आहे आपला ? '

' प्रश्न असा आहे की, गेल्या पांच वर्षात तुम्ही ज्या अनेक घडा-मोडी केल्यात त्या कोणाला विचारून केल्यात— ? '

' म्हणजे ? पपा ! तुम्ही कार्यनिवृत्त होऊन मोठ्या समारंभाने यांना अधिकार दिलेत ना ?

' नीली ! मी अशोकला विचारतोय् ! अशोक– '

' कां ? '

' का म्हणजे ? माझ्या कक्षेत केलेल्या सुधारणा मीच केल्या हे कुणालाहि कळण्यासारखं आहे ! '

' अस्सं ! या घडामोडीला पैसा कुठून आणला आपण ? '

' कोठून म्हणजे ? गिरणीच्या नफ्यांतून मी तो खर्च केला. मला तसा अधिकार होता ! फिरून खर्च करणं आपलं कर्तव्य होतं ! '

' कर्तव्य नी ते कुणाचं ? '

' प्रत्येक मालकाच ! अविश्रांत परिश्रम करणाऱ्या लोकांची तोंडं पानांनी पुसण्याचे दिवस आतां उरले नाहीत. मनु पालटला आहे. काळ बदलला आहे. बदलत्या काळाबरोबर आपण आपले विचार

बदलावयास हवेत. तसं केलं नाही तर आपण आहे ते गमावून बसू! मजूर, कामगार, शेतकरी हे राष्ट्रसंसारांतील खरेखुरे कार्यपुरुष आहेत, त्यांचा अनादर करून, अवहेलना करून आपणास चालणार नाही. त्यांच्या परिश्रमांचा मोबदला संपूर्णपणे त्यांच्याच कारणी लावणं, हीच आतां माणुसकी ठरणार! उदार मनाचा परोपकारच जगाची श्रीमंती ठरणार! म्हणून तुम्हाला श्रीमंतच रहावयाच असेल तर अनंत कालपासून चालत आलेली श्रीमंतीची व्याख्या आतां बदलावी लागेल! तेव्हां, येवढा पैसा खर्च केला-पण तो फारच थोडा झाला असंच मला वाटत.'

'मजुरांना तुम्ही काय समजतां?'

'गिरणीमधील यंत्राचं, स्क्रुचं, चे अपरिमित महत्त्व यंत्रशक्तीला आहे तेच मजूरांचं महत्त्व राष्ट्रशक्तीला आहे. माणूसकीनं बोलावयाचं झाल्यास, त्याना तुम्हा आम्हासारखे जीव आहेत, जीवन आहे, जीवनसंसार आहे. दिल्या अन्नावर जगणारे ते गुलाम नाहीत...'

—'पण, परस्पर हलवायच्या घरावर तुळशीपत्र फेकून हा परोपकार करतांना, या माणुसकीच प्रदर्शन करताना आपण मागचा पुढचा विचार केलात?'

'अलबत!'

'आपले जमाखर्च तयार आहेत?'

'म्हणजे? ही सोनेरी टोळीची संस्था आहे अशी का आपली समजूत झाली?'

'मला सांगा, या मजुरांसाठी अव्वल नफ्यांतून आपण किती पैसा खर्च केलांत आतांपर्यंत?'

'रुपयांत चौदा आणे! मूळ भांडवल तुमचं! त्याबद्दल तुमच्या नांवानं दोन आणे अलग काढून ठेवलेत! आपणास लागतील तेव्हां हे पैसे मिळतील.'

'शेतीचं उत्पन्न किती आल नी कुठ जमा केलं?'

'दहा वर्षपर्यंत शेतीचं उत्पन्न शेतकऱ्यांच्या कारणीं लावण्याची

माझी योजना आहे. शेती व यांत्रिक कारखाने यांची सांगड घालण्याचा हा अभिनव प्रयोग असून तो बराच यशस्वी झाला ! '

'मजूराना आठ तासाऐवजी अवघे सात तासच काम तुम्ही देतां त्यांत गिरणीची नुकसानी नाहीं ? '

'मुळींच नाहीं ! उलट ते फायद्याचंच आहे ! फायदा हा नेहमी पैशानं मोजावयाचा नसतो ! मजूरांचे आरोग्य उत्तम असण हा केवढा राष्ट्रीय फायदा आहे ! सात तास काम नी एक तास सक्तीचा व्यायाम ठेवला आहे ! '

'व्यायामानंतर त्यांना गिरणीच्याच खर्चान दूध देत असाल ? '

'दूधच नव्हे, तर दुपारी ताजी फळंहि देण्याचा प्रघात मी सुरूं केला आहे. शेतावर डेअरी, पोल्ट्री निर्माण करून त्याचा विनियोग शहरांत अशा रीतीनच प्रत्येक विभागांत झाला पाहिजे...'

बाळासाहेब हे कर्तृत्वशक्तिचं महापुराण ऐकतां ऐकतां सारखे संतापत होते. अखेर करड्या स्वरांत ते म्हणाले, 'ही उधळपट्टी करतांना तुम्हाला कवडीचं तरी व्यवहारज्ञान होतं का ? '

'मुळींच नाही ! मी व्यवहारज्ञानापेक्षां माणुसकीला अधिक महत्त्व देतो ! '

'जग व्यवहारावर चालतं हे विसरूं नका ! '

'कसला व्यवहार ? गरिबांना गिळण्याचा ? उद्योग उत्साह नी उत्कर्ष अशा उकारी तत्त्वज्ञानानं लोकांना बुडविण्याचा व्यवहार ? हा व्यवहार मला अवगत नाहीं.

'अशोक, मी स्पष्टच सांगतो तर ! शेतांत, गिरण्यांत रंगढंगाच्या नाना शाळा काढून तुम्ही खालच्या अप्रबुद्ध वर्गात कम्युनिझमचे, साम्यवादाचे घातुक तत्त्वज्ञान पेरीत आहांत. मला हे साफ मान्य नाहीं.

'नसेल मान्य ! पण मजूरांनीं साक्षर होऊं नये ? मजुरांनीं मनुष्यपदाला येऊं नये ? गुलामांनीं स्वाभिमान बाळगूं नये ? मजुरांनीं सुखाचीं अपेक्षां करूं नये ? तुम्ही साम्यवाद म्हणा वा कम्युनिझम म्हणा–मी याला खरीखुरी माणुसकी मानतो. शब्दाशब्दांनी भिन्न अर्थ निर्माण होत असतील

पण दयेचे तत्त्वज्ञान जगाच्या कुठल्याहि कोशांत त्रिकालाबाधित नी एकसूत्री असते !...'

' पण पैसे म्हणजे चौपाटीवरील शंख नी शिंपले नाहीत. ध्येयशून्य विलासासाठी पैशाची पैदास झाली नाही, असं आपण सुधाला बजावून सांगितल्याचं स्मरत असेलच ! तेच तत्त्वज्ञान पुनश्च प्रश्नार्थान मी आपणास परत पाजीत आहे ..'

' पपा ! याचा अर्थ शहाणपणाला जगांत मोलच नाही का ? '

' नीली ! मुलगी ' शहाणी ' झाली म्हणजे ती शहाणी असतेच असं नाहीं ! तुझं शहाणपण पलंगाच्या पाळण्यात नी पतीच्या गळ्यांतच खुलून दिसेल ! व्यवहाराच्या बाबतीत स्त्रियांना कवडीचं ज्ञान नसतं ! फिरून तुझी मल्लीनाथी ऐकण्यासाठीं मी तुला बोलावलं नाहीं ! अशोक उद्यांच्या उद्यां, हा अव्यापारेषु व्यापार बंद झाला पाहिजे. मजूरांच्या सर्व शाळा, मजूरांचे फुकट अन्नसत्र, त्यांच्या पाकसिद्धीच्या प्रयोगशाळा एकदम बद करा-त्यांना बोनस फिनस देण्याचं फाजील वेड सोडून द्या ! अन् पूर्वी अशा गिरण्या चालत तशाच त्या चालू ठेवा ..''

' म्हणजे ? ' अशोक संतापाने उठून उभा राहिला. बाळासाहेब तितक्याच संतापो निष्ठुरतेने दृष्टिक्षेप करूं लागले. नीलिचा चेहेरा गोरामोरा झाला सुधा विजयोत्सवाने गालाच्या गालांत हंसून त्यावरील खळ्या मदभरल्या यौवनरसाने भरीत होती. नाचऱ्या नयनांनी ' केवढा विजय मिळवला ' म्हणून पृच्छा करीत होती.

' ही गोष्ट कालत्रयी घडणार नाहीं ! मी माझ्या आयुष्याचा केलेला त्याग असल्या स्वार्थी नी लहरी हुकुमासाठीं केव्हांही मातीमोल करण्यास तयार नाहीं...'

' पण गिरणी माझी आहे, तीवर सत्ता माझी आहे. '

' तितकीच माझीदेखील सत्ता आहे. '

' तुझी ?–हं ! घरजांवई म्हणजे पोरीच्या रंजणूकीसाठीं विकत घेतलेलं बांहुलं असतं ही लौकिक म्हण तुम्हाला माहित नाहीं वाटतं ? '

' गिरणींत तुमचा जांवई म्हणून मी कधींच मिरवलो नाहीं.

अखिल हिंदुस्थानांत तुमच्या गिरण्या आज आघाडीवर आल्या त्या तुमच्या पैशानं आल्या नाहीत! आजची वैभवशाली भरभराट होण्यास माझं कर्तृत्व, माझे शोध कारणीभूत झाले! मी आपला हा ढांसळता डोल्हारा सांभाळला नसता, सावरला नसता तर नादारीचा अर्ज घेऊन आपण केव्हाच कोर्टाकडे धांवला असता! आपलं झुलत्या ऐरावताच वैभव उलस्या अबारीन केव्हाच संपुष्टात येतं! फिरून ध्येयशून्य षोकाखातर पैसा उधळण्याऐवजी हजारो गरीबाचे संसार सुखानं सजलेले पाहण्याची माणुसकी तरी तुमच्यांत शिल्लक असूं द्या—!'

'षोक! पाजी, हरामखोर कुठला! आम्ही काय असे षोक केलेत कीं, त्याचा डागोरा तूं जगापुढं पिटावास? फिरून केले तरी ते आमच्या पैशावर नी आमच्या जीवावर करतो!'

'आपणास प्रत्यक्ष प्रचीती पहाण्याची इच्छाच आहे का?' असं म्हणून अशोकनं धाडकन् कपाट उघडलं! त्यांतून अमेरिकन वृत्तपत्रांचीं अनेक कातरणे त्याच्यापुढं भराभर भिरकावलीं! बाळासाहेब गोंधळले. वस्तुतः ते अव्वल दर्जाचे बेरड! अनेक पापं पचविणारा हा प्राणी! कोऱ्या कागदावर काळया शाईने छापलेल्या फडतुस कातरणास इतका भ्यावा कां? त्या कातरणामधील सारा मजकूर उभ्या जगाला कळता तरी त्याबद्दल त्यांना दिक्कत वाटली नसती. पण हा रहस्यभेद सुधापुढे होऊं नये अशी त्यांची अतस्थ इच्छा होती. अन् म्हणून जितक्या जलद अशोकन तीं त्यांच्या अगावर फेकलीं तितक्याच द्रुतगतीनं त्यांनीं तीं खिशांत कोंबली!

'पटली प्रचीती, नीली! हे तुझे वडील! केवळ या भावनेनें मी त्यांचा कधीं अनादर केला नाही की पापाचा परिस्फोट केला नाहीं. पहा यांच्या पापांची जगभर झालेली जाहिरात! एका अमेरिकन तरुणीच्या पाशांत पडून तिला दहा लाख रुपये नुकसानभरपाईदाखल यांनीं दिले आहेत. हेच यांच नातडीचं काम होतं अमेरिकेत! पपा! हा पैसा सर्वस्वी तुमचा होता अशी आपली प्रामाणिक व प्रांजल समजूत आहे का? मजूरांच्या ठिपकत्या रक्तांमधून माणिकमोतीं ओसरतात म्हणून त्यांचं हृदय

चिरून रक्तशोषण करण्याचा राक्षसपिणा बंद करा ! हा खरोखरीच मानव-धर्म आहे का ? तुम्ही कितीही आढ्यतेनं सांगितलं तरी गिरण्या तुमच्या इतक्या माझ्याहि मालकीच्या आहेत.–तुम्हाला द्यावयाचा तितका भरपूर नफा दिला. बाकीचा नफा माझ्या शोधांचा, माझ्या रंगीत कापसाच्या प्रयोगांचा आहे असं लागलं तर क्षणभर समजा ...'

'कुणाचे शोध ?'

'माझे शोध !'

'मूर्ख आहेस ! ज्या दिवशी शोधांचं पेटंट घेण्याचं अधिकारपत्र तूं मला दिलंस त्याच दिवशी त्या शोधांवरील तुझा मालकी अधिकार उडाला !......'

'कायद्यानं सर्व शोध माझ्या मालकीचे आहेत ! त्यांवर तुझा काय अधिकार ! कायद्यानं ह्या शोधांची विल्हेवाट मी लागेल तशी लावूं शकतो. अन् मी लावलीहि ! वेळ आली म्हणजे कळेल आपोआप !'

हे शब्द बाहेर पडले मात्र ! नीलीनें बारीकशी किंकाळी फोडली अबूच्या पहाडावर, राजपुताना हॉटेलमधील ते दृश्य तिला एकदम दिसलें ! अशोक इतराजीनं इन्कार करीत आहे, 'पपा माझं नुकसान करतील, पपा तुमचं नुकसान करतील असं का तुम्हाला वाटतं' अशा शब्दांत आपण अशोकला अधिकार-पत्र देण्याची परोपरीनं गळ घालित आहोत ! अरेरे ! साऱ्या अधःपाताला मीच कारण झाले ना ?' तिच्या कोमल हृदयावर वज्राघात झाला. 'अशोक' म्हणून ती त्याच्या गळी पडली. मेरुमंदाराचं धैर्य दाखवणारा अशोक पण तोही मटकन् खालीं बसला. कपाळावर हात ठेवून जणूं आपलं प्रारब्ध शोधीत होता तो !

नीली निराशेनं स्फुंदूं लागली. लक्ष्मीचे खेळ किती चंचल व अगाध असतात याचा ती हुरहुरत्या मनानं विचार करू लागली. उठतां उठतां अशोकचें डोके मेजाच्या कोपऱ्यावर आपटले. मोठा आवाज झाला. गांगरून नीली सांवरूं लागली. अशोकच्या कानांत सारखा कांहीं तरी आवाज होऊं लागला.

'परदेशी लोकांना आपले सर्व शोध विकून बाळासाहेबांनीं अलोट

पैसा कमावला. जिकडे तिकडे त्या पैशांचा छुमछुमाट चालला, रुपयांच्या राशी खळखळ करूं लागल्या! बाळासाहेब या सर्वांवरून आपली महंमदी नजर फिरवीत आहेत, अशोक मान खाली घालून पश्चात्तापानं अश्रू ढाळीत आहे, आणि लांबवरून प्रकाश, 'तुझ्यासारखे बुद्धीमान तरुण जोवर श्रीमंतांच्या आहारीं जातात तोपर्यंत मजूरांचं कल्याण होणार नाहीं' असं कंठरवानं अशोकला सांगत आहे.'–केवळ कल्पनेचा खेळ! केवळ कल्पनेचं चित्र! पण सचिंतपणे अशोक डोळे झांकून ते पहात होता. श्रीमंतांच्या भूकेत आपला नाहक बळी पडला, या तीव्र खेदानं मनांतल्या मनांत चडफडत होता.

## 'मा! मा!'— : : १८

गच्चीवरून अशोकनं मैदानांत जमलेल्या कामगारांवर नजर टाकली. किती आनंदी, किती उत्साही त्यांचे चेहेरे दिसत! 'दिवाळी आली! आपणांस तीन महिन्यांचा बोनस मिळणार, मग आपण दिवाळी अशी साजरी करूं, तशी मजा करूं, या नी असंख्य सुखप्रद कल्पनांनीं त्यांचे चेहरे फुलून काश्मिरच्या गुलाबी ताटव्यांच्या शोभेला मागे टाकीत. अनंत तारकांची तेजस्वी प्रभा त्यांच्या आशेच्या प्रकाशरेखापुढे फिक्की वाटे. वसंत ऋतुमधील फुलल्या फुलांची नाजुक नी साजुक शोभा सर्वांच्या श्रमदग्ध मुखांवर उमटली होती, आशेनं रांगत होती, उल्हासानं नाचत होती. त्या सर्वांकडे पहातांच अशोकचे डोळे भरून आले.

'अरेरे! यांचं अदृष्ट यांना वाचतां येत असतं तर-तर? क्षणार्धात यांचा हा आनंद ओसरून जाणार, सर्व आशा करपून जाणार, नी हीं सारीं जण जीवन्मृताच्या काळवंडलेल्या चेहेऱ्यांनीं घरीं जाणार! त्यांची बायकापोरे-त्यांना तरी काय वाटेल? किती उत्सुकतेने तीं यांची मार्ग-प्रतीक्षा करीत असतील! पण यांना रिक्त हस्तानं परत येतांना पाहून त्यांच्या मनाला काय वाटेल? चिमण्या आशेवर जगणारे चिमणे जीव!—क्षणांत कोमेजून जातील! यांच्या ओठावरला घांसच आम्ही हिरावून घेत आहोंत ना? श्रीमंतांना जीव आहे, पण गरिबांना म्हणे परमेश्वर

आहे. किती मूर्ख कल्पना ही ! जगांत हा जीवनकलह असाच चालणार का ? श्रमजीवी जीवांना कोणीच आधार देणार नाही का ? ..'

सायकाळ झाल्याने गिरणीच्या विस्तीर्ण मैदानांत अंधार पडूं लागला. पण परिस्थितीचा अंधार सर्वत्र पडल्याने अशोकला त्याचे कांहींच वाटेना ! त्यास आशेचा किरण, प्रगतीचा प्रकाश, सुखाची सांवली, प्रेमाची पांखरण कुठेच दिसेना ! श्वासामागे श्वास, उच्छ्वासामागे उच्छ्वास दीर्घपणे तो सोडीत होता. घनगर्द अतराळांत चटकन् बिजली चमकावी नी आकाशांतील कल्पवृक्षावरील असख्य तारापुष्पे भयभीतीने कंपित होऊन गळून पडावीत, अगदी तसाच धक्का देणारा प्रसंग खालीं घडला ! बुटांचे खाड्खाड् आवाज करीत अक्कडबाज पोलीस आवारांत आले. त्यांना पाहून अशोक बेभान झाला. 'पोलीस ! कां आले ? यांना कोणीं आणले ?'

मागे उभी असलेल्या नीलीच्याने रहावेना. सद्गदित कंठरवाने ती म्हणाली,

'पपांनीं आणले ! पपांनी पोलिसचौकींत फोन केला—'

'पपांनी ? तुझ्या वडिलांनी ? कां केला फोन ? सांग !'

अशोकनं नीलीचे दोन्ही हात व खांदे धरून तिला गदगदां हालवले. प्रत्येक हिसक्यासरशी तिच्या अर्ध्या मिटल्या नयनांच्या शिंपामधून अश्रूंचीं माणिकमोती चौफेर उधळली जात ! सर्वच प्रकाराबद्दल नीली इतकी विषण्ण झाली की, 'नको हा जीव, नको हे जग, नको ही श्रीमंती,' असं तिला वाटूं लागलं ! हा भाव आपल्या किल्किल् नेत्रांमधून ती अशोकला मूकपणे कथन करी. निरपराधी नीलीवर आपण कां रागावतो हे अशोकला अति भांबावल्याने कळत नव्हतें. त्याने पुनश्च नीलीला गदगदां हालवले !

'कां, तूं मुकी कां ? पपांनी पोलिस कां आणले ?'

'पपांनी मजूरांना बोनस मिळणार नाहीं म्हणून सांगितले अन्...' नीली गुटमळुं लागली, रडूं लागली.

'सांग ! अशी अडखळतेस कां ? कठोर कृत्यें करतांना जातिवंत

श्रीमंती अशी अडखळत नाही, अशी लाजत नाही, वा मुरडत नाही ! तूं कां कचरतेस ?'

'पपानी...होय, पपांनी यापुढे गिरण्यांचा व अशोकचा काडी-इतका संबंध नाहीं असं सर्वांना जाहीर केले.

अशोकला जबरदस्त धक्का बसला. तो धांवत धांवत गच्चीच्या कठड्याजवळ आला. संतापाने 'खबरदार' म्हणून आरोळी ठोकली. पण या समयीं त्याचे ऐकणार तरी कोण ? तो अधिकारहीन होता. दडदड धांवत तो खालीं आला.

खालीं चाललेल्या रणधुमाळींत अशोक बेधडक शिरणार या नुसत्या कल्पनेने नीली गांगरली ! तिने किंकाळीं फोडली व तीहि तितक्याच चचल गतीने अशोकमागे धांवली. तृषार्तासाठीं मेघांचे थवेच्या थवे आकाशांत सैरावैरा धांवतात व त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी वायुशक्ति तितक्याच झंझावाती गतीने त्यांच्या मागे धांवते ! अगदी तसेच दृश्य अशोक पुढे नी नीली मागे धावतांना दिसले. क्षणार्धात अशोक त्या रणधुमाळीत शिरला. पोलिसांच्या दोन लाठ्या आपल्या हातांत त्याने घट्ट दाबून धरल्या. ते दृश्य पाहून नीलीला किती आनंद, किती धन्यता वाटली ! तिलाहि वीरश्री चढली. तीहि त्या अनुरोधाने गर्दीमधून मार्ग काढूं लागली. पण–पण क्षणार्धात अशोक दिसेनासा झाला. सर्वत्र एकच गिल्ला उठला. 'अशोकला मारले' सर्वजण आरोळ्या ठोकूं लागले. त्याच पावलीं नीली आगाशीच्या कट्ट्यावर उभी राहिली व सभेसाठीं उभारलेल्या लाऊड स्पीकर-मधून ओरडली. 'माझी, अशोकची तुम्हाला शपथ आहे. तुम्ही क्षणभरहि न थांबतां सर्वजण येथून निघून जा !'

नीलीचा संदेश मिळतांच सर्व मजूर निमूटपणें निमिषांत आवाराच्या बाहेर पडले. निरपराधी जीवांवर प्रहार करणाऱ्या पराक्रमी लाठ्या विसाव्यासाठीं पुनश्च पोलिसांच्या खांद्यावर विसंबल्या. नीली धांवत अशोक-जवळ आली. अशोकचे सर्व शरीर रक्तबंबाळ झालं होत. डोके फुटून तें रक्तोन न्हाले होते. नीलीनं हंबरडा फोडला. धैर्य धरून तिने अशोकला

उठवण्याचा प्रयत्न केला. अशोक अर्धवट शुद्धींत होता. नीलीचा करस्पर्श होतांच तो ताडकन् उठला. समोर नीलीला पाहतांच त्याला काय वाटलें ?

लाठीप्रहाराने मस्तकावर घणाचे घाव बसत आहेत असा त्याला भास झाला. त्या घावामधून 'तुझ्यासारखे बुद्धिमान तरुण जोपर्यंत भांडवलशाहीच्या आहारीं जातात तोपर्यंत भारतमातेला स्वातंत्र्य मिळणार नाहीं' हे प्रकाशचे अमोल बोल-हे पडसाद उठतात, कीं काय असा भास होई! विजारीच्या खिशांतून त्याने रुमाल काढतांच नीलीने तो झटकन् घेतला व अशोकच्या खोक पडलेल्या डोक्याला बांधला, त्यामुळे त्याची रक्तवाहिनी अधिकच थाडथाड उडूं लागली! त्याचे मस्तक भ्रमूं लागले. त्या भयाण एकांतामध्ये त्यास 'भूक! भूक!' असा असा करुण-कल्लोळ चालल्याचा भास होऊं लागला. अशोकच डोकं गरगर फिरूं लागले. 'मी काय करूं? कुठं जाऊं, प्रकाश! प्रकाश! तुझ्याशिवाय या निराशेच्या अंधारांत मला दुसरा कुठला प्रकाश मिळणार?' तो फाटकाबाहेर आला. समोर असलेल्या टॅक्सीत बसला. टॅक्सी चालू झाली. हा सर्व खेळ अवघ्या निमिषांत झाला. नीली दगडासारखी दिङ्मूढ होऊन टकटका पहात होती. अशोक दिसेनासा झाला. तिने एक किंकाळी फोडली. व्हराड्यांत बाळासाहेब विजयी मुद्रेने उभे होते. त्यांचा हात धरीत-'पपा! तुम्ही हे काय केलेत? तुम्हाला माझी, माझ्या संसाराची कांहींच दया येत नाहीं? तुम्ही येवढे निष्ठुर कां हो झाला? कोणत्या विराट् भूकेनं तुम्ही हा प्रलय केला? सांगा...' बाळासाहेबांनीं नीलीला जबरदस्तीने खुर्चीवर बसवले.

'नीली! शहाणी असशील तर या पावलीं घरीं जाशील—'

'एकटीच!'

'हो, एकटीच!'

'अन् अशोक? माझा अशोक?'

'तो मेला असं समज!'

कानावर हात ठेवून नीली चवताळल्या स्वरांत म्हणाली,

'पपा, पपा ! तुम्ही हे काय बोलतां ? मरण त्यांना येणार, तुम्हाला येणार, मलाहि येणार ! फार काय आजच्या नास्तिक जगांत देवदेखील मरणाची घटिका टाकून बसला आहे. पण त्याना असल्या अभद्र वाचेन मारण्यांत तुम्हाला कसली ही राक्षसी 'भूक ! लागली ? जाणून बुजून माझं सौभाग्य का हिरावून घेतां ? '

'मूर्ख आहेस ! तुला व्यवहारज्ञान असत, पैशाची किमत कळती तर असल्या उधळ्या नवऱ्याचा तूंदेखील खून केला असतास--जा, मुकाट्यानं घरीं जा !

' अस्स ! '–नीली निर्धारान उठून उभी राहिली. डोळे वटारले व बेमुर्वतखोरपणे ती आपल्या वडिलांस म्हणाली,

' तुम्हाला पैशापुढ प्रेम दिसत नाही, पैशापुढे पोटची पोर दिसत नाही, पैशासाठीं तुम्ही माझा संसार जाळावयास तयार झालां. तुम्ही जितके निर्धारी आहांत, तितकीच मीहि निर्धारी आहे. साफ सांगते मी घरी जाणार नाहीं म्हणून—'

' तूं इतकी निर्लज्ज निघशलि ही मला कल्पना नव्हती. घरीं आली नाहीस तर—'

' काय कराल ? जीव घ्याल ? मग घ्या येथेच्च कीं ! '

' तुझा नाही-तुझ्या 'मा'चा ! '

' 'मा'चा ! 'मा'चा !—' येवढेच शब्द उच्चारून क्षणभरहिं न थांबतां नीली मोटारींत बसली व घराकडे मोटार भरवेगांत सोडली.

'मा ! मा ! ' करीत तिचा अतरात्मा मोटारपुढे धांवत होता. मातेच्या प्रेमापुढे जगाची कसलीही ' भूक ' फोल आहे.

## पैसा, प्रेम व पराक्रम : : २०

टॅक्सीमधून प्रकाशकडे जातांना अशोकच्या बेभान मनांत एकच विचार थैमान घालीत होता. उद्यां काय होणार ?' 'उद्यां !' दोनच अक्षरी शब्द ! पण त्यांत किती अमर्याद, किती अनत आशा समावल्या आहेत ! विश्व व्यापून परमेश्वर दशांगुलांनीं उरला असेल, पण ही 'उद्यां'-ची आशा अनंत अंगुलांनी उरली ! उद्यांमागे आशा, आशेमागे भूक, भूकेमागे जग, अव्याहतपणे चालले ! कुठे चालले ? कां चालले ? या अखंड गतिमान चक्राला, या जीवनकलहाला पूर्ण विराम कधीच मिळणार नाहीं कां ?'

'प्रकाश ! प्रकाश !!' प्रकाशला पहातांच अशोक अल्लड बालकाप्रमाणे ओरडूं लागला.

सर्वत्र अंधार पसरला ! प्रकाशच्या झोंपडीजवळ एक धुमणी पेटली होती. शेजारीं एका स्वच्छ प्रावरणावर कोणी तरी निजलें होते. प्रकाश त्या व्यक्तीची गारठ्यान गोठलेली शिथिल इंद्रिये शेकून त्यांना चेतना देण्याचा प्रयत्न करी !

अशोकची आरोळी ऐकतांच प्रकाश दचकून पुढें आला. केशकलाप विस्कटलेला, भव्य भालप्रदेशावर रक्ताचे नी घामाचे बिंदू टपटपताहेत, जीवाचा घाबरटपणा डोळ्यांच्या फिरकींतून व ओठांच्या भय

भीत कंपांतून प्रकट होत आहे, हृदयाची रहस्ये प्रकाशच्या कानांत शिरण्यासाठीं धडधडत्या उसळीने वरवर येताहेत व त्यामुळे सदाकदा ताठ रहाणारा कंठमणि भीतीचे घुटके पलापलाला घेत आहे,—अशोकचें हे हृदयभेदी दृश्य पहातांच प्रकाश चमकला! अशोकनें अणुमात्र अवमान न करतां बालकाप्रमाणे प्रकाशच्या गळीं पडून निराशेचा प्रदीर्घ निःश्वास सोडला.

'प्रकाश! तूं माझं भविष्य अचूक ओळखलं! मी श्रीमंतांच्या आहारीं जाऊन तुझं, माझं स्वातंत्र्य, ध्येय, तत्त्वनिष्ठा, महत्त्वाकांक्षा, बुद्धि गमावून बसलो. माझा ललाटलेख तू अचूक वाचलास- तूं महान् भविष्यवादी आहेस! तीच दृष्टी पुन्हां लावून मला सांग- माझ्या ललाटीं उद्यां कोणती दुर्दैवी दशा उगवणार?'

'उद्यां? नी दुर्दैव? अशोक! उद्यांची मोहिनी आशावंतासाठीं असते. खुळ्या जगासाठी असते.! कर्मवंतांना सर्व काळ सारखाच असतो. उद्यांच्या अदृष्टांत काय आहे हे पहाण्यापेक्षां आजच्या या उजळत्या भाग्यांत काय आहे हे पहा तर खरं! अशोक–तुझी मा! तुझी आई–'

'मा? माझी मा? माझी आई? कुठं आहे? प्रकाश मा कुठं आहे?' अस्मानांतील अनंत ताराचंद्रांचे तेज एकसमयावच्छेदे करून अशोकच्या नेत्रांतून प्रकट झाले. मुखावर सानंद संभ्रमाने अपूर्व अशी प्रफुल्लता आली. 'मा! मा!!' अशोक मातृप्रेमानं जवळ आला! शेकोटीजवळ नजर टाकली. गिरणींत तयार झालेल्या रंगीत कापसाचें पहिलें पातळ त्या मूर्तीच्या अंगावर टाकले होते. पण त्याचें काय तिला! तिचे डोळे खोल गेलेले दिसले. अग्नीच्या होमकुंडांतून उठणाऱ्या तेजोवलयामुळें तिच्या मुखावर प्रकाश प्रतिबिंबित होई! अन् त्यामुळे मुखावरील अघोर चिंता, दारुण निराशा, वृद्धत्वाचीं वलयें सुरकुत्यांच्या दाट जाळ्यामधून डोकावीत होतीं. 'मा'च्या चेहेऱ्यांत कल्पनातीत फरक झाला होता! काळ कितीही निर्घृण असला तरी तो स्मृतीला मारूं शकत नाहीं. स्मृती कितीहि धुंद झाली तरी ती प्रेमी जनांचे चेहेरे पुसूं शकत नाहीं. वीस वर्षांपूर्वीचे ते करारी, गंभीर, हास्योत्फुल्ल दिसणारे 'मा'चे मुख-

मंडळ अशोकला आज दिसेना! पण या विद्रूप चित्रामधूनहि त्यास ही आपली 'मा' आहे, जननी आहे, याची मनोमय साक्ष पटली. हृदयांतून ज्वालामुखीच्या प्रज्वलीत ज्योतीप्रमाणं मातृप्रेम वरवर उसळत होतं! तिची दारुण अवस्था पाहून, अशोकला रडूंच कोसळलं! पुत्र जिवंत असतांना मातेला ही अवदशा कां यावी? ती अशी अपांग कां व्हावी? अशी निर्बल, हतप्रभ, हतबुद्ध, हतभागी–हैराण कां व्हावी? अशोकला उत्तर देतां येईना! उलट तो सुन्न झाला.

'मा! मा!' यापेक्षां त्याच्या मुखांतून कांहींच शब्द बाहेर पडेनात! हरिणीचे पाडस जितक्या लगबगीने, जितक्या औत्सुक्यानं हरिणीच्या कुशीत तोंड दडवते तितक्याच वात्सल्याने अशोकनं आपलं मस्तक मातेच्या वक्षःस्थळी ठेवलं! आईच्या प्रेमाच्या छायेत, जगांतील सारीं सुखं कःपदार्थ आहेत.

'मा! तूं मला ओळखलंस! मग मला तूं आशिर्वाद कां देत नाहींस?...'

पण 'मा'च्या नेत्रांतून अश्रूंच्या झरझर धारा झरत होत्या. 'मा! तूं रडतेस? आनंदानं कीं दुःखानं? मी जवळ आहे, तुझा 'प्रमोद' तुझ्या जवळ आहे, मी जवळ असता तूं का रडावंस? उभं आयुष्य रडण्यांत गेलं, आजहि तूं रडावं—कां? तुझी भेट झाली. तूं हांस, एकदां तरी हांस!...' अन् खरोखरीच 'मा'ने एक मंदस्मित केलं! त्या स्मितानं अशोकला साऱ्या दुःखांचा विसर पडला व 'स्वर्ग स्वर्ग' म्हणतात तो हा तर नसेल ना? मा जिवापाड धडपड करून अशोकला आशीर्वाद देण्यासाठीं, पोटाजवळ धरून कुरवाळण्यासाठीं तळमळत होती. पण–पण–!

'हे काय मा?' अशोकनं चाचरत विचारणा केली. 'मा'चे दोन्हीं हात आपल्या हाती धरले, पण किती दुःखाची गोष्ट! किती खेदजनक प्रकार! किती हृदयभेदी ती अवस्था! 'मा'ला हातच नव्हते. तेव्हां ती आशिर्वाद तरी कोणत्या हातांनीं देणार? कोणत्या

हातांनीं ती आपल्या बाळास कुरवाळणार? अशोकला तें दृश्य पहावेना, सहावेना, तो ढसढसां रडूं लागला.

*  *  *

रडतां रडतां त्याच्या डोळयावरचीं दार हळूं हळू बंद झालीं. आयुष्याच्या खऱ्या सुख शांतीची शर्वरी आज आपण उपभोगित आहोत असं त्याला वाटलं! आईच्या कुशीत मिळणाऱ्या मायेला जगांत कसली उपमा आहे? ज्यांना आई नाही, ज्यांना ही माया मिळत नाहीं, ते त्रिभुवनाचे स्वामी असले तरी कपाळकरंटे आहेत. साऱ्या विश्वाचे वैभव देऊनहि मातेची ममता मिळणार नाही. त्या मातेच्या पर्यंकावर पडून अशोक असंख्य सुखस्वप्ने, असंख्य सुखचित्रे पहात होता. हा आनंद, ही मायेची मोहिनी-रात्र, अगदी अखेरची आहे. पुन्हा आयुष्यांत आपणास असले सुख मिळणार नाही, हे तो जाणून होता; पण भविष्याची कदर करून हातचं सुख दवडावयास तो राजी नव्हता. आईच्या हृदयाचे ठोके त्या सुख-स्वप्नाच्या निद्रातंद्रीत त्यास अस्पष्टपणे ऐकू येत होते. जगूं त्या प्रत्येक ठोक्यांतून त्यास तिचे, त्याचे जीवन रहस्य कळत होते, नी म्हणून तो मधून मधून दचकत होता! किती विचित्र घटनापूर्ण ते जीवन!

*  *  *

अशोक पांच वर्षांचा असेल नसेल! पोटासाठी त्याचे वडील कोकणांतून मुंबईस नोकरी शोधण्यासाठी एका वस्त्रानिशीं गेले. आज नोकरी मिळेल, उद्या नोकरी मिळेल, मग आपण मुंबईस जाऊं, सुखानं संसार करूं, मुलाला खूपखूप शिकवूं, मुलगा मोठा होईल, नी आपल्या गोजिरवाण्या हातांनीं आपले अश्रूं पुसून काढील, अपांग जीवाचे पांग फेडील या आशेवर आईने किती मोठमोठाले मनोरे उभारले. पण त्या सर्व आशा अचानक फोल ठरल्या! पंधरा दिवसांत वडील प्लेगानं वारल्याची वाईट वार्ता आली. आई धाय मोकलून रडूं लागली. शेजार पाजारचे लोक जमा झाले. गोड गोड बोलून त्यांनीं आईच्या कपाळाचं कुंकू पुसून टाकलं! तिच्या कोऱ्या कपाळाकडे पाहून 'आई? तूं कुंकू का लावीत नाहींस ग?' असा अशोकने वारंवार प्रश्न करावा! अन्

त्याचं समर्पक उत्तर देतां न आल्यानं तिनं मिळमिळ रडावं–पण या रडण्याचा प्रत्यक्ष व्यवहारात काय फायदा ? प्रेमी जीवासाठीं पोटभर रडल्यानं पोट थोडचं भरणार? त्या पोटासाठी, मुलासाठी, अशोकला ओटी-पोटी बांधून आइ भोळया आशेनं मुंबईस आली. मुंबई सर्वांनाच कां धार्जिणी होते? जवळ पैसा नाहीं, घर नाहीं दार नाहीं, आसरा नाहीं, आश्रय नाही, ओळखीच माणूस नाही! फूटपाथवर मुलाला घेऊन अनेक वेळां आर्तस्वरानं ' भूक ! भूक !! ' म्हणून आल्या गेल्यापुढं तिन याचना करावी ! त्या दुर्धर आपत्तींतहि तिनं वर केलं! काबाडकष्ट करून अशोकला शाळेत घातलं! पण पहिल्याच दिवशी तिची व अशोकची फारकत झाली ! अफाट मुंबईत अशोक रस्ता चुकला नी चुकलेल्या मुलाचा शोध करीत ती चुकून भरधांव जाणाऱ्या मोटारीखाली सांपडली. आसन्नमरण स्थितींत तिला दवाखान्यांत नेण्यांत आलं !

तीन दिवस उपाशीपोटी अन्नान्न करीत अशोक रस्तोरस्ती फिरला भटकत भटकत नीलीच्या बंगल्यांत आला ! अन् तेथून 'तिच्या वडिलांच्या हंटरचे फटके' खाऊन बाहेर पडला. प्रकाश परमेश्वरासारखा अचानक त्याच्या पाठीशीं उभा राहिला ! प्रेमान पोटाशी धरल त्याने ! पोटच्या पोराप्रमाणं वाढवल ! प्रकाश अशोकच्या गांवचा, अशोकच्या आईचा जवळचा नातेवाईक ! त्याने तिचा खूप शोध केला ! पण व्यर्थ ! अखेर आपली आई गेली. या दुःखांतच अशोकन जीवन कठलं.

* * *

अलिअलिकडे तिला अशोकचा पत्ता लागला होता. कुठल्यातरी गिरणींत अशोक बडा अधिकारी असल्याचं तिला कळलं ! तिनं साऱ्या गिरण्या पालथ्या घातल्या ! सर्वांजवळ तपास केला. पण तिच्या 'प्रमोद'चं नामांतर 'अशोक'मध्ये झाल हे तिला कोठून कळणार? आशा वेडी असते ! त्या आशेवर ती गिरणींत रोजमजुरीवर काम करूं लागली. प्रत्येकाच्या मुखांतून आपल्या मुलाचं वर्णण तिला कळे ! अशोकची जन्मखूण–त्याच्या हातांची अकरा बोटे–तिला पहातांच किती आनंद झाला ! 'प्रमोद ! प्रमोद !!' ती नाचू लागली व लोक मात्र तिला

हिणवून हंसूं लागले. त्या आनंदाच्या भरांत ती बंगल्यावर आली–पण कुणीतरी वेडपट भिकारीण समजून तिला सुधा–रजनीनं हुसकून लावलं! पुत्रप्रेमानं ती पुन्हां आली असती, पण लगेच दुसऱ्या दिवशी काम करतांना भरधांव चालणाऱ्या गिरणीच्या पट्यांत सापडून तिचे हात जायबंदी झाले. डॉक्टरनी ते छाटून टाकले. अरेरे! या यांत्रिक युगाच्या यांत्रिक जीवनांत आपली कर्तृत्वशाली माता सांपडावी अन् तिचे हातच तुटावे! त्यापेक्षां आपण सारे आयुष्य खेड्यांत, शेतात कां काढिले नाही? आपला शोध करीत ती तिथं आली असती अन् मग डोळे भरून तिनं आपणास बघितलं असतं, प्रेमानं कुरवाळल असतं, ममतेनं आशीर्वाद दिला असतां! खरंच मी या यांत्रिक घरघरींत कां पडलो.......' या विचाराने अशोक दचकला, जागा झाला.

* * *

नुकतेच उजाडले होते. अशोक सभोवताल पाहूं लागला; तो प्रकाश नी नीली समोर बसली होती! 'तूं कां आलीस?' म्हणून तिला तो प्रश्न करणार तो पोलिसांच्या तुकडीसह बाळासाहेब तेथे आले! अशोकला भविष्यकाल स्पष्टतर दिसला. त्यानें कडकडून आईला आलिंगन दिले! पुन्हां ते सुख मिळणार नाही म्हणून पुनश्च तो कडकडून भेटला व अचल धैर्यानं उठून उभा राहिला.

नीलीलाहि सर्व कळलं! वडिलांच्या धाकान हुकूमानं ती येथे आली. आतां काय होणार याची तिला जाणीव होती. अशोक उठून उभा राहतांच–तीहि तितक्याच चपलतेने उठली. एकवार पपाकडे, एकवार पोलिसांकडे दृष्टिक्षेप करून तिने अशोकच्या गळयाला जोराने मिठी मारली.

'आपलं आतां कस होणार?' अशा आर्तस्वरानं ती रडूं लागली, बाळासाहेब पुढें आले व नीलीला उद्देशून म्हणाले, 'नीली! नवऱ्या-बद्दल तुला प्रेम असेल, तुला तो हवा असेल, अन् त्याला तूं हवी असशील तर मी सांगतों त्याप्रमाण आत्तांच्या आत्तां झालं पाहिजे.'

'काय झालं पाहिजे? पपा–सांगा–मी काय करूं?'

'अशोकच्या चिथावणीनें गिरणींतील सर्व मजूरांनी संप पुकारला!

त्यांच्या सहानुभूतीसाठी शहरांतील सर्व गिरण्या बंद पडताहेत. यापुढं क्षणभर जगणं मला मुष्किल होईल! आत्तांच्या आत्तां गिरणींत जाऊन अशोकनं संप मिटवला तर बरं–नाहीपेक्षां मी त्याला मोकळा ठेवणार नाही... '

' पण मी तशी कधीच भीड घालणार नाहीं किंवा नीलीही लाचार होणार नाही. ' अशोक चवताळून बोलू लागला. त्याच्या नेत्रांतून करारी बाणा दृग्गोचर होई. नीलीने त्या दृष्टींत आपली दृष्टि भिडवली मात्र! तिच्याहि अगांत अपूर्व करारीपणा आला.

' नीली–मी काय म्हणतो ? '

' त्याचं उत्तर मी केव्हांच दिलं! मला तुमची भीक नको! जळत्या घराच दानपत्र देण्याच तुमच दातृत्व नको! ताटांतील उष्टावळीन गरिबांचं उष्टावण करू पहाणारे तुम्ही, तुमचा उदारपणा मला नकोय्! मी मजूरांना संप करावयास सांगितला नाहीं! संप करण्याचा त्यांचा हक्क जन्मसिद्ध आहे. तो मी हिरावून घेऊं शकत नाहीं! माझ्या एकेरी जीवाच्या सुखलालसेसाठीं सहस्र जीवांची दैना नी कोडमारा करण्याची माझी इच्छा नाही. '

' एकूण मला जगांतून उठून लावण्याचा तूं चंगच बांधलेला दिसतो! '

' पपा! तुम्हाला ते नी जगांतून उठून लावणार? पैसा, सत्ता नी माणुसकी सर्व कांहीं तुमच्याजवळ अलोट आहे, तुम्ही सामर्थ्यवान् आहांत! तुम्हांला काय यांनीं संभाळावयाचं? फिरून संपाशी यांचा संबंध तरी काय ? '

' माझा संबंध? नीली तुला माहित नाहीं, मी बोनस देण्याचं जाहीर करतांच मुंबईच्या शंभर गिरणी मालकांच्या हृदयांत धडकी भरली! आपले मजूरहि बोनस मागतील, सार्वत्रिक संप पुकारून तो आपणास देण्यास भाग पाडतील, अन् एकदां बोनस दिला, कीं सालोसाल चांदी-सोन्याच्या ताटामधील मलिदा मजुरांना मिळेल! या स्वार्थी भीतीनं प्रत्येकानं तुझ्या पपांना पांचपांच दहादहा हजार रुपये चारून ही परंपराच मूळांत घाव घालून मोडून टाकावयास भाग पाडलं! लांचेला

लांचावलेले हे तुझे पपा ! पैशाच्या लोभानं हजारो गरीबाच्या ओठावरचा घांस हिरावून घेण्यास कचरले नाहींत ! आतां मजूरांनी संप केला, इतरहि त्यांत सामील होतील अन् मग सहजासहजीं खिशांत पडलेली दोनचार लाखांची धनदौलत ज्याची त्याला परत करावी लागेल ! असच ना ? मला या गोष्टी माहित नाहीं असं कां वाटतं तुम्हाला ? जीव गेला तरी मी मजूरांना माघार घ्यावयास सांगणार नाहीं... '

' ठीक आहे ! नीली ! तुला भेटायच तितकं त्याला कडकडून भेट ! इतःपर तुमची भेट होणार नाहीं ! हा बदमाष आहे ! तुला माहित आहे हा कोण आहे तो ? फरारी कम्युनिस्ट, क्रांतिकारक, कटवाला प्रमोद तो हाच ! अमेरिकेंतून ज्याला हुसकून लावलं, सरकारने पकडून देण्यासाठीं ज्याला दहा हजाराच बक्षीस ठेवल तोच हा फरारी-याला मी पोलिसाच्या ताब्यांत देणार ! कां ? वाईट वाटण्याऐवजीं तू अशी मिस्किल पणे हंसतेस ? '

पपा ! तुम्ही मला दुधखुळी पोरच समजतां कां अजून ! हे कोण आहेत ते तुम्ही कशाला सांगायला हव ! ते कम्युनिस्ट आहेत हे मला माहित नाही असं का तुम्हांला वाटतं ? किंबहुना ते तसे आहेत म्हणूनच मी त्यांच्याशीं लग्न लावलं ! '

' कार्टे ! हें तूं मला आज सांगतेस ? असला नवरा करतांना–'

' पपा ! असला जांवई करतांना तुम्ही झोपला नव्हता ना ? क्रांतिकारक होणं हा गुन्हा थोडाच आहे ? गरिबाना गिळकृत करून श्रीमंत होणं जर पाप नाहीं, जर गुन्हा नाहीं तर क्रांतिकारक होणं हा गुन्हा कां व्हावा, हें पाप कां ठरावं ? तुमच्या श्रीमंतीचा तुम्हाला अभिमान वाटत नसेल, इतका हे क्रांतिकारक आहेत, कटवाले आहेत, बंडखोर आहेत म्हणून मला अभिमान वाटतो .....'

* * *

तिनं अशोकच्या खांद्यावर एक हात ठेवला व दुसरा हात आपल्या कमरेवर एकाद्या कलावंताच्या मॉडेलची कुन्देबाज पोज घेऊन उभारला व ती स्तिमित दृष्टीनं आपल्या वडिलांकडे पाहू लागली ! तिचे निळे डोळे

विस्फारीत होऊन त्यांतील बुबुळाच्या कडांवरून स्वाभिमानाचं अलोट तेज ओसंडत होतं! उभ्या आयुष्यांत नीली इतकी सुंदर कधी दिसली नसेल! स्वाभिमानाचा अलंकार अनन चद्राच्या प्रभेलाहि झाकून टाकतो. तुळतुळीत सौंदर्यानं तकतकणारे तिचे अनाच्छादित बाहुदंड, स्वाभिमानाच्या तरल लहरींने रोमांचित होऊन स्फुरण पावत! क्षणाक्षणाला लय व लचके घेणारी तिची गौर ग्रीवा अभिमानानं निश्चल झाली! तशांत तिच्या ठिकाणीं दोन प्रेमी जोवाचा एकरूप स्फुलिंग नुकताच विकसू लागल्यानं तिचा गौरवर्ण अधिकच सतेज दिसे. त्यावर निळ्या रक्तवाहिन्या स्पष्टतर उमटल्या असल्याने काळीनिळी झांक तिच्या देहावर मधून मधून फांकली होती. डोळ्याखालच्या कडा काळसर झाल्या तरी गालांओठावर एक प्रकारची अजब जादू निर्माण झाली. साध्यासुध्या प्रसंगाने भयभीत होऊन थरथरणारे तिचे अधर धैर्यशाली रसवन्तीची वृष्टी करण्यास सज्ज झाले. तिचा गोंडस करतल अशोकच्या मानेभोवती रुळतांना—'हे माझे आहेत, ही पराक्रमी मूर्ती माझी आहे, मी त्यांची आहे,' असं तर्जनी वर करून अभिमानानं सर्वांना सांगत असावी असा भास होई.

पण याहीपेक्षां अशोकच सौंदर्य अपूर्व होत! त्याचा पराक्रम नीलीप्रमाण देहसौंदर्यातूनच चमकत नव्हता. तर आसमंतांतील प्रत्येक परमाणूत त्याचे प्रतिबिंब उमटले होते. या अद्वैत एकरूप सौंदर्याकडे पाहून बाळासाहेब अधिक रागावले.

* * *

'ठीक आहे! माझा नाइलाज आहे!' असा गुर्मीचा आढ्यतेखोर स्वर काढून त्यांनीं पोलिसांना खुणावले. क्षणार्धात अशोकच्या हातांत हातकड्या पडल्या! फरारी बंडखोराला आश्रय दिल्याबद्दल प्रकाशलाही पकडण्यांत आले!

हातकड्यांच्या खणखणाट होतांच नीलीचा अधीर जीव मुरपला! आपल्या जीवनांतील भारीव भवताल, वेधक वाटणारें वैभव कोणी तरी हिरावून घेत आहे, देखतां डोळ्या लुटून नेत आहे असं तिला वाटलं! इतका वेळ नेत्रांत तरळणारे कौतुकाश्रु कुठल्या कुठं दडून तिथं कारु-

ण्याची गंगा पाझरूं लागली! कडकडून तिनं अशोकला आलिंगन दिलं! एकांतामध्येहि अशोकला इतकं दृढालिंगन तिनं कधीं दिले नसेल! दोघेहि मुके होते. पण या मूक भावात अनत निःशब्द हाका, अनंत निःशब्द भाव, संदेश संवेदना-ती परस्परांस पटापट सांगत होती. अशोकनं मन घट्ट करून दीर्घ निश्वास सोडला. नीलीला घट्ट हृदयाशी धरले व हळूंच म्हणाला,

'नीली! ससार ही अजब समरभूमी आहे! मरण मानवकोष्टीचा मूल्यवान् अलंकार आहे. जीवनाच्या झटापटींत मी श्रीमंतांच्या प्रक्षुब्ध 'भुके'ला बळी पडलो म्हणून तू रडशील तर, तर-पण नाहीं, तूं वीरस्त्री आहेस, चतुर आहेस, असामान्य बुद्धीची आहेस—असल्या मंगलप्रसगीं तूं खास हसशील! आपलं जीवन असामान्य झालं पाहिजे ना? आपण रडत रडत जन्माला आलो त्यावेळीं आपल्या भोवतालची गोतावळ आनंदान हंसत होती. आज आपण हंसत हंसत मरू. त्यावेळीं तीच गोतावळ रडूं लागेल! ही सामान्य भावना तूं बाळगूं नकोस! जग अनंत आहे, काळ अनंत आहे, कार्य अनंत, आहे, पण जीवन मात्र क्षणिक आहे, त्याचा विनियोग मिळमिळ रडण्यांत कां तू करणार?' पाण्यानं डबडबलेले नीलीचे डोळे अशोकने पुसले. इतका वेळ धीरान तिला आधार देणारा त्याचा हात कंपित झाला. नीलीला ते कळले व अनावर झालेला हुदका दाबून तिनं अशोकच्या खांद्यावर मान टाकली.

'नीली! आजवर तुला एकच 'मा' होती. पण तूं किती भाग्यशाली आहेस! देवान तुला यापुढ दोन 'मा' दिल्या आहेत. दोघींना संभाळ! दोघींना आनंदित ठेव ..'

इतकं बोलून अशोक पोलिसांच्या पकडींत निघून गेला.

* * *

तें हिरवेगार शेत, त्यांतील हिरवेगार सृष्टिसौंदर्य, गगनाला गवसणी घालणारे ते पर्वत सर्व कांही निमिषांत निश्चल झाले. अशोकचा कुत्रा नीलीच्या पदराखालीं डोके खुपसून तिला पटापट चाटू लागला व दूर-

वर दिसणाऱ्या पोलिसांकडे पाहून जोरजोरानें भुंकू लागला. नीलीने त्याला हृदयाशीं घट्ट धरले.

'अशोक पुन्हा येईल का?' वारवार ती त्यास प्रश्न विचारी! पण हृदयाशीं, विव्हल सूर काढून हा इमानी कुत्रा नीलीला अधिकच दुःखी कष्टी करी.

*　　*　　*

अशोकचा खटला संपला. अनेक आरोपांवरून त्यास नऊ वर्षांची सजा मिळाली. प्रकाशला सहा वर्षांचा बंदीवास मिळाला.

*　　*　　*

फरारी बंडखोरास, प्रत्यक्ष आपल्या जांवयास पकडून दिल्याबद्दल लवकरच सरकारकडून बाळासाहेब कुबेरांस 'नाईटहूड' मिळाले.

## गरीब बिचारी नीली : : २१

साऱ्या सचेतन सृष्टीला प्रेताची अवकळा आली होती. अन् अंधार या सर्वांवरून रांगत होता. कदाचित् नीलीच्या भकास मनाची ही पडछाया असावी! तिला घरदार, जगजीव, स्वतःचे व विश्वाचे हृदय ओके ओके दिसूं लागलं. कशांत मन रमेना, कशांत जीव गमेना! मोठ्या आशेनं फुलवलेला संसार करपून गेला. तिच्या कोवळ्या बटमोगऱ्याची शोभा आधणाचं उकळतं पाणी शिंपून कोणी तरी जाळून टाकली! त्यामुळे नीलीचा सदाफुलो चेहरा सुकून गेला, जीवनाची नवलाई नष्ट झाली! शून्य विश्वांत ती शून्यपणे पहात होती.

'सुखाचा संसार संपला!' या उदास विचाराची छाया तिच्या मुखावर पसरली होती. बंगल्याच्या मेघडंबरीत उभी राहून ती काय पहात होती हे तिचे तिलाच कळेना! इतक्यांत सभोवतालच्या गिरणीचे भोंगे झाले. किती कर्कश आवाज तो! तिनं कानावर हात ठेवले. गिरणीमधून हजारो मजूर बाहेर धांवत आले. त्यांचा लक्तरी पोषाख त्यांचे जन्म-दारिद्र्य नी दैन्य दाखवीत होता. तरी मुखावरील उत्कंठेत आशांचं अफाट साम्राज्य पसरलं होतं. परस्परांना ढकलून प्रत्येकजण बाहेर पडण्याचा प्रयत्न करी. गरिबांचा हा नित्याचा जीवनकलह होता. असंख्य जीवांच्या 'भुके'ची न संपणारी ही धडपड होती. जगाची ही हाकाटी कशासाठीं,

कोणासाठीं चालली असते ? ' घरासाठीं—'

' बाबू चाल घरीं-'

' गेगू चाल घरीं-'

'रेणू चाल घरी-'

घराशिवाय कोणी कांहींच बोलत नव्हता. प्रत्येक जणास घरीं जाण्याची अलोट उत्कंठा लागली होती. घर ! दोनच अक्षरीं शब्द ! पण त्यांत सुखाचं अफाट ब्रह्मांड भरलं आहे ! घर अनेक आशाच प्रसूतिस्थान आहे. घर संसाराच सूत्र आहे. ' दोन पैसे मजुरी मिळणाऱ्या मजुराला घर आहे, दिवसभर कलमबहादुरी करणाऱ्या कारकुनाला घर आहे, अहोरात्र विलासांत लोळणाऱ्या श्रीमताला घर आहे-अन मला-माझं घर आहे, कुठं आहे ? घर-? ' नीलीच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. दु:खाच्या तीव्र वेदनांनी तिचं हृदय ओथंबून आल ! ती दडदड धांवत आईच्या पलंगाजवळ गेली. तिच्या गळ्यांस मिठी मारून रडूं लागली,

' मा ! घर- माझ घर- मा ! मला घर आहे का ? कुठं आहे ? माझं घर केव्हांच जळालं ! लग्नांत पपांनी डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद दिला, त्यावेळी त्यांच्या हातामधून प्रेम झरत होतं कीं भस्मासुराची आग ओसरत होती ? मा ! हे कसं झालं ? मी कुणाच्या ससारांस माती कालवली म्हणून आज माझा ससार मातीमोल झाला ? मा—सांग ना ! '

* * *

नीलीच्या अखंड अश्रूंना ' मा ' किती वेळ थोपवणार ? माया थिटी पडत नाहीं पण सांत्वनाचे शब्द थिटे पडतात. शब्दसृष्टीचें ईश्वर सुखाची वर्णने हजार शब्दानी करतात, पण दु:खांच्या कला, हा ! ' हन्त, हन्त ' अशा विकल नी विव्हल सूत्रांत दाखवतात. दु:खासाठीं जगांत सांत्वनाचे शब्द नाहींत. ' मा ' नी नुसता दीर्घ सुस्कारा सोडला. एक दु:खी जीव यापेक्षां कसलें समाधान देणार ?

* * *

' नी ! दिवा लाव बाळ ! अंधार पडला ना ! ' ' मा ' पडल्या

पडल्या कण्हत नीलीला सांगूं लागल्या ! त्यांचा जीव सारखा तगमग करीत होता. शेजारीच नीली मान मोडून पडली होती.

'दिवा ! कशाला दिवा हवा ? खोलीच्या दिव्यानें संसाराचा अंधार थोडाच संपेल ?' असं ती मनाशी म्हणत होती. काळाच्या उदरांत दडलेली 'काल'चीं गोड चित्रें डोळे मिटून पहात होती. मुलें दिवा लागताच 'दिव्या ! दिव्या ! दीपत्काल' ! म्हणून आनंदानें नाचत होतीं. याच वेळीं नीली अशोकची उत्कंठेने मार्गप्रतीक्षा करी ! जीन्यांत बुटाचा आवाज झाला म्हणजे दडदड धांवत ती अशोकला सामोरी जाई-पण आज ? हाय ! हाय ! सर्वत्र शून्यता ! अशोक नाहीं, आनद, नाही, प्रकाश नाहीं, खेद नाहीं, हर्ष नाही, सुख नाहीं, दुःख नाहीं ! संसार नाहीं, घर नाहीं ! फक्त अधार ! उंच उंच मनोऱ्यांच्या ढिगाऱ्याखालीं स्वस्थ पडणे हेच जीवन व तेच घर—'

*     *     *

'मा'नी नीलीच्या गालावरून थंड हात फिरवला. नीली दचकून उठली !

'मा ! तुझा हात किती गार पडला ग ! मा—नीलीने चटकन् दिवा लावला ! 'मा'च्या डोळयांतून सारखे अश्रू गळत होते. दिव्याच्या प्रकाशांत ते चमकत होते. त्याकडे पाहून नीली कावऱ्या बावऱ्या सुरांत म्हणाली, 'मा ! तूं रडतेस ! कां रडतेस ? जन्मभर रडलीस, आजहि रडतेस ? मा ! रडूं नकोस ना ! तुला श्रम सहन होत नाहींत. तूं स्वस्थ पडून रहा ना !'

'नीली ! तुझं कसं होईल ?' 'मा'चा खोल आवाज ऐकून नीली जवळ अगदीं जवळ आली ! 'मा'चे डोळे थिजून गेले होते. त्यांतील सर्व आशा थिजून गेल्या-पण त्यांना अंकूर फुटू शकत नव्हते, हातपाय गार पडले. नीलीनं आईच्या मुखाजवळ मुख नेलं !

'मा ! तुला काय होतं ? तूं असं काय करतेस ?—'

'कांहीं नाहीं ! नीली तुझं कसं होणार ? असं म्हणून त्या रडूं लागल्या. कंठांतून शब्द फुटेना ! हृदयांतून दुःख पाझरेना ! पिंजऱ्यांतील

पक्षाप्रमाणे आंतल्या आंत जीव फडफडत होता. मोठ्या कष्टानं त्यांनीं हात वर उचलले! व नीलीच्या गालाला लावले. 'नीली' येवढाच घर-घरत्या सुराचा शब्द उचकीसारखा उच्चारला!

—'मा! मा!' नीलीन किंकाळी फोडली. क्षणांत हात चाचपड, क्षणांत पाय चाचपड, क्षणात हृदयाशी हात ने, पण त्याचा काय उपयोग? 'मा'च्या कोणत्याच गात्रांत गती नव्हती 'मा' चा अखंड दुःखाचा संसार संपला! 'मा' म्हणून नीली धाडकन् खालीं पडली!

* * *

आई गेली, माया गेली! माहेर मेलं! मनाचा मोहोर गेला! नीलीच्या एकुलत्या एक आशेचा आधार गेला. नीली सर्वस्वी निराधार झाली. दिवस गेले, रात्र गेली, काल अखंडपणे 'पुढे पुढे' चालला. पण कुठे? कोण सांगू शकेल? काळाबरोबर कोण धावू शकेल?

नीली निराशेन जगत होती. जगणं भाग होत तिला! सृष्टीच्या विकसनशक्तीची ती जननी होती.

अशोकला तुरुगांत जाऊन चार महिने झाले. नऊ वर्षे अद्यापि जाव-याची होती. किती दीर्घकाल हा! तोपर्यंत आपण जगू कां? अशोकला बंधमुक्त झालेला डोळ्यांनी पाहू काय?

अनेक दुःखानी जीव मुरपून गेला तरी भविष्याच्या आशेची 'भूक' जीवाला सोडीत नाहीं. केवळ त्या आशेवर नीली जगत होती.

पैशाच्या धुदीत बाळासाहेबांना मुलीच्या संसाराची राखरांगोळी झाल्याबद्दल कांहींच वाटले नाहीं. उलट पूर्वसंकेताप्रमाणें त्यांनीं अशोकचे सारे शोध, त्या शोधावरील सविस्तरपणें लिहिलेले ग्रंथ, त्या ग्रंथाची हस्त-लिखिते परदेशी भांडवलवाल्यांना सर्वाधिकार देऊन विकून टाकली. गिरणीत जिथे तिथे त्यांना साम्यवादाचा वास आला तिथें तिथे त्यांनीं प्रहार करून समाजसत्तावादाची सर्व पाळंमूळं खणून काढलीं. त्यामुळें गिरणीमधील कामगार भयकर बिथरले. संपावर संप सुरू झाले. ही

आपत्ती टाळण्यासाठीं सर्व गिरण्या एका परदेशी भांडवलवाल्यास चालवण्यासाठीं पंचवीस वर्षांचे करारानें देऊन टाकल्या. त्याबद्दल दरसाल कांही लाख रुपये त्यांनीं मिळविण्याची विनाआयास सोय करून ठेवली. पत्नीच्या निधनामुळे तिचा तीन लाखाचा विमा अलगद पदरांत पडला. लक्ष्मीला पापी लोकांचा सहवास अधिक आवडतो असे म्हणतात ते कांही खोटे नाहीं.

इतकी सर्व व्यवस्था होतांच त्यांचे मन निराळयांच गोष्टीकडे व्यग्र झाले. दोन चार कायदेपंडितांना बोलवून सुधाशी कोणत्या पद्धतीने लग्न लावतां येईल याचा ते खल करतांना दिसत. कायद्याने सुधेशी लग्न करतां येत नाहीं असे कळून येतांच ते म्हणाले, 'अः ! प्रेमी जीवांना लग्नाची बंधने पाहिजेत तरी कशाला ? '

–अन् ही वार्ता गांवभर सर्व वृत्तपत्रांमधून येतांच नीलीला काय वाटले ?

समाज बोलूनचालून पैशाचा बंदा गुलाम ! त्यानें बाळासाहेबांच्या या धैर्याबद्दल त्यांची पाठच थोपटण्यास सुरवात केली.

* * *

रजनीच्या वेडाचा कळस होऊन प्रसूतिगृहांत ती प्रसूत होतानाच मरण पावली. बजाबा निराधार झाला. बजाबावर सांवळ्याचे घर जाळल्याचा आरोप जवळ जवळ सिद्ध झाला. पण बाळासाहेबांनीं सुधाच्या शब्दाला मान देऊन अशी कांही किल्ली फिरवली कीं, तो अखेर निर्दोषी म्हणून सुटला. जगांत न्याय व नीति ही पैशाची अनेक वेळा गुलाम बनते ती अशीच !

थोडक्याच दिवसानंतर बाळासाहेब व सुधा आपल्या ' मधुचंद्रा ' साठीं युरोपला निघून गेलीं. जाण्यापूर्वी नीलीला लहानसा बंगला व कांहीं मासिक रक्कम खर्चासाठीं मात्र ठेवून गेले.

अशोकच्या नंदनवनांत आतां स्मशानाची शोभा आली. तें दृश्य नीलीला मुळींच पहावत नसे. पण अशोकच्या आईची पूज्य समाधी तेथें

असल्यानें ती कधीमधीं त्या समाधीवर पूजा बांधण्यासाठीं जाते व खिन्न मनाने परत येते.

श्रीमताची ' भूक ' प्रदीप्त झाल्यावर ती कोणाचा बळी घेईल हे कोण सांगू शकेल ? श्रीमंती ' भूके 'त आपणही नष्ट होऊ या भीतीने स्वतः परमेश्वरहि त्यांच्या पापावर पांघरूण तर घालीत नाहीं ना ?

## भुकेचं विराट् स्वरूप- : : २१

प्रकाश नी अशोक तुरुंगांत खिन्नपणे जीवन कंठीत होते. बंदीवासामुळे अशोक पंख तुटलेल्या पक्षाप्रमाणे झाला, पण प्रकाश-तो-नेहमीसारखाच स्थितप्रज्ञ होता. सुख येवो, दुःख येवो, त्याला दोन्ही सारखीच होती. त्याच्या चेहेऱ्यावर कसलेच विकार दिसत नसत. जगाला जवळ जवळ मुकल्यावरहि प्रकाश इतका निर्विकार कसा राहतो याचें अशोकला राहून राहून आश्चर्य वाटे. त्या आश्चर्याच्या तंद्रीत अशोकन प्रकाशाला विचारले.

'प्रकाश! येथंहि तुझी मनःशांती चलित होत नाहीं? तूं अशी कोणती तप.साधना साधलीस हे तरी कळूं दे! आयुष्याचे इतके धिंडवडे निघून तुला कांहीच कस वाटत नाहीं?'

'काय वाटायचं? जगाच्या जात्यांत नित्यश असंख्य जीव भरडले जातात, त्यांतीलच आपण आहोत अस समजाव. व प्राप्त परिस्थितींत सुख मानावं! अशोक! दीर्घ अनुभवान संसाराचा कटुपणा कळूं लागतो. व आपोआप मनाला मारण्याची कला मनुष्याला अवगत होते.'

-'प्रकाश! जग नी संसार-मला कोणत्याच शब्दाचा अर्थ कळत नाही-'

'अशोक! संसार म्हणजे भुकेची एक प्रदर्शनशाळा आहे. या शाळेंत भुकेचीं अनेकविध स्वरूपे पहावयास मिळतात.'

'पण--या शाळेत गरिबांना गिळण्याची श्रीमंतांची अभिलाषा, श्रीमंतांची लालसा, श्रीमतांची 'भूक' अजोड असेल नाहीं? प्रकाश! या विराट् स्वरूपी भूकेनं जगाचं भस्म केल आहे. ही भूक जगांतून नष्ट होणं शक्य आहे का?

काय सांगावं? उद्या एकादा 'महात्मा' जन्माला येईल व तो ही विराट् भूक चिरडून टाकील कदाचित्! त्यामुळं जगांत थोडी बहुत शांतता नांदेल!'

'हा केवळ भ्रम आहे. अनादिकालापासून चालत आलेली परंपरा नष्टचर्याला जाणार नाही, निदान जग नष्ट होऊं देणार नाहीं. प्रकाश! एका मूठभर वर्गातील लोकांच्या चैनीसाठीं, विलासांसाठीं, लाखो जीवांना गिळणं हा न्याय नाहीं आणि म्हणूनच सकाळी गिरणीचा भोंगा झाला म्हणजे माझ्या छातींत चरचरा कापूं लागते. असंख्य जीवांचीं हृदये या भोंग्याचा 'लाऊड स्पिकर' करून "भूक! भूक!!" म्हणून किंकाळ्या मारीताहेत असं वाटत! गिरणीच्या धुराड्यांतून धुराचे अखंड लोट निघतात. हा धूर कसला आहे? अनंत जिवाच्या आशा, अनंत जीवाचे परिश्रम, सत्तेच्या आगीत जाळून श्रीमंत गरीबांच्या जीवांची ही होळी करीत आहेत. श्रीमंतांच्या या उन्मत्तपणाकडे पाहिलं म्हणजे अस वाटतं कीं, सर्व श्रीमंतांना रांगेनं उभं वरुन सटासट बंदुकीच्या गोळ्या घालाव्यांत नी ठार कराव त्यांना! .....'

'किती वेडीं कल्पना ही! श्रीमंत मेले म्हणून श्रीमती थोडीच मरणार?'

'सारच श्रीमंत झाले तर—'

'सृष्टीचा संसार संपुष्टांत येईल!'

'अन् सारेच गरीब झाले तर-?'

'सारे गरीब झाले, सारे समानपातळींत आले तर-तर-त्यामुळें कदाचित् जीवाला समता नी ममता मिळेल! कदाचित् माणसाला मोल

मिळेल! कदाचित् दुःखाचा संहार होईल! पण कदाचित् अखेर हे कल्पनामय गोड स्वप्नहि ठरेल!'

'स्वप्न कां म्हणून ठरेल? जगांत अशा स्वरूपाचे अभिनव प्रयोग यशस्वी होत नाहींत का?

'आजवर कधीं झाले नाहींत व भविष्यांत ते यशस्वी होण्याचा तसा संभव नाहीं.'

'कां?'

'अशोक! तुम्ही नव्या युगाचे तरुण आहांत? कल्पनेच्या सुखप्रद भराऱ्यांवर जगणं हेच तुमचं जीवन! क्रांति, अर्थवाद, राजकारण, असे बडेबडे शब्द उराओठाशी बाळगून तुम्ही आकाशाला गवसणी घालतां. व्यवहार नी प्रत्यक्ष परिस्थिती, जगाचा इतिहास, मानवजातीच्या स्वभावाची उत्क्रांती यांच्याशीं तुमची पूर्ण फारकत असते. त्यामुळं तुम्हाला नवं कांहीं दिसलं कीं ते लाखमोलाच भासतं-! पाश्चात्यांच्या नव्या चळवळीचीं रणशिंगे फुंकून तुम्ही थयथया नाचतां. पण अशोक! तुझ्या कल्पनेप्रमाणें श्रीमंती विराट् भूक मेली, आपण मारली तर भुकेची इतर स्वरूपे नष्ट होतील असं का तुला वाटतं? स्वातंत्र्य, धर्म, समाज, पापपुण्य, नीति-अनीति, या अनेक भावना जिवत आहेत तोपर्यंत भुकेला मरण नाही-भुकेचीं हीं अनंत स्वरूपे आहेत. एक मारली तर दुसरी जिवत होईल. दुसरी मेली तर तिसरी तांडव करील! भूक ही अजस्त्र शक्ति आहे. तिला आरंभ नाहीं, अंत नाही. ती मरत नाहीं, तिला कोणी मारूं शकत नाही. जगाला जगवण किंवा मारणं हे मात्र तिच्या मर्जीवर अवलंबून आहे ..'

'मला हे पटत नाही! आमची आर्थिक हलाकी नष्ट झाली, आम्ही सुखान राहूं लागलो तर तुझ्या कल्पनेंतील 'भुके'ला जगांत वाव मिळणार नाहीं.'

'जगाचा कलह केवळ पैशासाठींच चालला हे असं का तुला वाटतं? उद्यां तुझ्या नीलीचं प्रेम कोणी हिरावून नेलं तर तुला काय वाटेल? तिची तूं नी तिनं तुझी अभिलाषा करणं ही देखील 'भूक' आहे. जगाच्या सोयीसाठीं, निसर्गाच्या विकसनासाठीं या भुकेला आपण

' प्रेम ' हे गोडस नांव दिलं येवढंच ! पैशांतून नाही तर प्रेमांतून, प्रेमांतून नाही तर धर्मातून, धर्मातून नाही तर वर्णभेदांतून भूक ही अनंत स्वरूपांत अव्याहतपणे जगाचे जीव झुजवीत ठेवणार !

अशोक ! भुकेच एक स्वरूप सौम्य झालं तर दुसर स्वरूपं उग्र होत. सौम्य स्वरूपांत एक संस्कृती विकास पावते तर उग्र स्वरूपांत दुसरी संस्कृती करपून जाते. आपण या उग्रस्वरूपी भुकेला मारण्याचा नेहमींच प्रयत्न करतो. हाच संसार ! हाच जीवनकलह ! भुकेबरोबर जन्म घ्यावयाचा व मरतांनाहि भूक ! भूक ! म्हणून प्राण सोडावयाचा हेच मानवी जीवित ! अनंत वर्षें मनुष्य मरत आहे. पण भुकेला कधी तरी मरण आलय का ? अखेरच्या घटकेतदेखील मरत्या जीवाला स्वर्गाच्या खोट्या कल्पनेची भूक लागतेच ना ? विश्व म्हणजे भूक ! परमेश्वर म्हणजे भूक ! जगांत भुकेशिवाय काय आहे ? स्वतः परमेश्वर अमर आहे. पण तो देखील याच भुकेवर ! '

' होय ! अनंत कोटी वर्षे परमेश्वरानं चराचराचं विश्व संहार करून गिळत आहे, आजहि गिळीत आहे, उद्यां प्रलय झाला तरी वटवृक्षाच्या पानावर बालरूप घेऊन ' अजून मला काय गिळतां येईल ? ' म्हणून आशाळभूताप्रमाणे तो जगाकडे पाहिलच ! . . '

' वैतागलेल्या तरुणाचे हे उद्‌गार आहेत ! कर्तृत्ववान अशोकचे हे शब्द खास नाहीत. अशोक ! संसार ही आग आहे ! या आगीत लहान लहान गरीब जीव जळून भस्म होतात, मध्यम वर्ग अर्धामुर्धा जळतो, श्रीमंत या विराट् आगीत सुखानं विलास करतात, त्याबद्दल तुम्हा आम्हांला वाईट कां वाटाव ? हे त्यांच भाग्यच नाही का ? '

' होय, त्यांचा कोणीही हेवा केला नसता ! पण जसजशी आग पाखडत जाते तसतसे श्रीमंत गरीबांचे बळी देऊन स्वतः जगतात-अन् म्हणूनच आज ते लोकांच्या डोळ्यात सलताहेत. आम्ही हा वर्गच नष्ट कां करू नये ? '

' बेशक करावा ! पण- '

' पण काय ? '

'तसा क्रांतीचा काळ अद्यापि आला नाहीं. आजच्या युगाची भूक आर्थिक स्वरूपाची आहे हे मला कळतं! तिच्याशी झगडणं हाच या पिढीचा जीवनकलह आहे, हेंहि कळत! पण, या क्रांतीची पूर्तता कोण करणार? आज ज्याच्यासाटी क्रांती करावयाची त्यांना 'आम्ही कोण' याची जाणीव नाही! ही जाणीव करून देणारे महाभाग-रागावूं नकोस-तुझ्यासारखे श्रीमंताच्या आहारी जाणारे लोक आहेत. मजुरांचे आजचे सारे पुढारी व्यासपिठावर बडबडतात, पण त्यांची तोंडे सोन्या-रुप्याच्या मल्लियांनीं श्रीमंत तेव्हांच बद करतात. नुसती 'क्रांती' म्हणून, क्रांतीचा जयघोष करून, क्रांती होत नसते!'

'मग आम्ही कराव तरी काय?'

'प्रत्येक क्षण, जीविताचा प्रत्येक परमाणू त्या क्रांतीसाठीं निरपेक्ष बुद्धीनं खर्च करणं हेच तुझं, माझं, जगाचं कर्तव्य आहे. क्रातीसाठी, जगणं, क्रांतीसाठीं अनंत दु:ख सोसणं, सर्वांना एकत्र आणणं, स्वार्थाच्या संकुचित भावना व्यापक करण, 'तूं, मी' हा भेद विसरून जाणं हीच क्रांतीची पूर्वतयारी! पूर्वतयारी जितकी परिपक्व होईल तितकी क्रांती लवकर परिपूर्ण होईल!'

* * *

अशोकला हे विचार पटले किंवा नाहीं हे कळणें कटीण आहे. त्याने खिन्नपणे कोठडीच्या गजावर आपली मान टाकली. इतक्यांत तेथे लहान अर्भकाच्या रडण्याचा सूर आला. अशोकने मान मागे वळून पाहिले. नीली आपल्या नूतन अर्भकाला घेऊन उभी होती. अशोक हंसला, पण त्या हंसण्यात दारुण खिन्नता होती. नीली पदरानें डोळे पुशीत होती. पंधरा मिनिटे झालीं दु:खभाराने कोणी एक शब्दहि बोलूं शकले नाहीं. तुरुंगाधिकारी 'वेळ सपला' म्हणून इषारा देण्यास आला. अश्रू-मागे अश्रू दोघेहि ढाळूं लागले. नीली कोठडीजवळ आली. अशोकने गजांतून बाहेर हात काढला; त्या अर्भकाच्या गालावरून फिरविला. त्याच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले.

नीलीच्या डोळ्यांत त्याला असंख्य स्थित्यंतरें दिसली. पण भविष्य-

कालाचीं चित्रें मात्र दिसत नव्हतीं.

'नीली! आपली पुन्हा भेट होईल का?' असे तो विचारणार होता. पण मंदमंद पदें टाकीत नीली दूरवर निघून गेली.

प्रहरन् प्रहर धुळींत उमटलेलीं नीलीची पदचिन्हे तो न्याहाळीत होता. कोठीसमोर कबुतरांची एक खोपटी होती. त्यांत पिले चिवचिव करू लागलीं. त्यांना चोचींनं त्यांची आई चारा घालूं लागली.

घरीं नीलीहि आपल्या अर्भकास अशीच पदराखालीं घेऊन पाजित असेल, या सुखचित्राच्या चिंतनानें अशोकच्या डोळ्यांच्या कडांवर आनंदाश्रु चमकले! कां?

ती भूक होती! जगांत पुत्रप्रेम, पत्नीप्रेम फार प्रबल आहे. इतक्यांत घंटा झाली. 'खाना' सुरूं झाला. कैदी कोठडीबाहेर पडले. येथेंहि कैद्यांची तीच गर्जना--तीच घरघर--तीच जीवनकलह. बेड्यांच्या खळखळाटांत हेच शब्द उमटले—

'भूक! भूक!! भूक!!!'

---